त्रिशतसांवत्सरिक शिव-स्मारक-ग्रंथावली शके १८५१

अनुक्रम २. खंड १

# शिवाजी-निबंधावली १








शके १८५१ ] श्रीशिवचरित्रकार्यालय [ इ. स. १९३०

पुणें

प्रकाशक—

रायगड-स्मारक मंडळ आणि भारत-इतिहाससंशोधक मंडळ, यांच्या सहकार्यानें चाललेल्या श्रीशिवचरित्रकार्यालयातर्फे कार्यालयाचे चिटणीस नरसिंह चिंतामण केळकर व दत्तात्रेय विष्णु आपटे, ३१२ सदाशिव, पुणें नं. २.



मुद्रक :—

मराठी विभाग

पृष्ठें १ ते १०४ श्री. र. राजगुरु, राजगुरु कंपनीज प्रेस, शनिवार पेठ, पुणें २.
,, १०५ ते १४० आणि २०९ ते २२४ वा. वा. अतीतकर, बी. ए., नवीन समर्थ विद्यालयाचा समर्थभारत छापखाना, ९४७ सदाशिव पुणें २.
,, १४१ ते १७६ सी. वा. फडणीस, बी. ए. आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रोड, पुणें २.
,, १७७ ते २०८ का. सी. पंडीत, समर्थ छापखाना घ. नं. ३१२७ पश्चिम (खानदेश). धुळें.

इंग्रजी विभाग

वा. वा. अतीतकर, समर्थ भारत छापखाना ९४७ सदाशिव, पुणें २.

---

## शुद्धिपत्रक

पृष्ठ २४ वंश०—नारायण भट्टांचे पुत्र ३: रामकृष्ण, शंकर व गोविंद. श्रीधराचे नव्हत.
पृ. १०५ ओळ ४ मध्यें, समर्थांचें गोत्र ' जामदग्न्य वत्स ' होतें, असें वाचावें.

# प्रस्तावना

१. या ग्रंथांत, श्री शिवाजी महाराजांच्या चरित्रावर अप्रत्यक्षपणें प्रकाश पाडणारे व शिवकालीन परिस्थितीचें वर्णन करणारे लेख संग्रहित केले आहेत. कोणत्याहि विवक्षित कालाचा इतिहास चांगला समजण्यासाठीं त्या वेळच्या समाजाची शक्य तितकी संपूर्ण माहिती मिळविण्याकडे शास्त्रीय इतिहासाचा कल वळल्यापासून या प्रकारच्या अभ्यासाला महत्त्व आलें आहे. कोणताहि कालखंड नानाविध शास्त्रांचा अभ्यासविषय होऊं शकतो; यामुळें शिवकालाचाच अभ्यास राजकीय किंवा राजकारणी दृष्टीशिवाय, आर्थिक, शैक्षणिक, भाषिक, वैय्यापारिक इत्यादि अनेक दृष्टींनीं करतां येण्यासारखा आहे. याचें अगदीं अल्पसें दिग्दर्शन मात्र या संग्रहांत करतां आलें याला अनेक कारणें आहेत. तथापि, शिवचरित्रकार्यालयानें अगदीं अल्पकालांत पुरें करण्यासाठीं अंगावर घेतलेल्या अनेक उद्योगांपैकीं हा एक होय, असा विचार करून पाहिला म्हणजे शिवाजीविषयक भावी ज्ञानकोशाचा मूळारंभ या नात्यानें हा संग्रह आदरणीय ठरेल अशी अपेक्षा आहे.

२. शिवकालाचा सांगोपांग अभ्यास करण्याकरितां अनेक शास्त्रांत पारंगत अशा विद्वानांचें सहकार्य झालें पाहिजे आणि तशा तऱ्हेचीं नांवें या ग्रंथाच्या लेखकवर्गांत खास पहावयास सांपडतील. अनुक्रमणिकेमध्यें ग्रथित झालेलीं नांवें हिंदुस्थानच्या अनेक प्रांतांचें सहकार्य सुचवीत असल्यामुळें, आहे त्या स्वरूपांतहि हा ग्रंथ पूर्णपणें प्रातिनिधिक स्वरूपाचा आहे हें प्रामुख्यानें लक्षांत येतें आणि शिवाजीविषयक अभ्यास दिवसेंदिवस ऊर्जितावस्थेला येऊन लवकरच तो पूर्णतेला पोंचण्याचा सुदिन प्राप्त होईल अशी आशा वाटते.

३. आमच्या विनंतीला मान देऊन किंवा स्वयंस्फूर्तीनेंहि अखिल भारतवर्षांतील व परद्वीपांतीलहि विद्वानांनीं निबंध पाठविले याबद्दल आम्ही त्या सर्वांचे आभारी आहोंत. त्या सर्वांमध्यें एकसूत्रीपणा रहावा म्हणून श्री. न. चिं. केळकर, प्रो. वा. गो. काळे आणि रा. सा. ना. गो. चापेकर यांना ह्या निबंधांचें अवलोकन करून सूचना करण्याबद्दल विनंति केली होती. त्याप्रमाणें त्यांनीं तें सर्व निबंध वाचून उपयुक्त सूचना केल्या. त्यामुळेंच या ग्रंथामध्यें नीटनेटकेपणा आला आहे. पाठविलेले सर्वच निबंध छापणें आमच्या आटोक्याबाहेरचें असल्यामुळें कित्येक निबंधांचा त्रुटित सारांश देण्यापलीकडे आम्हांला कांहीं करतां आलें नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. तसें करण्याचें कारण अर्थात् पुरेशा जागेचा अभाव एवढेंच आहे.

४. लेखकवर्गाबरोबरच, त्यांचे परिश्रम योग्य स्वरूपांत जनतेपुढें मांडण्यासाठीं छपाई इत्यादि करितां द्रव्यसहाय्य करणारे कऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी **श्रीमंत पांडुअण्णा शिराळकर** यांचे मनःपूर्वक आभार मानले पाहिजेत. शिवाजी–निबंधावलीचा संपूर्ण छपाईचा खर्च देऊन ह्या पुस्तकाच्या तोटयाची जबाबदारी त्यांनीं अंगिकारिली आहे. पुढें हें पुस्तक आटोक्याबाहेर वाढून चरित्रविषयक निबंधांचें पुस्तक निराळें छापणें भाग पडलें. त्याबरोबर खर्चाच्या रकमेचाहि आंकडा चढूं लागला. त्यामुळें या दोन पुस्तकांपैकीं एका पुस्तकास पुनः मदत देण्याबद्दल इंदूरच्या **ग्रंथोत्तेजक मंडळाला** विनंति करण्यांत आली. आणि ह्या दुसऱ्या ग्रंथाच्याहि पुरस्कारानें, पूर्वजांच्या स्मृतिरक्षणाचें पवित्र कार्य अढळ निष्ठेनें पत्करल्याचें ते जाहीर करतील अशी आशा आहे. त्यांचें साभार अभिनंदन प्रत्येक सहृदय वाचक करील यांत शंका नाहीं.

पुणें,
शिवाजी-जयंती १८५१.

नरसिंह चिंतामण केळकर
दत्तात्रेय विष्णु आपटे

# त्रिशत-सांवत्सरिक-शिवस्मारक-ग्रंथावली

| अनुक्रम | पुस्तकाचें नांव | पृष्ठें अजमासें | किं. रु. आ. |
|---|---|---|---|
| १ | शिव-कालीन-पत्र-सारसंग्रह खंड १ व २ | पृष्ठें ७३६+१६ | ७-० |
| २ | शिवाजी निबंधावली | | |
| | खंड १–शिवकालविषयक निबंध | ५०० | ३-८ |
| | खंड २–शिवाजीचरित्राविषयक निबंध | ३५० | ३-८ |
| ३ | शिव-चरित्र-साहित्य (अस्सल पत्रें) खंड १ | १४० | १-८ |
| | खंड २ | ३०० | ४-० |
| | खंड ३ | ३०० | ३-० |
| ४ | Foreign Biographies of Shivaji by Dr. Sen. | ४९२+५७ | १०-० |
| ५ | शिव–चरित्र–चित्र–संग्रह श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि (संस्थान औंध) विरचित, प्रत्येकीं दहा चित्रें असे तीन खंड. | | ५-० |
| ६ | Shivaji the Great by Dr. Balkrishna | (पृष्ठें ६००) (चित्रें १००) | १०-० |

# अनुक्रमणिका

## ( मराठी विभाग )

क्रम



### —स्फुट विषय—

( इंग्रजी विभाग )

# श्रीशिवछत्रपति आणि गागाभट्ट

( लेखक—पांडुरंग वामन काणे, मुंबई )

पवनाग्निसमागमो ह्ययं सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा

श्रीशिवाजीमहाराजांनीं बालपणापासून स्वातंत्र्याचें ध्येय मनांत बाळगून, स्वतांच्या प्राणाकडे न पाहतां अनेक संकटांशीं व अडचणींशीं झुंजून नेताजी, तानाजी, बाजीप्रभु, मोरो त्रिमल असे आपल्यासारखे वीर पुरुष आपल्या भोंवतीं जमवून महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापिलें; सनातनधर्म—विद्वेषकांना दहशत बसविली आणि मुसलमानी पातशाहीचा जो लोकांचे मनावर विलक्षण पगडा बसला होता तो उडवून दिला. आपण जें राज्य मिळविलें तें वैयक्तिक सुखोपभोगाकरितां किंवा मोठेपणाकरितां नव्हे, तर स्वधर्मरक्षण व्हावें, महाराष्ट्राला स्वातंत्र्य मिळावें, स्वजनांना निर्भय रीतीनें राहतां यावें; यासाठीं मिळविलें अशी महाराजांची भावना होती. लोकांमध्यें हीच भावना वाढावी; लोकांना आदर्शवत् वाटणारे जनक, श्रीरामचंद्रप्रभु, युधिष्ठिर इत्यादि प्राचीन राजांप्रमाणेंच आपलें राज्य धर्माचरणाकरितां व लोकांच्या सुखाकरितां आहे, आपल्या राज्यांतील विद्वान् ब्राह्मणांपासून तों अंत्यजांपर्यंत सर्वांना हें राज्य आपलेंसें वाटावें; यवनपातशाहीमुळें लोकांच्या मनावर पडलेलें विलक्षण वजन व लोकांची आपल्या कमकुवतपणाबद्दल आणि यवनांच्या अजिंक्यत्वाबद्दल झालेली गैरसमजूत निरस्त व्हावी; इत्यादि अनेक उद्देशांनीं शिवछत्रपतींनीं आपल्याला प्राचीन वैदिक पद्धतीप्रमाणें अभिषेक व्हावा असें मनांत आणिलें. ही त्यांची मनीषा पूर्ण होण्याचे मार्गांत अनेक योग्य अडचणी होत्या. त्या दूर करण्याकरितां त्यांनीं गागाभट्टांची निवड केली ती अत्यंत योग्य होती. महाराज ज्याप्रमाणें स्वपराक्रमानें उदयास आले तसेंच गागाभट्टहि आपल्या विद्वत्तेनें काशी नगरींत किंबहुना भरतखंडांत महामीमांसक म्हणून गाजलेले होते. गागाभट्टांनीं त्या काळच्या आक्षेपांना न जुमानतां देशकालपरिस्थिति, महाराजांची योग्यता, त्यांनीं केलेलें सनातन धर्माचें व आर्तांचें रक्षण पाहून त्यांना राज्याभिषेक करण्याचें ठरवून त्यांच्या व्रतबंधापासून सुरुवात करून सर्व गोष्टी यथायोग्य इतमामानें व पूर्वपरंपरेला

धरून पार पाडिल्या. यांत गागाभट्टांचाहि मोठेपणा आहे. शिवाजी राजांना जी तळमळ लागली होती, ती गागाभट्टांसारख्या अद्वितीय विद्वानानें नाहींशी केली. याचेपुढें शिवाजी महाराजांचा त्यांचे हयातीपर्यंत उत्तरोत्तर उत्कर्षच होत गेला आणि शिरोभागीं उध्दृत केलेल्या वचनाप्रमाणें राजांनीं स्थापिलेल्या राज्यावर संभाजी महाराजांचा वध, अवरंगजेबानें अखिल मोंगलाईचें बळ एकवटून केलेले हल्ले वगैरे पर्वतप्राय आपत्ति कोसळल्या असतांहि त्यांतून महाराष्ट्र–राजसत्ता पार पडली व पुढें आणखी जोमानें फोफावली.

महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री यांनीं इंडियन अण्टिक्केरी व्हॉल्युम ४१ ( सन १९१२ ) पान ७–१३ यांत भट्टवंशासंबंधानें लिहिलेल्या ' गाधि-वंशानुचरित ' ह्या ग्रंथांतून महत्त्वाची माहिती उध्दृत केली आहे. परंतु त्या ग्रंथांत आरंभींचें पान नसल्यामुळें व ग्रंथ शंकरभट्ट यांनीं लिहिला असल्या-मुळें त्यांत भट्टवंशाची माहिती अपुरीच आहे. गाधिवंशानुचरितांतील माहिती आधार धरून भट्टवंशांतील प्रसिद्ध विद्वानांच्या ग्रंथांत आदि व अंत यांतून माहिती संकलित करून पुढील भट्टवंशाची हकीकत दिलेली आहे. कमलाकर-भट्टांचे वंशज पंडित कान्तानाथ भट्ट यांनीं मिर्झापूर येथें सन १९०३ सालीं भट्टवंशकाव्य म्हणून दहा सर्गांचा व ४०९ श्लोकांचा ग्रंथ रचिला आहे. त्यांत दिलेली माहिती बरीचशी गाधिवंशानुचरितावरून व रावसाहेब मंडलि-कांचे व्यवहारमयूखाचे प्रस्तावनेवरून घेतलेली दिसते. कांहीं ठिकाणीं ती माहिती गाधिवंशानुचरिताशीं व इतर प्रकारांनीं मिळविलेल्या माहितीशीं विसं-गत दिसते. अशीं कांहीं ठिकाणें पुढें दाखविलीं आहेत.

या घराण्याच्या मूळपुरुषांपैकीं सर्वांत प्राचीन असा पुरुष ' नागपाश ' ह्या नांवाचा होता व त्याचा पुत्र ' चांगदेव ' होता, असें नारायणभट्टांची जी वृत्तरत्नाकरावर टीका आहे त्यावरून दिसतें[1]. ह्या घराण्याचें गोत्र विश्वा-मित्र असल्यामुळें त्याच्या प्रशस्तीला ' गाधिवंशानुचरित ' असें नांव ठेव-

---

१ भट्टः श्रीनागपाशात्समजनि विबुधश्चांगदेवाख्यभट्टः । प्रासोष्टासौ तनूजं रघु-पतिनिरतं भट्टगोविन्दसंज्ञम् ॥ विश्वामित्रान्ववायाम्बुधिविधुरधिकं वर्धते तत्तनूजो । विद्याब्धौ लब्धपारः प्रथितपृथुयशा भट्टरामेश्वराख्यः ॥ इंडिआ ऑफीस संस्कृत हस्तलिखितांचा कॅटलाग भाग २ पृ. ३०३. हा कॅटलॉग तयार करणाऱ्या प्रो. एगलिंग ह्याचे मतानें ' अंगदेव ' असें नांव होतें. पण ' च ' व ' अंगदेव ' असें वरील श्लोकांत वाचण्यापेक्षां ' चांगदेव ' असें वाचणेंच जास्त प्रशस्त आहे. आणि चांगदेव हें महाराष्ट्रांत प्रसिद्ध असें प्राचीन नांव आहे.

ण्यांत आलें. ' चांगदेव ' यांचा पुत्र भट्ट गोविंद. भट्ट गोविंद हे दक्षिण देशांत अगस्त्याप्रमाणें शोभत; असें रामकृष्णभट्टांच्या ज्योतिष्टोमपद्धतींत[२] सांगितलें आहे. त्याचप्रमाणें नारायणभट्टांच्या ' त्रिस्थलीसेतु ' या ग्रंथांतहि गोविंदभट्टांचा उल्लेख केलेला आहे. या गोविंदभट्टांचे पुत्र रामेश्वरभट्ट. उपलब्ध असलेल्या गाधिवंशानुचरितांत रामेश्वरभट्टांच्या स्तुतीपासून मजकूर आहे. नारायणभट्टांच्या ' त्रिस्थलीसेतु ' ह्या ग्रंथांत रामेश्वरभट्टांबद्दल असें म्हटलें आहे कीं, विश्वामित्रगोत्ररूपी सागरांत अखण्ड असा चन्द्र व सर्व कलांचा निधि रामेश्वरभट्ट हा होता; व त्याच्या शिष्यप्रशिष्यांनीं सर्व भूमि भरून गेली होती, आणि विद्यारूपी कमलांचा विकास करणारा तो केवळ भास्करच होता. बहुतेक याच शब्दांत रामेश्वरभट्टांचें वर्णन त्यांचा नातू प्रभाकर याच्या 'रसप्रदीप' या ग्रंथांत आहे.[३] रामेश्वरभट्ट हे मीमांसा, व्याकरण, तर्क, वेदान्त इत्यादि शास्त्रांत पारंगत होते. श्रीहर्षाच्या नैषधीय चरिताशीं स्पर्धा करण्याकरितां त्यांनीं 'रामकुतूहल' या नांवाचें काव्य रचिलें; हें काव्य अजून उपलब्ध झालें नाहीं. पैठणांत ते रहात त्या ठिकाणीं अखिल भरतवर्षांतून विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी विद्यार्जनासाठीं येत असत. पैठणाहून ते संगमनेरला गेल्याचा उल्लेख भट्टवंशकाव्यांत केलेला आहे ( सर्ग १ श्लोक १३ ). अहमदनगर दरबारच्या जाफर मलिक नांवाच्या उमरावाच्या मुलाला महारोगापासून त्यांनीं मुक्त केलें, असें भट्टवंशकाव्य व गाधिवंशानुचरित ह्या दोन्ही ग्रंथांत सांगितलें आहे. रामेश्वरभट्ट हे संगमनेराहून कोल्हापूर येथें, आपली कुलदेवता जी महालक्ष्मी तिच्या आराधनेनें पुत्रप्राप्ती व्हावी म्हणून गेले व तेथून विजयनगरचा सम्राट् कृष्णदेवराय याजकडे गेले. नंतर त्यांनीं द्वारकेची यात्रा केली. द्वारकेला जात असतांना वाटेंतच त्यांना शके १४३५ मध्यें चैत्र महिन्यांत पहिला पुत्र झाला. त्याचें नांव नारायणभट्ट. भट्टवंश-

---

२ श्रीमद्दक्षिणे देशेऽगस्त्य इवासीत्स भट्टगोविंदः । तत्सूनुः श्रीरामेश्वरभट्टोभूत्स सर्वदिक्ख्यातः ॥ ज्योतिष्टोमपद्धतिः

३ विश्वामित्रकुलोदधौ विधुरिवाखण्डः कलानां निधिर्वाग्गुम्फे निखिलेपि यस्य वसुधा शिष्यप्रशिष्यैश्रिता । विद्यापद्मविकासनैकतरणिः श्रीभट्टगोविन्दजः संख्यावद्गणनाग्रणीर्विजयते श्रीभट्टरामेश्वरः ॥ त्रिस्थलीसेतुः । अभूत्कुशिकनन्दनप्रथितवंशदुग्धाम्बुधौ सुधाकर इवाकरः किल कलाकलापस्य यः । रमारमणभावनो भुवनबिन्दुवृन्दारकः व्रजध्वजपुरन्दरो विबुधभट्टरामेश्वरः ॥ रसप्रदीप ( प्रास्ताविक ५ वा श्लोक, सरस्वतीभवन सीरिज अलाहाबाद. )

काव्यांत नारायणभट्टांचा जन्म संगमनेर येथें विक्रम १५७० वैशाख शुा १० ला झाला ( सर्ग १ श्लोक ३६–३८ ) व चार वर्षांचे असतां नारायणभट्ट क्षयी झाल्यामुळें रामेश्वरभट्ट द्वारकेस गेले असें लिहिलें आहे. द्वारकेंत चार वर्षें राहून तेथें महाभाष्य व सुरेश्वराचार्यांचें वार्तिक यांचें अध्यापन करून रामेश्वरभट्ट पैठणला परत आले. पैठण येथें चार वर्षे राहून रामेश्वरभट्टांनीं सर्व विद्यांचें आगर असें जें काशीनगर त्याचा रस्ता धरला. या गोष्टींचा उल्लेख त्रिस्थलीसेतूमध्यें नारायणभट्टांनीं असा केला आहे कीं, रामेश्वरभट्टांनीं वाराणसी[४] नगरीचा आश्रय केला, ती नगरी सुवर्णाचा पर्वत जो मेरु त्याच्याशीं सादृश्य पावते व तिच्यापेक्षां दुसरी कोणतीहि नगरी श्रेष्ठ नाहीं. वाटेंत त्यांना दुसरा मुलगा झाला त्यांचें नांव श्रीधर. काशीस गेल्यावर त्यांना तिसरा पुत्र झाला त्याचें नांव माधव असें होतें. प्रथम पुत्र नारायणभट्ट याचे जन्माचे वेळींच रामेश्वरभट्ट यांचें बरेंच वय झालें होतें; असें गाधिवंशानुचरितांत सांगितलेलें आहे. तेव्हां रामेश्वरभट्ट यांनीं काशी-क्षेत्रांत वास्तव्य केलें त्या वेळीं ते वयातीत असावे असें दिसतें. गाधिवंशानुचरितांत काशींत त्यांच्याजवळ शिकलेल्या प्रसिद्ध अशा शिष्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. त्यांत कोंकणचे अनन्तभट्ट चित्तल (चितळे), दामोदरसरस्वती व मधुसूदनसरस्वती यांचे गुरु माधवसरस्वती महेश ठक्कर शंकरमिश्र हे प्रमुख होते. रामेश्वरभट्ट फार वृद्धपणीं कैलासवासी झाले व त्यांची स्त्री सती गेली. रामेश्वरभट्टांचे नारायणभट्ट, श्रीधर व माधव असे तीन पुत्र होते हें वर आलेंच आहे. ब्रह्मा, विष्णु व महेश यांच्यासारखे तीन पुत्र ह्यांनीं युक्त असा रामेश्वरभट्ट स्वतः तुरीय (परब्रह्म) रूपी शोभे, असें रामेश्वरभट्टांचा नातू व माधवपुत्र रघुनाथ यानें आपल्या 'कालतत्त्वविवेचन' या ग्रंथांत म्हटलें आहे.[५]

नारायणभट्ट ह्यांनीं रामेश्वरभट्टांजवळच सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें; असें त्यांच्या 'त्रिस्थलीसेतू'त सांगितलें आहे. मैथिल आणि गौड पंडितांशीं त्यांचीं तुमुल वाग्युद्धें होत असत. प्रसिद्ध राजा तोडरमल्ल व

४ श्रिता वाराणसी तेन नगरी नगरीयसी ।
यतोन्या नगरी हेमनगरीतिसुपेयुषी॥ त्रिस्थलीसेतु.

५ यस्याचिता ब्रह्महरीशकल्पैः स्वसूनुभिर्यश्च तुरीयरूपः । नारायणश्रीधरमाधवाख्यै रामेश्वरः सोजनि गाधिवंशे ॥ कालतत्त्वविवेचन ( इंडिआ ऑफीस कॅटलॉग पान ५३१. )

नारायणभट्ट यांची मैत्री होती व त्यांनीं तोडरमल्ल याच्या वाड्यांत विद्यानिवासादि गौडमैथिल पंडितांचा वाग्युद्धांत खरपूस समाचार घेतला; असें गाधिवंशानुचरितांत व भट्टवंशकाव्यांत वर्णन केलें आहे. नारायण भट्टांच्या विद्वत्तेमुळें दाक्षिणात्य पंडितांचें वर्चस्व वाराणसी क्षेत्रांत झालें व तें अजूनहि कायम आहे. नारायणभट्ट हे भट्टवंशांतील अत्यंत प्रसिद्ध असे पुरुष होत. त्यांनीं आपल्या गाढ विद्वत्तेनें, पवित्र आचरणानें व गीर्वाणग्रथा-साठीं केलेल्या सततोद्योगानें आपल्या कुळाला अत्यंत भूषविलें. हस्तलिखित ग्रंथ जमविणें व स्वतः लिहिणें व लिहवून घेणें याचा त्यांना फार नाद होता.

भरतवर्षांतील सर्व पण्डित नारायणभट्टांना आपला पुरस्कर्ता समजत असत. सनातनधर्मविद्वेष व फाजील स्वधर्माभिमान यांचे भरांत मुसलमानांनीं काशी येथील विश्वेश्वराच्या मंदिराचा विध्वंस केला;त्यामुळें भयंकर दुष्काळ पडला आणि मुसलमान बादशहानें विश्वेश्वराची आराधना करून त्याला संतुष्ट करून पाऊस पाडा अशी नारायणभट्टांची विनवणी केली; व नारायणभट्टांनीं विश्वेश्व-राची आराधना करून पाऊस पाडला आणि बादशहाकडून विश्वेश्वराचें देवालय पुनः बांधण्याची परवानगी मिळविली अशी दंतकथा आहे. परंतु गाधि-वंशानुचरितांत ह्या गोष्टीचा उल्लेख नाहीं. भट्टवंशकाव्यांत ही कथा दिलेली आहे ( सर्ग ३ श्लोक ३–१२ ). नारायणभट्टांचा जन्म सन १५१३ त झाला व त्यांच्या विद्वत्तेची व सदाचरणाची कीर्ति होण्यासाठीं ह्या वेळीं निदान ३५–४० वर्षांचे तरी ते असले पाहिजेत. म्हणजे यावेळीं दिल्लीच्या तक्तावर सूर घराण्यांतील कोणी बादशहा किंवा अकबर असला पाहिजे. मात्र इतकी गोष्ट स्पष्ट दिसते कीं, विश्वेश्वराच्या देवालयाचे स्थापनेशीं नारायण-भट्टांचा संबंध असला पाहिजे. कारण नारायणभट्टांचा नातू नीलकंठभट्ट यांचा दौहित्र दिवाकर यानें आपल्या दानहीरावलीप्रकाशें या ग्रंथांत नारा-यणभट्टांनीं विश्वेश्वराची स्थापना विधिपूर्वक केली असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें

---

६ शास्त्रेष्वधीती पितुरेव स श्रुतीः स्मृतीः समालोच्य च देशरीतीः । नारायण-स्तत्तनयो विमुक्ते तीर्थत्रयीसेतुमसौ विधत्ते ॥ त्रिस्थलीसेतु

७ श्रीरामेश्वरसूरिसूनुरभवन्नारायणाख्यो महान्येनाकार्यविमुक्तके सुविधिना विश्वे-श्वरस्थापना । दानहीरावलिप्रकाश प्रास्ताविक ४ था श्लोक ( इण्डिया ऑफिस कॅटलॉग भाग तीन पान ५४७ ); काश्यां पातकिविद्रुतं भगवतो, विश्वेश्वरस्याचलं लिङ्गं भाग्य-वशात्सुखाय जगतां संस्थापयामास यः ॥ दिनकरोद्द्योत Hultzsch's Report III P. 106

'दिनकरोद्द्योत' ह्या ग्रन्थांत गागाभट्टांनींहि हेंच सांगितलें आहे. भट्टवंश-काव्यांतहि नारायणभट्टांनीं विश्वेश्वराचें देवालय पुन: बांधल्याचें वर्णन आहे. नारायणभट्टांची विद्वत्ता व सदाचरण ह्यांमुळें त्यांना 'जगद्गुरु' ही पदवी लावण्यांत येऊं लागली व मन्त्रजागरणाचे वेळीं सर्व वैदिकांमध्यें त्यांचे घराण्याला अग्रपूजेचा मान मिळूं लागला. हा मान अजूनहि त्या घराण्याकडे चालू आहे. नारायणभट्टांच्या वंशजांच्या ग्रंथांत शेवटीं नारायणभट्टांना 'जगद्गुरु' हें उपपद नेहमीं लावण्यांत येतें.[8] नारायणभट्टांचे कनिष्ठ बन्धु माधवभट्ट यांचा पुत्र प्रभाकर यानें लिहिलेल्या 'रसप्रदीप' ग्रंथाचे शेवटीं माधवभट्टांना 'जगद्गुरु' हें विशेषण लाविलेलें आहे.[9] कमलाकरभट्ट (नारायणभट्टांचे नातू) यांचा पुत्र अनन्तभट्ट याच्या रामकल्पद्रुम या ग्रंथाचे शेवटीं कमलाकरभट्टांनाहि जगद्गुरु ही पदवी लाविली आहे. नारायणभट्टांचे वंशजांनीं नारायणभट्टांना प्रत्यक्ष विष्णूचा अवतार असें म्हटलें आहे. कमलाकरभट्ट निर्णयसिन्धूंत[10] म्हणतात:—'वेदाचें उद्दिष्ट जो धर्म त्याचें रक्षण करण्याकरितां नारायणभट्ट या नांवानें मनुष्यरूप धारण करणारे श्रीहरि माझे पितामह यांना वन्दन करितों.' नारायणभट्ट हे महामीमांसक होते. त्यांचे पुत्र शंकरभट्ट यांनीं आपल्या 'द्वैतनिर्णय' ह्या ग्रन्थांत 'मीमांसारूपी पुष्करिणींतील कमलांचा मकरन्द चाखण्याचें केवळ ज्याचें व्रत आहे असा हंस, आपल्या यशाच्या शुभ्रत्वानें सर्व व्यापल्यामुळें जो दुसऱ्या कोणत्याहि रूपाचें भान होऊं देत नाहीं; वाग्देवीनें जिचा मत्सर करण्याचें सोडून दिलें आहे अशा त्यांचे ठिकाणीं नित्य अनुरक्त असलेल्या लक्ष्मीचें सेवन करणारा व अविमुक्तकाला न सोडणारा जो भट्टनारायण त्याचा विजय असो' असें वर्णन[11] आहे.

---

८ उदाहरणार्थ, व्यवहारमयूखाचे शेवटीं हे शब्द आहेत 'इतिश्रीभगवन्तदेवादिष्ट---श्रीजगद्गुरुभट्टनारायणसूरिसूनुपंडितशिरोरत्नमीमांसापारावारपारीणधुरीणभट्टशङ्करसूनोभट्टनीलकण्ठकृते भगवद्भास्करे व्यवहारमयूखः समाप्तः'

९ इतिश्रीमद्विन्दुवृन्दारकवन्दनीयपादारविन्दद्वंद्व-भूसुरपुरन्दर-जगद्गुरुमहामहोपाध्यायभट्टमाधवतनूज-भट्टभट्टारकभट्टप्रभाकरोन्नीते रसप्रदीपे....रसप्रदीप.

१० वेदार्थधर्मरक्षार्थं मायामानुषरूपिणम् । पितामहं हरिं वन्दे भट्टनारायणाव्हयम्॥ निर्णयसिन्धु ३ रा श्लोक.

११ मीमांसासरसीसरोजमकरन्दास्वादनैकव्रतो हंसः स्वीययशःसिताद्वयमते- रस्तान्यरूपाभिधः। वाग्देव्या गतमत्सरां श्रियमयं नित्यानुरक्तां भजन्नो मुञ्चन्नविमुक्तकं विजयते श्रीभट्टनारायणः ॥ द्वैतनिर्णय (प्रास्ताविक ४ था श्लोक).

नारायणभट्टांनीं पार्थसारथिमिश्र यांच्या 'शास्त्रदीपिका' (पूर्वमीमांसा सूत्रटीका) या ग्रंथाच्या कांहीं भागावर टीका लिहिली व दुसऱ्या भागावर त्यांचे पुत्र शंकरभट्ट यांनीं लिहिली. नारायणभट्टांनीं वृत्तरत्नाकरावरील टीका विक्रमसंवत् १६०२ कार्तिक शुा ११ (म्हणजे सन १५४६) स पुरी केली. याशिवाय अन्त्येष्टिपद्धति, अयननिर्णय, आतुरसंन्यासविधि, आरामोत्सर्गपद्धति, आह्निकविधि, काशीमरणमुक्तिविचार, कालमाधवव्याख्या, गोत्रप्रवरनिर्णय, तिथिनिर्णय, त्रिस्थलीसेतु, तुलापुरुषमहादानप्रयोग, दिव्यानुष्ठानपद्धति, प्रयोगरत्न, रुद्रपद्धति इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले. यांतील बरेच ग्रंथ आजहि प्रचारांत आहेत व त्यांवरून आपलीं धार्मिक कृत्यें लोक सर्व भरतवर्षांत करीत आहेत. नारायणभट्टांचा ग्रंथरचनाकाल सन १५४० पासून सन १५७५ पर्यंत मानण्यास हरकत नाहीं. नारायणभट्टांच्या स्त्रीचें नांव पार्वती होतें; असें त्यांचे पुत्र शङ्करभट्ट यांनीं लिहिलेल्या 'सर्वधर्मप्रकाश' ह्या ग्रंथावरून दिसतें.[१२] नारायणभट्टांच्या प्रसिद्ध शिष्यांत ब्रह्मेन्द्रसरस्वती व नारायणसरस्वती हे होते.

नारायणभट्टांचे बन्धु श्रीधर यांनीं सापिण्ड्यदीपिका किंवा सापिण्ड्यमीमांसा ह्या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्याचा उल्लेख व्यवहारमयूख व निर्णयसिन्धु ह्या दोन्ही ग्रंथांत आहे.

नारायणभट्टांचे कनिष्ठ बन्धु माधवभट्ट यांनीं सुर्यार्घ्यदानपद्धति हा ग्रंथ लिहिलेला आहे. यांची स्तुति यांचा कनिष्ठ मुलगा प्रभाकर याच्या रसप्रदीप ग्रंथांत आली आहे.

नारायणभट्टांना तीन पुत्र होते; रामकृष्णभट्ट, शङ्करभट्ट, गोविन्दभट्ट. नारायणभट्टांच्या प्रयोगरत्न ह्या ग्रंथांत एका ठिकाणीं रामकृष्णभट्टांचा ज्येष्ठ पुत्र म्हणून निर्देश केलेला आहे. रामकृष्णभट्टहि गाढे पण्डित होते. शूद्रकमलाकरांत कमलाकरभट्टांनीं यांचेविषयीं असें म्हटलें आहे कीं, कुमारिलभट्टांचा मार्ग हाच एक गहन सागर आहे त्यांत रामकृष्णभट्ट हे कर्णधार होते व इतरहि सर्व शास्त्रांचीं मर्में उघडून सांगण्यांत त्यांचा हातखंडा होता.[१३] रामकृष्ण-

---

१२ श्रीमन्नारायणाह्वं गुरुमथ जननीं पार्वतीं शंकरः श्रीमीमांसान्यायसारे शिवपुरितकृते सर्वधर्मप्रकाशम् ॥ इण्डिया ऑफिस कॅटलाग पान ४८२.

१३ यो भाट्टतन्त्रगहनार्णवकर्णधारः शास्त्रान्तरेषु निखिलेष्वपि मर्मभेत्ता । योऽत्रः श्रमः किल कृतः कमलाकरेण प्रीतो पुनास्तु सुकृती बुधरामकृष्णः॥ शूद्रकमलाकर.

भट्टांचे पुत्र लक्ष्मणभट्ट यांच्या ' आचाररत्न ' ह्या ग्रंथांत ' आपल्या विद्येच्या प्रखर तेजानें ज्यांनीं प्रतिपक्षी खद्योतासारखे केले ' असें रामकृष्णभट्टांचें वर्णन केलेलें आहे.[14] रामकृष्ण भट्टांनीं जीवत्पितृककर्मनिर्णय, ज्योतिष्टोमपद्धति, विभागतत्व, मासिकश्राद्धनिर्णय, तन्त्रवार्तिकटीका इत्यादि ग्रन्थ लिहिले. यांचें वयाचे ५२ वे वर्षी निधन झालें असें गाधिवंशानुचरितांत शंकरभट्टांनीं लिहिलें आहे. ह्यांची स्त्री उमा ही सती गेली. रामकृष्णभट्टांचे पुत्र कमलाकरभट्ट व लक्ष्मणभट्ट या दोघांनीं आपल्या सती गेलेल्या परमपूज्य मातेबद्दल अत्यंत हृदयस्पर्शी उद्गार काढिले आहेत. ' जिचें पदद्वय सकलकल्याणसमुच्चयाचें कारण आहे, जी भागीरथीची जणू सख्खी बहीण अशी माझी माता उमा हिचें सादर स्तवन करितों,' असें कमलाकरभट्ट म्हणतात; ' उमा नांव असल्यामुळें व अग्निप्रवेश केल्यामुळें जिची पार्वतीशीं स्पर्धा होते अशी प्रत्यक्ष भागीरथी, निर्मलचित्त, निरुपम सती ( माझी माता ) तिला सदा वन्दन करितों ' असें लक्ष्मणभट्ट म्हणतात.[15]

नारायणभट्टांचे द्वितीय पुत्र शंकरभट्ट हेहि मोठे मीमांसक होते. त्यांनीं शास्त्रदीपिका या ग्रंथावर टीका ( प्रकाश नांवाची ) लिहिली. शंकरभट्टांचा द्वैतनिर्णय म्हणून फार प्रसिद्ध ग्रंथ आहे. या ग्रंथांत कृष्णजन्माष्टमीव्रत, नवरात्रव्रत, संनिपाताशौच वगैरे विषयांत जीं भिन्नभिन्न मतें आहेत त्यांचा विचार करून मीमांसाशास्त्राच्या आधारें निर्णय दिले आहेत. हे निर्णय दाक्षिणात्य ग्रंथकारांच्या मतावर अवलंबून राहून दिले आहेत असें शंकरभट्टांनीं स्पष्ट सांगितलें आहे. या ग्रंथांत त्यांनीं स्वतःलाच ' मीमांसाद्वैतसाम्राज्यनीतिज्ञः ' असें म्हटलें आहे.[16] व्यवहारमयूखांत नीलकण्ठभट्टांनीं शंकरभट्टांची ( आपले वडिलांची ) फार स्तुति करून त्यांना परमपुरुषाचे अवतार व भिन्न अशा मीमांसामार्गाचें ( प्राभाकर व भाट्ट ) एकीकरण

१४ विद्याप्रद्योतनोद्द्योतखद्योतीकृतवादिनम् । पितरं रामकृष्णाख्यं वन्दे स्नेहभरान्वितम् ॥ आचाररत्न.

१५ स्पर्धामग्निनिवेशादुमया आप्तामुमासमाख्यातः। द्युनदीं निर्मलचित्तां मातरमेकां सतीं सदा वन्दे॥ आचाररत्नः सर्वकल्याणसंदोहनिदानं यत्पदद्वयम्। द्युनदीसोदरीमम्बामुमाख्यां नौमि सादरम् ॥ निर्णयसिन्धु व शूद्रकमलाकर.

१६ दाक्षिणात्यमते स्थित्वा धर्मद्वैतेषु निर्णयम् ।
तनुतेसौ विगाधैव नावमान्यः कथंचन ॥ द्वैतनिर्णय.

करणारे असें म्हटलें आहे. पूर्वमीमांसासूत्रांत प्रस्थापित केलेल्या सिद्धान्तांचें थोडक्यांत विवरण करणारा असा 'मीमांसाबालप्रकाश' हा ग्रंथ शङ्करभट्टांनीं लिहिला आहे. सर्वधर्मप्रकाश किंवा धर्मप्रकाश असा त्यांचा आणखी एक ग्रंथ आहे. निर्णयचन्द्रिका, व्रतमयूख, विधिरसायनदूषण, (अप्पय्यदीक्षितांच्या 'विधिरसायन' ह्या ग्रंथाचें खंडन करणारा ग्रंथ ) इत्यादि ग्रंथ त्यांनीं लिहिले. हें 'गाधिवंशानुचरित' त्यांनींच लिहिलें असून त्या ग्रंथाचे शेवटीं मृत झालेल्या होतकरू अशा पुतण्यासाठीं शंकरभट्ट दुःख करीत आहेत अशा मजकुरानें त्या ग्रंथाची परिसमाप्ति झाली आहे. गाधिवंशानुचरितांत शङ्कर-भट्टांनीं स्वतःबद्दल फारशी माहिती दिलेली नाहीं. शङ्करभट्टांच्या अनेक शिष्यांत सिद्धान्तकौमुदीचे कर्ते भट्टोजिदीक्षित हे एक होते.

नारायणभट्टांचा जन्म सन १५१३ त झाला. शंकर भट्ट हे त्यांचे द्वितीय चिरंजीव. नारायण भट्टांचे कनिष्ठ चिरंजीव गोविंदभट्ट ४८ वे वर्षी निधन पावल्याचा उल्लेख गाधिवंशानुचरितांत आहे. म्हणजे तो ग्रंथ लिहि-तांना शंकरभट्टांचें वय सुमारें ५५ वर्षांचें असावें. म्हणजे गाधिवंशानुचरित हा ग्रंथ सन १५९०—९५ चे सुमारास लिहिला असावा. तोडरमल्लाच्या टोडरानंद ह्या ग्रन्थाचा उल्लेख शंकरभट्टांच्या द्वैतनिर्णयांत आहे. राजा तोडरमल्ल सन १५८६ मध्यें वारला. तेव्हां द्वैतनिर्णयहि त्याच सुमारास रचिला असावा.

नारायणभट्टांचे कनिष्ठ पुत्र गोविन्दभट्ट यांना चार पुत्र होते व गोविंद भट्ट हे ४८ वे वर्षी निधन पावले, असें गाधिवंशानुचरितांत सांगितलेलें आहे.

नारायणभट्टांचे कनिष्ठ बन्धु माधवभट्ट यांना तीन पुत्र होते, त्यांचीं नांवें— विश्वनाथ, रघुनाथ व प्रभाकर. विश्वनाथभट्ट हे प्राभाकर व भाट्ट मत, न्यायवैशेषक, सांख्ययोग ह्यांमध्यें अत्यंत निष्णात होते, असें प्रभाकरानें आपल्या रसप्रदीप ह्या ग्रंथांत म्हटलें आहे. याच विश्वनाथाजवळ प्रभाकरानें

---

१७ विरोधिमार्गद्वयदर्शनार्थं द्वेधा बभूवात्र परः पुमान्यः ।
श्रीशंकरो भट्ट इहैकरूपो मीमांसकाद्वैतधुरीणकार ॥ व्यवहारमयूख.

१८ भाट्टे भट्ट इवापरः कणभुजः शास्त्रे कणादः स्वयं । साक्षदक्षपदो मतेक्षचरणे पातञ्जले प्राञ्जलः । ख्यातः सांख्यमते चिरं गुरुमते सिद्धान्तदीक्षागुरुर्ज्यायांस्तनुजो विभाति भुवने श्रीविश्वनाथः कृती ॥ रसप्रदीप ८ वा श्लोक.

सर्व विद्यांचें अध्ययन केलें असें आपल्या रसप्रदीपांत त्यानें म्हटलें आहे.[19] रघुनाथभट्टानें आन्हिकपद्धति व कालतत्त्वविवेचन ह्या नांवाचे ग्रन्थ लिहिले. कालतत्त्वविवेचन हा ग्रन्थ विक्रमसंवत् १६७७ कार्तिक वद्य ७ रविवारीं (६ नवंबर सन १६२० ) पुरा झाला. माधवभट्टाचा कनिष्ठ पुत्र प्रभाकर यानें रसप्रदीप हा ग्रन्थ वयाचे एकोणिसावे वर्षी संवत् १६४० ( सन १५८४) मध्यें रचिला.

नारायणभट्टांचे ज्येष्ठ पुत्र रामकृष्णभट्ट यांना तीन पुत्र होते, दिनकर भट्ट उर्फ दिवाकरभट्ट, कमलाकरभट्ट व लक्ष्मणभट्ट.--दिनकरभट्ट हे महाविद्वान् होते. कमलाकरभट्टांनीं आपल्या निर्णयसिन्धूंत म्हटलें आहे कीं, बिंदुमाधवाच्या पदारविंदीं ज्यानें आपला देह मिलिंदायमान केला, त्या ज्येष्ठ भ्रात्याला म्हणजे भट्ट दिवाकराला वन्दन[20] करितों. लक्ष्मणभट्टांनीं आचाररत्नांत याच्याहि पुढें जाऊन त्यांची अशी स्तुति केली आहे कीं, ज्याप्रमाणें आदिवराहानें जलांत बुडालेली पृथ्वी वर काढिली; त्याप्रमाणें ज्यानें आपल्या कुलाची प्रतिष्ठा उच्चपदाला नेली, आणि गंगेप्रमाणें ( पवित्र ) विद्या ज्याच्यापासून प्रसृत झाली त्या ज्येष्ठ भ्रात्याची म्हणजे भट्टदिवाकराची मी स्तुति[21] करितों. या दिनकरभट्टांनीं शास्त्रदीपिकेवर भाट्टदिनकरमीमांसा किंवा भाट्टदिनकरी, शान्तिसार, दिनकरोद्योत किंवा भाट्टदिनकरोद्योत हे ग्रन्थ लिहिले. यांपैकीं शेवटचा ग्रंथ त्यानें पुरा केला नाहीं. तो त्याचा पुत्र गागाभट्ट यानें पुरा केला हें पुढें दाखविलें आहे. कमलाकरभट्ट हे अत्यंत विद्वान्, अनेकशास्त्रपारंगत होते. नारायणभट्टांचे खालोखाल भट्टवंशांत कमलाकरभट्टांची योग्यता आहे असें म्हणण्याला हरकत नाहीं. यांनीं केलेल्या बावीस ग्रंथांची यादी शान्तिरत्न या ग्रंथाच्या शेवटीं दिलेली आहे ( माझी व्यवहारमयूखाची आवृत्ति प्रस्तावना पान १२ या ठिकाणीं ती यादी दिलेली आहे ). त्याचप्रमाणें

---

१९ श्रीविश्वनाथविबुधप्रतिपन्नविद्यः श्रीमान्प्रभाकर इमं व्यतनोत्प्रबन्धम् ॥ रसप्रदीप ( शेवटचे श्लोक. )

२० बिन्दुमाधवपादाब्जरोलम्बीकृतविग्रहम् । ज्यायांसं भ्रातरं भट्टदिवाकरमुपास्महे ॥ निर्णयसिंधु श्लोक ३

२१ येनोध्दृता स्वस्य कुलप्रतिष्ठा महावराहेण महीव तोयात् । गङ्गेव विद्याभिससार यस्माद् दिवाकरं नौमि तमग्रजाग्रयम् ॥ आचाररत्न ६ वा श्लोक.

'विवादताण्डव' या नांवाच्या त्यांच्या ग्रंथांतहि बावीस ग्रन्थ लिहिल्याचा उल्लेख आहे. त्यांचे ग्रन्थ सर्व शास्त्रांत आहेत. म्हणजे तर्क, योग, व्याकरण, न्याय, प्राभाकर व भाट्टमत, वेदान्त, श्रौत, साहित्य व धर्मशास्त्र या सर्वांत त्यांची गति अप्रतिहत[२२] होती. त्यांनीं आपल्या अनंत नांवाच्या मुलासाठीं काव्यप्रकाशावर व्याख्या लिहिली. कमलाकरभट्टांचे प्रमुख ग्रन्थ म्हणजे निर्णयसिन्धु, शूद्र-कमलाकर, विवादताण्डव, काव्यप्रकाशव्याख्या, गोत्रप्रवरदर्पण, शान्तिरत्न हे होत. कमलाकरभट्टांचा निर्णयसिन्धु हा ग्रंथ विक्रम संवत् १६६८ ( सन १६१२ ) मध्यें झाला. हा त्यांच्या पहिल्या ग्रंथांपैकीं असल्यामुळें कमलाकर भट्टांचा ग्रंथरचनाकाल १६१० पासून १६४० मानण्यास हरकत नाहीं. कमलाकरभट्टांचे धाकटे बन्धु लक्ष्मणभट्ट यांनीं कमलाकरभट्टांजवळच अध्ययन[२३] केलें व आचाररत्न, गोत्रप्रवररत्न वगैरे निबन्ध लिहिले.

नारायणभट्टांचे द्वितीय पुत्र शङ्करभट यांना रङ्गनाथ, दामोदर, नृसिंह व नीलकंठ असे चार पुत्र होते असें दिसतें. रावसाहेब मंडलिक यांनीं आपल्या व्यवहारमयूखाचे प्रारंभीं जो वंशवृक्ष दिला आहे त्यांत शङ्कर-भट्टांचे नीलकण्ठ व दामोदर असे दोन पुत्र दाखविले आहेत. भट्टवंशका-व्यांतहि शंकरभट्टांच्या ह्या दोनच पुत्रांचीं नांवें आहेत. परंतु हें बरोबर नाहीं. व्यवहारतत्त्व म्हणून नीलकण्ठभट्टांचा एक ग्रन्थ व्यवहारमयूखाच्या माझ्या आवृत्तींत शेवटीं पुरवणींत दिला आहे. त्याचे शेवटचे वाक्यावरून शङ्करभट्टांना रङ्गनाथ किंवा रगङ्भट्ट, दामोदर, नृसिंह आणि नीलकण्ठभट्ट असे चार पुत्र होते असें दिसतें. सन १८८० त काशी येथें छापलेल्या नीतिमयू-खाचे अंतींहि हीं चार नांवें असून नीलकण्ठभट हे सर्वांत धाकटे बन्धु, असें म्हटलें आहे. द्वैतनिर्णयांत शङ्करभट्टांनीं म्हटलें आहे कीं, माझे पुत्र दामोदर भट्ट यांनीं द्वैतनिर्णयपरिशिष्ट लिहिलें आहे. व्यवहारतत्त्वांत नीलकण्ठभट्टांनीं माझे ज्येष्ठ बन्धु दामोदरभट्ट यांनीं कलिवर्ज्यनिर्णय नांवाचा ग्रंथ केला आहे

२२ तर्के दुस्तर्कमेधः फणिपतिभणितिः पाणिनीये प्रपञ्चे । न्याये प्रायः प्रगल्भः प्रकटितपटिमा भाट्टशास्त्रप्रघट्टे । प्राभः प्राभाकरीये पथि प्रथितदुरूहान्तवेदान्तसिन्धुः । श्रौते साहित्यकाव्ये प्रचुरतरगतिर्धर्मशास्त्रेषु यश्च ॥ काव्यप्रकाशव्याख्या.

२३ अधीत्य लक्ष्मणाख्येन कमलाकरसोदरात् ॥ आचाररत्नं सुधिया यथामति वितन्यते ॥ आचाररत्न ७ श्लोक.

असें सांगितलें आहे. गाधिवंशानुचरितांत शङ्करभट्टांनीं दामोदर, नृसिंह व नीलकण्ठ अशीं तीनच नांवें आपल्या पुत्रांचीं दिलीं आहेत. वरील थोड्या परस्परविरोधी गोष्टींमुळें शंकरभट्टांना रंगनाथ नांवाचा ज्येष्ठ पुत्र होता कीं काय असा संशय येतो. कदाचित् रंगनाथ नांवाचा मुलगा असून तो अल्पवयांत निधन पावला असण्याचा संभव आहे व म्हणून शंकरभट्टांनीं आपल्या वृद्धपणीं लिहिलेल्या गाधिवंशानुचरितांत त्याचा उल्लेख केला नाहीं. नीलकण्ठभट्टांनीं भगवंतभास्कर म्हणून धर्मशास्त्रावर प्रचण्ड ग्रन्थ लिहिला. त्याचे बारा मयूख आहेत ते संस्कार, आचार, काल अथवा समय, श्राद्ध, नीति, व्यवहार, दान, उत्सर्ग, प्रतिष्ठा, प्रायश्चित्त, शुद्धि, शान्ति. नलिकण्ठभट्ट हे कमलाकरभट्टांचे चुलतबन्धु त्यांच्या सारखेच गाढे विद्वान् होते. व ब्रिटिश कोर्टांत दायभागाचे बाबतींत गुजराथ, मुंबई, उत्तर कोंकण वगैरे प्रांतांत त्यांचे ग्रंथाला मिताक्षरेपेक्षांहि जास्त प्रामाण्य मिळाल्यामुळें त्यांची फार प्रसिद्धी झाली आहे. त्यांचेबद्दल विशेष माहिती व्यवहारमयूखाचे प्रस्तावनेंत मीं दिली आहे. कमलाकरभट्टांचे पुत्र अनन्तभट्ट रामकल्पद्रुम या ग्रंथाचे कर्ते; दामोदरभट्ट यांचे पुत्र सिद्धेश्वरभट्ट संस्कारमयूख या ग्रंथाचे कर्ते; नीलकण्ठभट्टांचे पुत्र शङ्करभट्ट कुण्डभास्कर, व्रतार्क वगैरे ग्रंथांचे कर्ते व भानुभट्ट द्वैतानिर्णयसिद्धान्तसंग्रह, होमनिर्णय वगैरे ग्रंथांचें कर्ते आणि त्यांचे वंशज व इतर भट्ट घराण्यांतील पुरुष यांचें स्थलाभावामुळें वर्णन करीत नाहीं.

रामकृष्णभट्टांचे पुत्र दिनकर ऊर्फ दिवाकर यांना विश्वेश्वरभट्ट नांवाचा पुत्र झाला. यालाच ' गागाभट्ट म्हणतात. गागाभट्टांनींच दिनकरोद्योतांत सांगितलें आहे कीं, वडिलांनींच माझें नांव लाडानें गागाभट्ट असें ठेविलें.[२४] गागाभट्टांनीं अनेक शास्त्रांवर ग्रंथ रचिले. पण मुख्य भर मीमांसा व धर्मशास्त्र यांवर आहे. मीमांसाकुसुमाञ्जलि या नांवाचा ( पूर्वमीमांसेची वृत्ति ) त्यांनीं ग्रंथ लिहिला आहे. याचा उल्लेख भाट्टचिन्तामणींत त्यांनीं केला आहे.[२५]

२४ मीमांसार्णवकर्णधारविबुधः श्रीभट्टनारायणस्तद्वंशस्य करीरतां भजति या विश्वेश्वराख्यः कृती । गागाभट्ट इति प्रथां दिनकरात् प्राप्तः पितुर्लालनात् तेनाचार निबन्धनो दिनकरोद्योतोधुना पूर्यते ॥ बिकानेर हस्तालिखिताचा कॅटलॉग पान ३८६ ( पूर्तकाण्ड ) व पान ४४५ ( राज्याभिषेकपद्धति ). येथे वंशशब्दाचे दोन अर्थ आहेत.

२५ इदं गुरुमतं तु शाब्दीहितसूत्रवृत्तौ मया विचार्य कुसुमाञ्जलौ बहु च दूषितं भूषितम् । अपेक्षितमथाप्युपेक्षितमिदं कठोरत्वतः शिशुप्रतिविबोधनार्थकृतभाट्टचिन्तामणौ ॥ भाट्टचिन्तामणि पान ८८ ( चौखाम्बा सीरीज. )

गागाभट्टांनीं पूर्वमीमांसेवरच भाट्टचिन्तामणि हा ग्रंथ लिहिला आहे. यांत प्रत्येक सूत्राचा अर्थ न सांगतां पूर्वमीमांसेंतील प्रमुख प्रमुख सिद्धान्त (म्हणजे ज्ञानप्रामाण्यविचार, प्रत्यक्षादि प्रमाणविचार, ईश्वरवाद, शक्तिवाद, सृष्टि-प्रलयविचार, विधितद्भेदप्रकारनिरूपण, भावार्थवाद, नञर्थवाद इत्यादि, घेऊन त्यांचा ऊहापोह केलेला आहे. गागाभट्टांनीं चंद्रालोक या अलंकार शास्त्रग्रंथावर राकागम अथवा सुधा या नांवाची टीका लिहिली. गागाभट्टांचा फार मोठा असा ग्रंथ म्हणजे दिनकरोद्द्योत हा होय. हा धर्मशास्त्रावर आहे. याची सुरवात गागाभट्टांचे वडील दिनकरभट्ट यांनीं केली. याचे आचार, आशौच, काल, दान, पूर्त किंवा इष्टापूर्त, प्रतिष्ठा, प्रायश्चित्त, वर्षकृत्य, व्यवहार, व्रत, शूद्र, श्राद्ध आणि संस्कार इतके भाग आहेत. बहुतेक सर्वांचे शेवटीं गागाभट्टांनीं पूर्ण ( परिपूरित ) केल्याचा उल्लेख आहे. इष्टापूर्तदिन-करोद्द्योतांत त्यांनीं स्पष्टच म्हटलें आहे कीं, सुगम असल्यामुळें दिनकरभ-ट्टांनीं या विषयाची उपेक्षा केली होती; पण मी 'पूर्त' या विषयावर लिहून पूर्तता[२६] करितों. दिनकरोद्द्योत रचिण्याचें काम फार वर्षें चाललें असलें पाहिजे. इण्डिया ऑफिस कॅटलॉगमधील ( पान ५०४ नंबर १६०६) व्रतोद्योत या हस्तलिखितावर संवत् १७०९ ( सन १६५२–५३) हें वर्ष आहे. तसेंच बौधायनसूत्राप्रमाणें निरूढ पशुबन्धप्रयोग, व पिण्डपितृयज्ञप्रयोग हे दोन ग्रंथ त्यांनीं लिहिले. याशिवाय गागाभट्टांचा प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे कायस्थधर्मदीप ( अथवा-प्रदीप ) हा होय. हा मुंबईत १८७३ सालीं छापला आहे. या ग्रंथाचें वर्णन इण्डिया आफीस कॅटलाग पान ५२५ येथें केलेलें आहे. हा ग्रंथ शिवाजीला राज्याभिषेक केल्यावर लिहिलेला आहे. यांत अवरंगजेब, राजगिरि ( रायगड ), जीजा, बालाजी कायस्थ ( महाराजांचे प्रधान असा निर्देश केलेला आहे ) यांचे उल्लेख असून कायस्थांचे संस्कार वगैरे गोष्टींचें वर्णन केलेलें आहे. शिवाजी महाराजांच्या वंशाला शिशुङ्गवंश म्हटलें आहे. हा ग्रंथ शिवाजी महाराजांना अभिषेक शके १५९६ ज्येष्ठ शु॥ १३ ( ६ जून १६७४ ) झाला त्यानंतर लागलाच लिहिलेला आहे. सुज्ञानदुर्गोदय म्हणून गर्भाधानादि सोळा

---

२६ नत्वा दिनकरं तातं सौगम्यात्तदुपेक्षितः । पूर्ते दिनकरोद्योतस्तत्सुतेन प्रपूर्यते ॥

संस्कारांवर गागाभट्टांनीं ग्रंथ लिहिला आहे ( राजेन्द्रलाल मित्र यांचा बिकानेर कॅटलाग पान ४७५ ). कुमारिलभट्टांनीं पूर्वमीमांसा सूत्राच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादावर श्लोकरूपानें श्लोकवार्तिक लिहिलें त्याच धर्तीवर गागाभट्टांनीं पूर्वमीमांसेच्या बारा अध्यायांवर ( एकपाद वजा करून ) शिवार्कोदय या नांवाचा शिवछत्रपतींच्या आज्ञेनें ग्रंथ लिहिला. शिवछत्रपतींच्या यशाचा जणूं कांहीं तो ग्रंथ स्तम्भच आहे व तिन्ही लोक ह्या यशोध्वजाच्या शुभ्रत्वानें श्वेत होऊन गेले असें यांत प्रारंभीं वर्णन आहे.[२७] श्लोकवार्तिक हा ग्रंथ अपूर्ण राहिल्यामुळें शिवछत्रपतींनीं तो गागाभट्टांकडून पुरा करून घेतला. शिव छत्रपतींच्या आज्ञेला मान देऊन हा ग्रंथ लिहून प्रतिस्पर्ध्यांच्या कीर्तीवर वरचढपणा करण्यांत चतुर्थाश्रमाच्या ( संन्यासाच्या ) धर्माचा भंग केल्याचा दोष घडला तो विद्वानांच्या कण्ठमार्गीं ( हा ग्रंथ ) गेल्यानुळें ( म्हणजे या ग्रंथांचें परिशीलन विद्वानांनीं केल्यामुळें ) गुणरूपानें परिणत होवो, ( कारण ) दूषित झालेला प्रवाह सागरांत मिसळला म्हणजे तो पावनच होतो, असें ह्या ग्रंथाचे शेवटीं म्हटलें आहे.[२८] यावरून गागाभट्टांनीं संन्यास घेतला होता व संन्यास घेतल्यावर शिवार्कोदय हा ग्रंथ लिहिला असें दिसतें.[२९]

आतां शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाशीं गागाभट्टांचा संबंध कसा आला तें थोडक्यांत पाहूं. भट्टवंश काव्यांत स्वामी रामदासांच्या आज्ञेनें शिवरायांनीं गागाभट्टांना आणविलें, असें वर्णन ( सर्ग ५ श्लोक ७–८ ) आहे. परंतु या पुस्तकांत ह्या मजकुरावर जी टीप दिली आहे त्यावरून अन्ताजी रामचंद्र हरडीकर यांनीं केलेल्या शिवविजय ग्रंथावरून हा इतिहास घेतलेला आहे

२७ श्रीमद्भोसलवंशभूषणमणिक्षोणीशशाहात्मजछत्राधीशशिवाक्षितीशयशसःस्तंभो-निखातोऽपरः। गागाभट्टमनीषिणाधिधरणि ग्रन्थः शिवार्कोदयो येनाबद्धयशोध्वजेन सकलैवाश्वेति लोकत्रयी ॥ शिवार्कोदय ( अल्वार कॅटलॉग पान ३७ ) दुसरा श्लोक.

२८ दुःखं सतां तदसमाप्तिकृतं शिवेन छत्राधिपेन सुविचिन्त्य समापितः सः ॥ तस्यानुरोधादिह वादिवर्णाधिक्ये चतुर्थाश्रमभङ्गदोषः । गुणोस्तु विद्वत्कविकण्टमाप्तो दुष्टोपि पुण्योऽब्धिगत ( तः ? ) प्रवाहः ॥

२९ वरील श्लोकाचा दुसरा एक अर्थ करितां येईल. तो असा कीं, ह्या ग्रंथांत पूर्वमीमांसासिद्धान्ताचें श्रेष्ठत्व प्रतिपादिल्यामुळें चतुर्थाश्रम :म्हणजे संन्यास याचा भङ्ग केल्याचा ( म्हणजे तो आश्रम त्याज्य किंवा गर्ह्य आहे असें प्रतिपादन केल्याचा ) दोष घडतो.' परंतु हा अर्थ ओढून ताणून आणावा लागतो व तो बाकीच्या दोन चरणांशीं चांगलासा जुळत नाहीं.

असें स्पष्ट दिसतें, म्हणून प्रत्यंतर पुराव्याशिवाय त्याला विशेष महत्व नाहीं. निरनिराळ्या बखरींत या संबंधानें जी माहिती आहे तिच्या तपशिलांत फरक आहे. कृष्णाजी अनंत सभासद यांचे बखरींत ( रावसाहेब साने यांनीं सन १८८९ त छापलेली ) राज्याभिषेकाबद्दल दोन पानें मजकूर आहे ( पान ६४—६६ ) त्यांतील महत्त्वाचा भाग खालीं उतरून घेतला आहे.[३०] त्यावरून गागाभट्ट स्वतःच राजांचे भेटीस आले व त्यांनीं राजांचे मनांत प्राचीनपद्धतीनें अभिषेक करवून घेण्याचें भरविलें आणि गागाभट्ट यांणीं राजे शिसोदे वंशांतील आहेत असा शोध लावून त्यांचा व्रतबंध केला आणि मग वैदिक पद्धतीनें राज्याभिषेक केला. सभासदांच्या बखरीच्या मागून शके १७४० त लिहिलेल्या श्रीशिवदिग्विजयांत ( बडोदें शके १८१७ ) राज्याभिषेकाचें वर्णन विस्तारानें दिलें आहे ( पान ४१०—४३१ ). या ग्रंथांत राज्याभिषेक करून घेण्याचें कारण निराळें दिलें आहे. शिर्के, मोहिते, महाडिक वगैरे प्राचीन सरदारी घराण्यांतील पुरुषांस शिवाजी राजे यांचेपुढें सेवक किंवा कमीपणाचे नात्यानें वागण्यांत वैषम्य वाटूं लागल्यावरून राजांनीं बाळाजी आवजीस उपाय विचारितां त्यानें सांगितलें कीं, जो छत्रसिंहासना-

---

३० पुढें वेदमूर्ति राजश्री गागाभट म्हणून वाराणशीहून राजियाची कीर्ति ऐकून दर्शनास आले. भट गोसावी, थोर पंडित, चार वेद, सहा शास्त्रें योगाभ्यास संपन्न, ज्योतिषी, मान्त्रिक, सर्वविद्येनें निपुण, कलयुगींचा ब्रह्मदेव, असे पंडित, त्यांस राजे व कारकून सामोरे जाऊन भेट घेऊन सन्मानें आणिलें. त्यांची पूजा नाना प्रकारें रत्नखचित अलंकार पालखी, घोडे, हत्ती घेऊन द्रव्यहि उदंड देऊन पुजिलें. गागाभट्ट बहुत संतुष्ट झाले. भटगोसावी यांचे मतें मुसलमान बादशहा तक्तीं बसवून, छत्र धरून, पातशाही करितात आणि शिवाजीराजे यांणींहि चार पातशाही दबाविल्या आणि पाऊणलाख घोडा लष्कर गडकोट असें असतां त्यांस तक्त नाहीं, याकरितां मऱ्हाठा राजा छत्रपति व्हावा असें चित्तांत आणिलें; आणि ( हें ) राजियासहि मानिलें. अवघे मातबर लोक बोलावून आणून विचार कारितां सर्वांचे मनास आलें. तेव्हां भट गोसावी म्हणूं लागले कीं, तक्ती बसावें. तेव्हां राजियाचा वंशाचा शोध करितां राजे शुद्ध क्षत्री शिसोदे उत्तरेहून दक्षिणेस एक घराणें आलें तेंच राजियाचें घराणें असें शोधिलें. उत्तरेचे क्षत्रियांचे व्रतबंध होतात त्याप्रमाणें व्रतबंध करावा हा विचार आर्धी करून भट गोसावीं यांणीं राजियाचा क्षेत्रीं व्रतबंध केला. शुद्ध क्षत्रिय आर्धी केला. अपार द्रव्य धर्म केला ××× पुढें तक्तारूढ व्हावें. तक्त सुवर्णाचें बत्तीस मणाचें सिद्ध करविलें. ×× जडित सिंहासन सिद्ध केलें. रायरीचें नांव रायगड म्हणोन ठेविलें ×× सप्त महानदियांचीं उदकें व थोर थोर नदियांचीं उदकें व समुद्रांचीं उदकें, तीर्थक्षेत्र नामांकित तेथील तीर्थोदकें आणिलीं. सुवर्णाचे कलश व तांबे केले. आठ कलश व

धीश राजा असतो त्यास ईश्वरसदृश लोक मानितात. बाळाजी आवजीनेंच सांगितलें कीं, 'काशीस गागाभट्ट महासमर्थ ब्राम्हण आहेत त्यांचे आज्ञेनें जें करणें तें केलें असतां राजमान्य निर्बाध होतें. त्याजकडे कोणी पाठवून तेथून शास्त्रार्थ आणवून त्यांचे हातून हा विधि केला असतां उत्तम.' पुढें काशीस बाळाजी आवजीनें रामचंद्र बावास पाठविलें व त्यानें गागाभट्टां-जवळ बोलणें केलें. गागाभट्टांचें म्हणणें पडलें कीं 'कांहीं क्षत्रियान्वय असला पाहिजे तेव्हां राज्याभिषेकास अधिकार.' बाळाजी आवजीनें लिहिलें कीं, राजांचा उदेपुराशीं संबंध आहे. पुष्कळ पत्रव्यवहार होऊन गागाभट्ट समक्ष असल्याशिवाय अखेर निर्णय होणार नाहीं असें ठरलें. म्हणून गागाभट्टांस दुसऱ्या दहावीस ब्राह्मण, पंडित शिष्यांसह शके १५९५ त साताऱ्यास आणण्यांत आलें. त्यांना आणावयास भालचंद्रभट्ट पुरोहित व सोमनाथभट्ट कात्रे गेले होते. गागाभट्टांची भेट राजांनींहि घेतली. गागाभट्टांनीं व्रतबंध करावा असें ठरविलें व रायगड ही राजधानी करण्याचें ठरवून, योग्य राज-वाडा व इतर इमारती, सिंहासन कसें असावें वगैरे ठरवून त्याप्रमाणें घडवून

---

आठ तांबे यांनीं अष्ट प्रधानांनीं राजियास अभिषेक करावा, असा निश्चय करून सुदिन पाहून मुहूर्त पाहिला. शालिवाहन शके १५९६ जेष्टमासीं शुद्ध १३स मुहूर्त पाहिला. ते दिवशीं राजियांनीं मंगलस्नानें करून श्रीमहादेव व श्री भवानी कुल-स्वामी उपाध्ये प्रभाकर भट्टाचे पुत्र बाळंभट कुलगुरु व भट गोसावी वरकड श्रेष्ठ भट्ट व सत्पुरुष अनुष्ठित यांची सर्वांची पूजा यथाविधि अलंकार वस्त्रें देऊन सर्वांस नमन करून अभिषेकास सुवर्ण चौकावर बसले. अष्टप्रधान व थोर थोर ब्राह्मणांनीं स्थळोस्थळींचीं उदकें करून सुवर्णकलशपात्रीं अभिषेक केला. दिव्य वस्त्रें दिव्य अलं-कार घेऊन सर्व पूज्य मंडळीस नमस्कार करून सिंहासनावर बसले. + + + पूर्वीं कृतयुगीं त्रेतायुगीं द्वापारीं कलयुगाचे ठायीं पुण्यश्लोक राजे सिंहासनीं बैसले. त्या पद्धतीप्रमाणें सर्वहि साहित्य सिद्ध केलें. अष्टखांबीं अष्टप्रधान उभे राहिले. त्यांचीं नांवें. बितपशील. × × × छत्र जडावाचें मोतीलग झालरींचें करून मस्तकावर धरिलें. छत्रपति असें नांव चालविलें. कागदीं पत्रीं स्वस्ति श्रीशक, सिंहासनावर बसले या दिवसापासून नियत चालविला. पन्नास सहस्र ब्राह्मण वैदिक मिळाले. या वेगळे तपोनिधि व सत्पुरुष, संन्यासी, अतिथि, मानभाव, जटाधारी, जोगी जंगम नाना जाती मिळाले. तितक्यांस चार मास मिष्टान्न उनफे चालविलें. × × गागाभट्ट मुख्य अर्ध्वयु त्यांस अपरिमित द्रव्य दिलें. संपूर्ण खर्चाची संख्या एक क्रोड बेताळीस लक्ष होन झाले. × × × येणेंप्रमाणें राजे सिंहासनारूढ झाले. या युगीं सर्व पृथ्वीवर म्लेंच्छ बादशाह, मऱ्हाठा पातशाह येवढा छत्रपति झाला. ही गोष्ट कांहीं सामान्य झाली नाहीं.

आणिलें. शके १५९६ ज्येष्ठ शुा ५ स गुरुवारीं राजांचा व्रतबंध झाला. त्या वेळीं रामदासस्वामीहि हजर होते. गागाभट्टजी रामदासस्वामींच्या चरणीं मस्तक ठेऊन अनन्यभावें शरण आले. पुढें राज्याभिषेक शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध १५ ( ? १३ ) गुरुवारीं झाला. गागाभटजी दोनतीन संवत्सर महाराजांकडे होते, असें पान ४४६ वर म्हटलें आहे. 'भटजींचा काशीस जाण्याचा' मनोदय दोनतीन संवत्सर राहिलों, आतां निरोप दिला पाहिजे व मंडळीचीहि विदागी झाली पाहिजे.' शिवछत्रपतींनीं गागाभटजींस 'तीन लक्ष होन दक्षणा वगैरे खर्चास दिले.'

चित्रगुप्तविरचित शिवाजीमहाराजांची बखर आहे. तींत ( काव्येतिहाससंग्रह प्रत ) गागाभट्ट व शिवराज्याभिषेक प्रकरण बऱ्याच विस्तारानें दिलेलें आहे ( पान ९५ ते १०८ ). यांतहि राजांची कीर्ति ऐकून गागाभट्ट राजांचे भेटीस आले असें लिहिलें आहे. ही बखर कृष्णाजी अनंत सभासद यांनीं लिहिलेल्या बखरीचा 'भावगर्भ चित्तांत संपूर्ण मनन' करून लिहिली असल्यामुळें दोन्ही बखरींत महत्त्वाच्या गोष्टींत एकवाक्यता असणें साहजिक आहे. गागाभट्टांची राजांनीं उत्तम बडदास्त ठेविली व षोडशगुणी तांबूल तबकीं भरून सन्मुख ठेऊन दक्षणा होन पातशाही नाणें सुमारें एक लक्ष दिधलें.' गागाभट्टांनीं राजास म्हटलें:—'संपूर्ण पृथ्वी यवनमय होऊन सिंहासनारूढ यवन जहाले. ××× सार्वभौमत्व अगदीं यवन करूं लागले. ××× तुम्ही पराक्रमें दक्षिणेंतील चारी पातशहा प्रतापें जिंकिलें. ××धन्य तुमचे पराक्रमाची. ××× यास्तव तुम्हांस तक्तारूढ करावें, संपूर्ण अधिपाधिप तुम्हांस या जगीं छत्रपति म्हणवून तुमचें राज्य व्हावें ही इच्छा मनापासून उत्कण्ठित जहाली आहे. तुम्ही सिंहासनाधीश्वर जहालियाविना जगीं भूषण प्रताप नाहीं. एतद्विषयीं ईर्षा संपूर्ण ब्राह्मणवृन्दास लागली आहे.' यावरून गागाभटजींनींच राजांना सिंहासनाधीश्वर होण्यास सुचविलें असें सभासदबखरीप्रमाणें चित्रगुप्तबखरहि सांगते. शिवाजी महाराजांनीं अनेक हेतु मनांत धरून आपल्याला प्राचीन पद्धतीप्रमाणें अभिषेक करून घेतला असला पाहिजे. बखरकार आपआपल्या समजुतीप्रमाणें कोणी एक, तर कोणी दुसरा, याप्रमाणें एकेका हेतूवर भर देतात, असें म्हणावयाला हरकत नाहीं. गागाभट्ट आपण होऊन राजांस भेटावयास आले किंवा राजांचे मनांत अभिषेकाची कल्पना घोळूं लागतांच त्यांनीं त्या काळच्या

काशींतील पंडित घराण्यांत अग्रगण्य, परममीमांसक व धर्मशास्त्रज्ञ असे गागा-भट्ट यांना बोलाविलें, हें निश्चयात्मक ठरविणें आतां बहुतेक अशक्य आहे. पण संभव असा दिसतो कीं, राजांनींच त्यांचेकडे माणसें पाठवून त्यांना आमंत्रण दिलें असावें. सभासदी बखरीप्रमाणें चित्रगुप्त बखरींतहि, महाराज मूळ चितोड-कर राण्याचे वंशांतील असा शोध लागणें, राजांना 'गोप्रसव करून व्रतबंध-युक्त शुद्ध क्षत्री आधीं करणें', सुवर्णाचें सिंहासन गागाभट्टजींच्या आज्ञेनुसार तयार करणें, वगैरे गोष्टी (मात्र ज्यास्त विस्तारानें व बाणभट्टाचे भाषेप्रमाणें डौलदार रीतीनें) वर्णिलेल्या आहेत. महाराजांस राज्याभिषेक 'चंद्रगुरु योगिणी यथास्थित विलोकून घवाड वोहरा (होरा?) अमृतसिद्धियोग ज्येष्ठ मास शुद्ध त्रयोदशी मंदवासर आनन्दनाम संवत्सरीं परम सुमुहूर्तीं' झाला. सभासद बख-रींत दिवस दिला नाहीं. शिवदिग्विजयांत पौर्णिमा व गुरुवार दिला आहे. पण तेथें कांहीं तरी चूक आहे. चित्रगुप्त बखरींत त्रयोदशी व शनिवार दिलेला आहे.

चित्रगुप्तप्रतींत महाराजांनीं नवीन शिवशक राज्याभिषेकदिनापासून प्रकट केला असें सांगितलें आहे. आणि गागाभट्टांनीं 'पूर्वराजपद्धतीप्रमाणें समस्त ब्राह्मणांचे संमतें निर्णयार्थ करून' राजपत्रें लिहावयाची पद्धत घालून दिली असें सांगितलें आहे.

राज्याभिषेक शक १३७ मध्यें लिहिलेली चिटणीसकृत शिवछत्र-पतींची बखर ही तुलनेनें बरीच अर्वाचीन असल्यामुळें प्रत्यंतर पुराव्याखेरीज विशेष विश्वासार्ह नाहीं. यांत (१८९४ ची आवृत्ति) पान १५७-१६७ येथें राज्याभिषेकाची हकीकत आहे. शिवाजी महाराजांस स्वत:सच आपण महाराणा सजणसिंह यांचे वंशांतील असून आपण सिंहासनाधीश्वर व्हावें असें वाटूं लागलें, म्हणून त्यांनीं श्रीची प्रार्थना केली व श्रींनीं स्वप्नांत दृष्टान्त दिला, मग मातुश्रींची व रामदास स्वामींची अनुज्ञा घेतली. बाळाजी आवजी चिटणीस यांणीं विज्ञप्ति केली कीं, पंडितधुरीण गागाभट्ट अनायासें पैठण येथें महाराजांची कीर्ति ऐकून आले आहेत. त्यांस व पैठणचे पंडितांस आणून त्यांचे विचारें सिद्धता करावी. शिवाजी महाराज हे 'उदेपूरच्या राणाजीचे' 'घराणेंतील वंश सिसोदे कुळपरंपरा पुरुष पिढ्या लावून या प्रांतीं हिंदुस्थानांतून आले' असा

शोध, ज्येष्ठ शुद्ध पंचमीस व्रतबंध, ज्येष्ठ शुा १३ गुरुवारीं राज्याभिषेक, इत्यादि वर्णन दुसऱ्या जुन्या बखरींप्रमाणेंच या बखरींत आहे.

संवत् १८८६ (सन १८३०) मध्यें बडोदें येथें लिहिविलेल्या 'शिवाजीप्रताप' (बडोदें प्रत शके १८१७) पान १३५-१३८ येथें राज्याभिषेकाची त्रोटक हकीकत आहे. यांत गागाभट्ट यांस आणण्याकरितां चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंचे कुलाचार्य टकले यांस पाठविलें असें म्हटलें आहे. शिवदिग्विजयांत भालचंद्रभट पुरोहित व सोमनाथभट कात्रे यांस पाठविलें, असें आहे. मल्हार रामराव चिटणीसकृत बखरींत केशव पंडित भालचंद्र भट पुरोहित (बाळाजी आवजीचें गुरुस्थान) व सोमनाथ कात्रे यांस पाठविलें असें म्हटलें आहे. यांत महाराजांचा व्रतबंध एकुणपन्नासावे वर्षी झाला असें सांगितलें आहे. मल्हार रामराव चिटणीसकृत बखरींत व्रतबंधाचे वेळीं वय४६ वर्षांचें आहे असें असून शिवदिग्विजयांत 'सेहचाळीस सत्तेचाळीस वर्षांनीं मुलें झालीं असतां गायत्रीमंत्रोपदेश प्रायश्चित्तपूर्वक केला' असा उल्लेख आहे.

'प्रभात' मासिक वर्ष २ यांत शिवछत्रपतींची बखर छापली आहे. त्यांत कलम ८६ (पान ३९) येथें असें वाक्य आहे, 'त्याउपर वेदमूर्ती गागाभट्ट वाराणसीकर येऊन रायेगडीं राजे स्वामीस मुंजीबन्धन पट्टाअभिशेक सिंह्यासनारूढ जाले. छत्रपती जाले शके १५९६ अनंदनाम संवछरे चैत्र सुध प्रतिपदा सुक्रवार.' यांत दिलेली राज्याभिषेकाची मिति वरील कोणत्याच मितीशीं जमत नाहीं व ती चूक असली पाहिजे. शिवचरित्रसाहित्य (खंड १ पान ७४) या ग्रंथांत फ्रायरचें पत्र सुरतेहून १५-१-१६७५ ला पाठविलेलें छापलें आहे. त्यावरूनहि राज्याभिषेक ६ जून १६७४ ला झाला असें दिसतें.

गागाभट्टांनीं महाराजांचा व्रतबंध करून राज्याभिषेक घडवून आणिला याचें वैषम्य पुष्कळांस वाटलें असावें. ही गोष्ट अभूतपूर्व झाली, गागाभट्टांचा जिकडे तिकडे बोलबोला झाला, त्यांना फार मोठी दक्षिणा मिळाली; यामुळें कित्येकांना असूया उत्पन्न झाली व कित्येकांना राजांचा झालेला व्रतबंध व अभिषेकहि पसंत नव्हता. हें दाखविणारीं प्रमाणें कांहीं मिळतात. त्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों.

'शिवराज्याभिषेककल्पतरु' या ग्रंथाची एक प्रत बंगाल एशियाटिक सोसैटीच्या संग्रहालयांत आहे. तिचें संपादन रा. दत्तोपंत आपटे व रा. का. ना. दीक्षि एम्. ए. ह्यांनीं केलें आहे. [ भा. इ. सं. मं. त्रै. व १० पहा. [ त्यावरून मिळणारी माहिती थोडक्यांत देत आहें. या ग्रंथांत २३६ श्लोक व ८ शाखा आहेत. हा ग्रंथ बरवे आडनांवाच्या ( बरवोपनामक ) नारायणभट्ट सूरि नांवाच्या पुरुषाचा पुत्र गोविंद याच्या मुखपद्मांत[३१] राहणारा अनिरुद्धसरस्वती यानें केला, असें शाखा १,६,७ व ८ यांचे शेवटीं सांगितलें आहे. राइरीपर्वताहून तीर्थें करीत जाणाऱ्या निश्चलपुरीला हा गोविंद कुडाळेश्वर-संनिध भेटला; त्यांचा झालेला संवाद वर्णिलेला आहे. हा राजाराममहाराजांचे कारकीर्दींत लिहिला असावा असें वाटतें. कारण यांत शेवटीं शिवाजीमहाराजांचा पुत्र रामराजा यवनांना जिंकून सार्वभौम होईल व शिववंशांत राज्यलक्ष्मी तीनशें वर्षें राहील असें भविष्य केलेलें आहे.[३२] निश्चलपुरी रायगडावरून समुद्रतीरीं दंभोळिनगर (हल्लींचें दाभोळ), येथें आला. तेथून पंचनद ( हल्लीं पंचनदी गांव दाभोळहून सहा मैल उत्तरेस ), तेथून भार्गव क्षेत्र ( हल्लींचें परशुराम किंवा पेढें चिपळुणाजवळ ), मग संगमेश्वर, तेथून निर्वेरक ग्राम ( हल्लींचे नेवरें ) व तेथें असलेलें गणपतीचें स्थान ( म्हणजे हल्लींचें गणपतीपुळें ), तेथून धूतपापेश्वर ( राजापुराजवळ ) व त्याजवळील गङ्गा ( राजापूरची गंगा ), सप्तकोटीश्वर ( ज्याचा जीर्णोद्धार शिवरायांनीं केला होता ) हीं तीर्थें करून परत रायगडास येण्यास निघाला असतां गोविंद विप्राला निश्चलपुरी कुडाळ देशांत भेटला. व गोविंदानें विचारिल्यावरून निश्चलपुरीनें सांगितलें कीं, 'मी राइरीस प्रत्यक्ष शिवाचा अवतार शिवराज त्याचे सन्निध असतों. पूर्वजांच्या विद्वत्तेनें व स्वतःच्या विद्वत्तेनें कीर्तिमान् झालेला गागाभट्ट नासिकास आला असतां शिवाजीनें त्याला आदरानें बोलावून आणिलें व तो राज्याभिषेकाला उद्युक्त झाला. तोंच प्रतापराव मारला गेला. पुढें राजांचा व्रतबंध करावयाचा ठरलें. तोंच आदले दिवशीं आकाशांतून उल्का पडली. असे उत्पात झाले. त्यांचें मीं (निश्चलपुरीनें) हनुमन्मन्त्रानें निवारण केलें. शिव-

३१ याचा अर्थ असाहि होईल कीं, गोविंदाचे मुखपद्मांत वास करणारी जी स्वतंत्र सरस्वती ( म्हणजे वाणी ) तिनें केलेला.

३२ एनस्यात्तिरयःपुत्रो रामराजेति यं विदुः । उत्साद्य यवनान् सर्वान् सार्वभौमो भविष्याति। शिववंशे राज्यलक्ष्मीः स्थिरैव त्रिशतं समाः॥

रायांना गायत्र्युपदेश झाल्यावर त्यांच्या पूर्वीच्याच स्त्रियांशीं त्यांचा ( समंत्रक ) विवाह पुन: झाला. मग शिवाजीची तुला झाली. गागाभट्टानें आपल्या मर्जीतले वेदपाठक अभिषेकासाठीं बोलाविले व राजाला सांगितलें कीं पुरीला ( निश्चल-पुरीला ) तूं नमस्कार करूं नको. तेव्हां आकस्मित् आघात झाले. गागा-भट्टाचे नाकावर काष्ठ पडलें. एका खांबावरून लांकडी कमल बाळंभट्ट गुरूच्या शिरावर पडलें. राजाला अभिषेक झाला त्या वेळीं रायरीचा पर्वतराज, तेथील शिरकादेवी, त्या देशाचा स्वामी भार्गव व वेताळ यांची पूजा करण्यांत आली नाहीं. अशा प्रकारचे दोष गागाभट्टाच्या हट्टामुळें झाले. म्हणून मोठीं विघ्नें उपस्थित झालीं. मीं लौकिक अभिषेक पाहिल्यावर राजाला निरोप पाठविला कीं, मीं अभिषेक पाहिला आतां मी वाटेल तिकडे जातों. तेव्हां राजा आला व त्यानें माझ्यापुढें फळ ठेऊन विज्ञप्ति केली. तेव्हां मीं त्याला सांगितलें कीं, राज्याभिषेकापासून १३, २२, ५५ व ६५ या दिवशीं भयसूचक उत्पात होतील. तेव्हां राजानें विनंति केली कीं, मला वैदिक अभिषेक झाला आतां तान्त्रिक अभिषेक मला तुम्ही करा. तेव्हां मीं त्याला सांगितलें कीं मीं जे उत्पात सांगितले आहेत ते पाहिल्यावर तूं मजकडे ये. अभिषेकापासून तेराव्या दिवशीं राजांची माता मृत झाली.नंतर प्रतापगिरीवर (प्रतापगडावर) वाजिशाला जळाली; त्यांत राजाचे प्रिय व बहुमूल्य अश्व मृत झाले. नंतर मीं राजाला ६४ तंत्रग्रन्थांचे मताप्रमाणें आश्विन शु॥ ५ ( ललितापंचमी ) बुधवारीं ( २३ सप्टेंबर १६७४ ) अनुराधा नक्षत्रीं कुम्भलग्नीं तंत्रपद्धतीनें अभिषेक केला' इत्यादि.

ह्या वर्णनांत प्रतापरावाचा मृत्यु, सप्तकोटीश्वर—जीर्णोद्धार, जिजाबाईचा मृत्युदिन वगैरे बारीकसारीक गोष्टींचे उल्लेख आले आहेत; त्यांवरून शिवरायां-ची चांगली माहिती असलेल्या मनुष्यानें हा ग्रंथ लिहिला असला पाहिजे असें स्पष्ट दिसतें. पण गागाभट्टांचा उत्कर्षहि याला सहन होत नव्हता आणि आपल्या मन्त्रविद्येचें स्तोम माजविण्याची हौस असलेला कोणीतरी हा मनुष्य असावा असें दिसतें. ह्यांत गागाभट्टांसंबंधीं लिहिलेल्या गोष्टी खऱ्या धरून चालतां येत नाहीं. बखरकारांनीं त्यांचा उल्लेख केलेला नाहीं.

रामदासस्वामींचीं चरित्रें त्यांच्या शिष्य—प्रशिष्यांनीं लिहिलेलीं आहेत, त्यांतील कांहींमध्यें गागाभट्ट व समर्थ यांचे संबंधानें उल्लेख सांपडतात. यांत हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रामदासस्वामींपासून अगदीं जवळचे

चरित्रकार गागाभट्टांचा उल्लेख करीत नाहींत. उदाहरणार्थ 'निवृत्तिराम' ह्या ग्रंथांत गागाभट्टांचा उल्लेख नाहीं. हनुमंतस्वामींच्या रामदासी बखरींत सदाशिव शास्त्री ह्यांचा स्वामींनीं गर्वहरण केल्याची जी गोष्ट दिली आहे त्यांत शिवाजी महाराजांचे गंगाभट म्हणून आश्रित होते असें सांगितलें आहे. याहून जास्ती त्यांत कांहीं नाहीं. गंगाभट्ट म्हणजेच कदाचित् गागाभट्ट असतील. आत्मारामस्वामींचा 'दासविश्रामधाम' म्हणून जो प्रचण्ड ग्रंथ आहे त्यांत मात्र गागाभट्टांचा अनेक वेळां उल्लेख येतो. प्रकरण २१ मध्यें गागाभट्टांचे पुण्यप्रतापानें शिवराजाची दिल्लीहून सुटका झाली; असें ध्वनित केलें आहे. 'गागाभट्टांचे पुण्यप्रतापें । पावोन स्वदेशा शिवाजी नृप । बहुत करितां ही खटाटोप । साटोपावाचें न ये राज्य ॥ (९०). शिवाजीराजे रामदासाचे भजनीं लागले त्यामुळें गागापण्डिताला राग आला; त्यानें मराठीभाषेची निंदा केली आणि राजांना रामदासांचा छंद सोडण्याचा आग्रह केला. (प्रकरण २४.१३७)'क्षोभोनि गागापंडित मनीं । म्हाठा भाषा निंदनिंदोनि । पाण्डित्यकला दावदावोनि । म्हणे नृपाला छंद सोडी ॥' गागाभट्ट लोकांना म्हणत कीं, तुम्ही उगाच भुलून व्यर्थ गोसाव्याच्या मागें कां लागतां, मला पाहिजे तो अर्थ विचारा मी सांगेन, नाहींतर मी तुम्हांला वाळीत घालवीन (प्रकरण ४९. २८). गागाभट्टापुढें काशींत कोणी पंडित टिकला नाहीं, तेव्हां त्यानें दिवसां मशाल पेटविली व जयपत्रें घेत गेला. दासबोध लिहिणाऱ्या दासाला जिंकून जयपत्र घेऊन जाईन असें तो म्हणाला (प्रकरण ७६. १३, १७). अशा प्रकारें गागाभट्ट व रामदासस्वामी यांच्यामध्यें चुरस होती असें वर्णन करून दासविश्रामधामकारानें शेवटीं सांगून टाकिलें आहे कीं, काशीकर पंडित कुंठित झाल्यावर त्याला स्वामींनीं अभय देऊन याज्ञवल्क्यादि वेद पढवून तो विसरला असतां खुणेनें सुचवून त्याला श्रुति अवगत केल्या (प्रकरण ७८. ४४) 'मग कासीकर पंडिता अभय देऊन । याज्ञवल्क्यादि वेद पढवोन । विसरोन जाताहि सुचवोन । खुणें श्रुत्या अवगत केल्या ॥' या गोष्टींत ऐतिहासिक सत्य आहे असें मानण्याच्या भानगडींत कोणीं पडूं नये हें बरें. आपल्या गुरूचें किंवा परंपरेंतील आद्य पुरुषाचें चरित्र लिहितांना त्याच्याबद्दल संभाव्य किंवा असंभाव्य गोष्टी सांगण्याची व त्याच्या काळीं किंवा मागेंपुढें झालेल्या मोठ्या व्यक्तींशीं त्याचा येन केन प्रकारेण संबन्ध

आणून चरित्रनायकानें त्याच्यावर वरचढपणा केला, हें दाखविण्याची पद्धत फार प्राचीन काळापासून पडली आहे. आद्य शंकराचार्यांचीं जीं चरित्रें आहेत त्यांत मंडनमिश्रापासून तों आचार्यांचे मागून कित्येक पिढ्यांनीं झालेल्या अभिनवगुप्ताचार्यापर्यंत सर्वांचा त्यांनीं पराजय केला हें वर्णन असतें ! तीच स्थिति रामदासस्वामींच्या चरित्रकारांची. शिवाजीमहाराजांचा व गागापंडिताचा संबंध आला, गागाभट्टांचें सर्व भरतखंडभर नांव गाजलें, त्यालाहि रामदासस्वामींनीं फजीत केलें असें जर वर्णन केलें नाहीं तर स्वामींच्या परंपरेंतील सच्छिष्य कसला ? असल्या भावनेनें बहुतेक चरित्रें लिहिलेलीं असल्यामुळें त्यांतील विधानें निर्मळ सत्य म्हणून आजच्या चिकित्सक दृष्टीच्या इतिहासकारांनीं मानतां कामा नये. भाविक दृष्टीनें लिहिणारांची गोष्ट वेगळी.

भट्टवंशांतील विद्वान् पुरुषांनीं वेळोवेळीं धैर्यानें पुढें येऊन पूर्वीच्या निबन्धकारांना ज्या सुधारणा सुचविण्याचें धैर्य झालें नाहीं त्या केल्या असें दिसून येतें. शङ्करभट्टांनीं आपल्या द्वैतनिर्णयांत द्विजांनांहि मुलीचा पुत्र व भगिनीपुत्र दत्तक घेतां येतो असें मीमांसापद्धतीनें ठरविलें व त्याचाच नीलकण्ठभट्टांनीं अनुवाद केला. शङ्करभट्टांनीं प्राचीन सर्व निबन्धकारांचे मताचे विरुद्ध लग्न झालेला व मुलें झालेला मनुष्यहि दत्तक पुत्र होऊं शकतो असें सिद्ध केलें व त्याचाच नीलकण्ठभट्टांनीं अनुवाद केल्यामुळें मुंबई इलाख्यांत अशा प्रकारचीं दत्तविधानें सररहा चालू आहेत. नीलकण्ठभट्टांनीं सर्व भरतखंडांत इतरत्र कोणींहि न मानिलेला असा बहिणीचा गोत्रज म्हणून वारसा प्रस्थापित केला व तो आज मुंबई इलाख्यांत मान्य आहे. मिताक्षरादि प्राचीन निबंधकारांचे मताचे विरुद्ध निलकण्ठभट्टांनीं भार्या व पुत्र यांचे ठिकाणीं पुरुषाचें स्वत्व नाहीं असें सिद्ध केलें. याचप्रमाणें गागाभट्टांनीं धैर्य धरून क्षात्र कर्माचें आत्यंतिक पालन करणाऱ्या परंतु संस्कार बरेच वर्षे लुप्त झालेल्या शिवाजी महाराजांचा व्रतबंध व वैदिक पद्धतीनें राज्याभिषेक करून नवी प्रथा पाडिली. या दृष्टीनें या भट्ट घराण्याची व विशेषत: गागाभट्टांची कामगिरी कौतुक करण्यारखी आहे.

---

## भट्ट घराण्याचा वंशवृक्ष ( जरूरी पुरता )

- नागपाश
  - चांगदेव
    - गोविंद
      - रामेश्वर
        - नारायण
          - रामकृष्ण
            - दिनकर अथवा दिवाकर
              - विश्वेश्वर अथवा गागाभट्ट
            - कमलाकर
              - अनन्त
              - प्रभाकर
              - श्याम
            - लक्ष्मण
        - श्रीधर
          - शंकर
            - दामोदर
              - सिद्धेश्वर
            - नृसिंह
            - नीलकंठ
              - शंकर
              - भानु
          - गोविंद
            - (चार पुत्र)
        - माधव
          - विश्वनाथ
          - रघुनाथ
          - प्रभाकर

# शिवकालीन संस्कृति आणि धर्म.

लेखकः—प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर.

एखाद्या राष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास शोधावयाचा असेल तर त्या राष्ट्राच्या भौतिक इतिहासाबरोबरच आत्मिक किंवा मानसिक इतिहासाचा छडा लाविला पाहिजे. राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या कृत्यांनीं राष्ट्राचा भौतिक इतिहास बनतो व त्या कृत्यांमागें जे प्रेरक हेतु असतात त्या हेतूंच्या योगानें राष्ट्राचा आत्मिक अथवा मानसिक इतिहास तयार होत असतो. ज्या हेतूंनीं आणि भावनांनीं प्रेरित होऊन राष्ट्रांतील कर्ते पुरुष आपले व्यवहार करीत असतात, त्या हेतूंच्या आणि भावनांच्या श्रेष्ठकनिष्ठतेवरून त्या राष्ट्राची संस्कृति श्रेष्ठ किंवा कनिष्ठ ठरत असते. नुसत्या भौतिक इतिहासानें राष्ट्राचा इतिहास पूर्ण होत नाहीं. नुसत्या भौतिक इतिहासावरून काढलेलीं अनुमानें पुष्कळ वेळां चुकीचीं असतात. कारण, राष्ट्रीय कृत्यांचा बरेवाइटपणा त्यांच्या केवळ बाह्य स्वरूपावरून ठरत नसून त्यांच्यामागें असलेल्या हेतूवरून ठरत असतो. हे हेतु कितपत सुसंस्कृत होते हें जोंपर्यंत पाहिलें जात नाहीं तोंपर्यंत भौतिक इतिहासाची विचिकित्सा नीट करितां येत नाहीं.

संस्कृति ह्या शब्दाचा इंग्रजी पर्याय Civilization हा शब्द आहे. हिंदींत या शब्दाचें 'सभ्यता' असें भाषांतर करतात. civil, cultured, संस्कृत, सभ्य हे शब्द नेहमीं चांगल्या अर्थींच वापरले जातात. संस्कृति शब्दांतहि चांगला अर्थ आहे; पण उत्तम संस्कृति, हीन संस्कृति असे प्रयोगहि कित्येक करितात. हीन संस्कृतीला राजवाड्यांनीं विकृति असा शब्द वापरला आहे. संस्कृति या शब्दांतच चांगलेपणा गर्भित आहे. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे मनुष्याच्या अन्तःकरणावर सुसंस्कार करून, त्याच्यांतील पशुत्व काढून टाकून, त्याच्या ठिकाणीं माणुसकी उत्पन्न करून, त्याला हळूहळू देवत्वाकडे नेणारे जे आचारविचार, त्यांना संस्कृति असें म्हणतां येईल. एखादा मनुष्य कितपत सुसंस्कृत किंवा सभ्य आहे हें जसें त्याच्या आचारविचारांवरून समजतें, त्याप्रमाणें राष्ट्रीय आचारविचारांवरून राष्ट्रीय संस्कृति कळून येते. तात्पर्य, राष्ट्रीय

भावना, राष्ट्रीय ध्येयें, व तदनुरूप आचार, यांनीं राष्ट्रीय संस्कृति बनते व त्यांच्या श्रेष्ठकनिष्ठतेवर, संस्कृतीचें श्रेष्ठकनिष्ठत्व अवलंबून असतें.

प्रस्तुत आपल्याला शिवकालीन संस्कृतीचें स्वरूप पहावयाचें आहे. त्याकरितां शिवकालीन महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं जनतेसमोर ठेविलेलीं आधिभौतिक व आध्यात्मिक ध्येयें काय होतीं व त्यांना अनुसरून त्यांचें व जनतेचें आचरण होतें किंवा नाहीं या प्रश्नांचा विचार केला पाहिजे. पुष्कळ लोक असें म्हणतात कीं,——संस्कृति, ध्येयें, आचार, विचार वगैरे लठ्ठ लठ्ठ शब्द व त्यांनीं दर्शविल्या जाणाऱ्या कल्पना या अगदीं अलिकडच्या आहेत. शिवकालीं या शब्दांचा व या कल्पनांचा महाराष्ट्रांत गंधहि नव्हता. उच्च ध्येयें, स्वार्थत्याग वगैरे कल्पना, इंग्रजी शिक्षणामुळें आपल्यांत उत्पन्न झाल्या आहेत व त्यांचा आरोप आपण पूर्वींच्या इतिहासावर करीत असतों. शिवकालीं असलीं ध्येयें वगैरे कांहीं नव्हतीं. पोटाला मिळविण्याकरितां मोठ्या प्रमाणावर दरवडे घालणारे पोटार्थी लोक ते ! त्यांना कसलीं आलीं आहेत ध्येयें ! मराठ्यांचा इतिहास ज्याला म्हणतात तो अशा पोटाळ लोकांनीं केलेल्या चोऱ्यामाऱ्यांचा इतिहास आहे. बाकी उच्च ध्येयें, उदात्त भावना, आत्यंतिक स्वार्थत्याग जर कोठें पहावयाचा असेल तर आम्हां आधुनिक आंग्ल सुशिक्षितांत. शिवकालीन अशिक्षित रानटी मराठ्यांना उच्च ध्येयें आणि उदात्त भावना येणार कोठून ? व त्यांच्याकरितां ते स्वार्थत्याग करणार कसे ? आतां प्रतापगड, सिंहगड, पुरंदर इत्यादि ठिकाणीं कांहीं रोमहर्षण प्रसंग झाल्याचें तुम्हीं सांगतां खरें, पण ते सर्व पोटाकरितांच होते; अशा तऱ्हेचे आक्षेप परकी लोकच नव्हे तर कित्येक आधुनिक स्वकीय सुशिक्षितहि घेत असतात ! हे आक्षेप जर खरे असते तर शिवकालीन संस्कृति शोधण्याच्या भानगडींत पडण्याचें कांहींच कारण नव्हतें. ज्यांना उच्च ध्येयें नाहींत, वाटेल त्या उपायांनीं पोटाला मिळविणें एवढाच ज्यांचा हेतु आहे, त्यांच्यांत शोध करूनहि संस्कृति कोठून सांपडणार ? पण सुदैवाची गोष्ट अशी आहे कीं, हे आक्षेप खरे नाहींत. शिवकालीं, उदात्त ध्येयें, उच्च भावना, स्वार्थत्याग वगैरे शब्दावडंबर नसेल पण त्या शब्दांनीं व्यक्त होणाऱ्या भावना जागृत झाल्या होत्या. आज आमच्यांत हे शब्द मात्र आहेत व भावनांचा पूर्ण अभाव आहे. तेजस्वी कृतींत पर्यवसित होणाऱ्या जाज्वल्य भावनांचा आमच्यांत आज पूर्ण अभाव झाला असून आम्हीं सर्व

पोटाळ बनलों आहों. व त्या पोटाळपणाचा आरोप शिवकालीन महाराष्ट्रावर करीत आहों. शिवकालीन महाराष्ट्रापुढें कांहीं उच्च ध्येयें होतीं असें म्हणणारे लोक आजच्या कल्पनांचा त्या काळावर आरोप करीत नसून, वस्तुस्थितीचें सांगत असतात. मुसलमानी अमलाखालीं महाराष्ट्र अगदींच उपाशी मरत होता असें नाहीं. मराठे सरदारांच्या व लोकांच्या बळावरच शिवकालीं व तत्पूर्वी, मुसलमानी राज्यें चाललीं होतीं. त्यामुळें मोठमोठ्या अधिकाराच्या जागांवर मराठ्यांच्या नेमणुका होत असत. मराठ्यांच्या पोटाची भूक त्यावेळीं चांगल्या रीतीनें शमत होती. मराठ्यांना शिवकालीं जी भूक, जी तळमळ लागली होती ती पोटाची नव्हती, मनाची होती. आणि ही भूक, ही तळमळ शमविण्याकरितांच हजारों तरुणांनीं, सुखाचे जीव दुःखांत घातले. शिवाजी महाराज आणि त्यांचे तरुण सहकारी हे सर्व सुखवस्तु लोक होते. त्यांनीं जो उपक्रम केला होता तो पोटाखातर केला नव्हता. त्यापेक्षांहि श्रेष्ठ ध्येय त्यांच्या-समोर होतें व त्याकरितां तळहातावर शिरें घेऊन त्यावेळचे मराठे तरुण सम-राला उद्युक्त झाले होते. त्यांचीं पोटें भरलेलीं असलीं तरी मनें भुकेलीं होतीं. ही भूक, ही तळमळ, हें ध्येय कोणतें होतें ? स्वधर्मीय राजा सिंहासनावर पाहण्याची त्यांच्या मनाला भूक लागली होती. स्वधर्माच्या दैन्यावस्थेमुळें, त्यांचीं मनें तळमळत होती आणि स्वधर्मस्थापनेचें ध्येय त्यांच्यासमोर होतें; असें म्हणण्याला आपल्याजवळ भरपूर पुरावा आहे. या बाबतींत प्रथम **अस्सल, नंतर समकालीन व नंतर इतर पुरावा** काय आहे तो क्रमानें पाहूं.

शिवाजी महाराजांनीं, शके १६०० मध्यें समर्थ रामदासांच्या चाफळ संस्थानाला दिलेल्या सनदेंत थोडासा पूर्वेतिहास दिला आहे. तो असा:— “ मजवर कृपा करून सनाथ केलें. आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राज्य-साधन करून, धर्मस्थापना, देवब्राह्मणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करावें.” रामदास हे शिवाजीमहाराजांचे गुरु असल्यामुळें सन-देंतील वरील सर्वच गोष्टी अर्थवादात्मक आहेत असें म्हणतां येणार नाहीं. फार झालें तर, राज्यस्थापना करून धर्मस्थापना करण्याची मूळ कल्पना शिवाजीची स्वतंत्र असतां ती रामदासांमुळें उत्पन्न झाली असें दाखविण्यांत अर्थवाद असेल; पण राज्यसाधनाचें ध्येय धर्मस्थापना करणें हें होतें, एवढी

गोष्ट अस्सल सनदेवरून स्पष्ट दिसते. आतां समकालीनांचे उल्लेख पहा:—
राजव्यवहारकोश शिवाजीमहाराजांच्या आज्ञेवरून त्यांच्या हयातींतच कर-ण्यांत आला. त्याच्या उपोद्घातांत विष्णूला अवतार घेण्याची विनंति करितांना खालील श्लोक घातले आहेत.

त्वं शाहपृथ्वीपतिवीरपत्न्याम् । अस्यां समासाद्य मनुष्यजन्म ।
म्लेच्छापहृत्या सुखमारचय्य । भूमेः पुनः स्थापय वर्णधर्मान् ॥
पार्थं प्रति प्राक् तव धर्महानौ । सृजेयमात्मानमिति प्रतिज्ञा ।
जगत्सुगीतैव तदत्रकार्षीः । कार्यंधुना माधव मा विचारम् ॥

" अर्जुनाजवळ तूं धर्मग्लानीच्या वेळेस अवतार घेण्याची प्रतिज्ञा केली आहेस तर विचार न करितां, जिजाबाईच्या पोटीं जन्म घेऊन, म्लेंच्छांचा निःपात करून, वर्णधर्मांची पुनः स्थापना कर " अशी विनंति वरील श्लोकांत केली आहे. शिवभारतांतहि अशा रीतीचे उल्लेख आहेत. विष्णूनें, मी अवतार घेऊन

स्थापयिष्यामि धर्मस्य मर्यादां भुवि शाश्वतीम् ।
यवनान् क्षादयिष्यामि पालयिष्यामि देवताः ॥
पुनः प्रवर्तयिष्यामि सप्ततन्त्वादिकाः क्रियाः ।
क्षेमं गवां विधास्यामि स्थितिं चापि द्विजन्मनाम् ॥

असें उत्तर दिलें आहे. तसेंच अफजलवधापूर्वी शिवाजीमहाराजांनीं खालील प्रतिज्ञा केल्याचें लिहिलें आहे:—

यवनानाम् अमी वंश्याः सर्वेप्यंशाः सुरद्विषाम् ।
जगतीं निजधर्मेण निमज्जयितुमुद्यताः ॥
तस्मादेतान् हनिष्यामि दानवान् यवनाकृतीन् ।
प्रथयिष्यामि धर्मस्य पंथानमकुतोभयम् ॥
पद्धतिं वर्णधर्माणां रोध्दुं यो हि व्यवस्थितः
निषेद्धा सर्वधर्माणां अधर्माणां विवर्धकः
स मया हंत हंतव्यः स मया समुपागतः ॥

बखरींमध्यें तर शिवाजीमहाराजांचें धर्मस्थापनेचें ध्येय होतें असें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. सप्तप्रकरणात्मक चरित्रांत महाराजांचा हेतु पुढीलप्रमाणें दिला आहे:—

" वडिलांनीं मेळविलें तें खाऊन राहणें योग्य नाहीं. आपण हिंदु, दक्षिण देश म्लेंच्छांनीं ग्रासिला. देव, ब्राम्हण, क्षेत्रे, गाई यांस बहुत पडा झाली. धर्म अगदीं बुडाला. तेव्हां धर्मरक्षणार्थ प्राणहि वेंचून धर्म रक्षावा " शिवदिग्विजयांतहि अशाच तऱ्हेचे उल्लेख अनेक आहेत. आणि " बखरकारांचा मुख्य कटाक्ष शिवाजी धर्मसंस्थापक होता हें सांगण्याकडे आहे तो बरोबर आहे," असा राजवाड्यांसारख्या चिकित्सकानें शेराहि दिला आहे. समर्थ रामदासांनीं शिवाजी महाराजांना पाठविलेल्या पत्रांत:—" देवधर्म गो-ब्राम्हण। करावया संरक्षण। हृदयस्थ झाला नारायण। प्रेरणा केली॥"असें म्हटलें आहे. तेव्हां शिवाजी महाराज व त्यांचे अनुयायी निव्वळ पोटाकरितां स्वराज्य-स्थापनेच्या मागें लागले नसून धर्मसंरक्षणाचें उदात्त ध्येय त्यांच्यासमोर होतें हें उघड आहे. हा धर्म कोणता होता हें स्पष्टपणें दाखविणारे उल्लेखहि अनेक आहेत. " आपण धर्मस्थापनेची इच्छा धरिली. हिंदुधर्मस्थापना हेंच मानस होतें " असें सप्तप्रकरणात्मक चरित्रांत लिहिलें आहे. " तूंहि धर्मस्थापनार्थ उदित होऊन वर्णाश्रमधर्में प्रजेस वर्तवूं लागलास " असें शिवदिग्विजयांत लिहिलें आहे. " सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणविलें. धर्मोद्धार करून देव—ब्राम्हण संस्थानीं स्थापून यजनयाजनादि षट्कर्में वर्णविभागें चालविलीं " असें अमात्यांच्या राजनीतींत म्हटलें आहे. यावरून स्पष्ट होतें कीं, वर्णाश्रमात्मक हिंदु धर्म स्थापन करण्याचें ध्येय शिवाजी महाराज व त्यांचे सहकारी यांच्यासमोर होतें.

हें ध्येय निश्चित करण्यांत बौद्धिक स्वातंत्र्यापेक्षां रूढिप्रियताच जास्त दिसून येते, असा आक्षेप कित्येक घेतील; त्याचें निरसन करून वरील ध्येयाची श्रेष्ठता सिद्ध करण्याला वर्णाश्रमधर्माच्या स्वरूपाविषयीं थोडें विवेचन आवश्यक आहे. वर्णाश्रमधर्म हे तीनच शब्द असले तरी त्यांत सर्व ब्रह्मांड सांठविलें आहे; किंबहुना आर्यांचा सर्व सामाजिक इतिहास त्यांत समाविष्ट झाला आहे. धृ—धारणे या धातूपासून धर्म शब्द साधला आहे. लोकांचा अधःपात होऊं न देतां एकसारखी उन्नति करावी म्हणून धर्म प्रवृत्त झाला आहे. फुकट जाणाऱ्या नदीच्या पाण्याला बांध घालून व मग कालवे, पाट इत्यादि साधनांनीं तें पाणी इच्छित स्थळीं नेऊन त्याच्या साहाय्यानें ज्याप्रमाणें उत्तम शेती तयार करतात त्याप्रमाणें मनुष्याच्या मोकाट सुटलेल्या मनोवृत्तींचें नियमन करून व

त्यांना योग्य मार्गाला लावून मनुष्याला श्रेयस् व प्रेयस् प्राप्त करून देणें हें धर्माचें कार्य आहे. प्रकृतीच्या बंधांतून मुक्त होण्याचें ध्येय प्रत्येक मनुष्या-पुढें ठेवून आमच्या धर्मानें, अहिंसा, सत्य, अस्तेय इत्यादि नियम सामाजिक सुस्थितीकरितां त्यांना घालून दिले व हे नियम न पाळणाऱ्या उन्मत्त लोकांशीं कसें वागावें या प्रश्नाला आमच्या धर्मानें जें उत्तर दिलें त्यांतच त्याचें वैशिष्ट्य दिसून आलें. दुर्जनांच्या अत्याचारांना सज्जनांनीं बळी पडावें पण प्रति-कार करूं नये अशी उदात्त पण व्यवहारशून्य शिकवण इतर धर्मांनीं दिलेली आहे. दुर्जनांचा प्रतिकार करण्यांत अहिंसा धर्माला बाध येतो ही कल्पना या शिक-वणीच्या मुळाशीं आहे हें उघड आहे. पण दुर्जनांची हिंसा वांचविली तर सज्जनांची हिंसा होऊं दिल्याचें पाप माथीं येतें ही गोष्ट लक्षांत घेऊन, उत्पथ-गामी दुर्जनांचें शासन करून सज्जनांचें रक्षण करण्याकरितां आमच्या धर्मानें क्षत्रियांची बलशाली संस्था अस्तित्वांत आणिली. प्रतिकारक्षम अशा लढाऊ लोकांनीं क्षत्रियांचा हा पेशा उचलला. शमप्रधान लोकांनीं प्रजेमध्यें आध्या-त्मिक व आधिभौतिक ध्येयें जागृत ठेवण्याचें, अध्ययन—अध्यापनाचें काम पत्करिलें. योग्य मोबदला घेऊन क्रयविक्रय करणारा वैश्य वर्ग सुधारलेल्या समाजांत नेहमींच अस्तित्वांत येतो त्याप्रमाणें तो येथेंहि आला आणि अशा रीतीनें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीन वर्ण सुप्रतिष्ठित झाले. या त्रैवर्णिकांनीं एतद्देशीय लोकांना आपल्या समाजांत स्थान देऊन शूद्रांचा चौथा वर्ण निर्माण केला. चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीचा हा असा थोडक्यांत इतिहास आहे. वर्णसंस्थे-नंतर बीजशुद्धीच्या दृष्टीनें जातिसंस्था अस्तित्वांत आली असली तरी मूळ वैदिक धर्म वर्णाश्रमात्मक आहे, जात्यात्मक नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. त्यागाच्या थोर तत्त्वावर या वर्णाश्रमसंस्थेची उभारणी करण्यांत आली आहे. आयुष्य हें चैन करण्याकरितां नसून प्रत्येक व्यक्तीला समाजविषयक कांहीं आवश्यक कर्तव्यें आहेत, ही भावना या संस्थेच्या मुळाशीं असल्याचें, गीतेंत सांगित-लेल्या वर्णधर्मावरून कोणाच्याहि लक्षांत येईल. चातुर्वर्ण्याचीं चार प्रकारचीं कामें करणारे लोक जेथें व्यवस्थित राज्यघटना आहे तेथें असतातच. पण आमच्या धर्मांत त्यांचें व्यवस्थित वर्गीकरण करून, त्यांचीं कर्तव्यें ठरवून देऊन, त्यांना जसें धार्मिक अधिष्ठान देण्यांत आलें आहे तसें दुसरीकडे कोठेंहि नसल्यामुळें चातुर्वर्ण्याची संस्था, हा आमच्या धर्माचा विशेष आहे.

वर्णव्यवस्थेप्रमाणें प्राप्त झालेली जबाबदारी गृहस्थाश्रमांत उत्तम रीतीनें पार पाडतां यावी म्हणून ब्रह्मचर्याश्रमाची योजना करण्यांत आली.या आश्रमामुळें विद्वान् व वीर पुरुषांची वाण राष्ट्राला कधींच पडली नाहीं. या आश्रमांत विद्यार्थ्यांचे आहार—विहार व आचार—विचार यांवर कडक निर्बंध घातलेले असत व सर्व तऱ्हेचे कष्ट सोसण्याची तयारी केली जाई. त्यामुळें तेजस्वी बुद्धीच्या आणि बलिष्ठ शरिराच्या तरुणांची अखंड परंपरा, वर्णव्यवस्थेप्रमाणें प्राप्त झालेलीं आपापलीं कामें उचलण्याकरितां पुढें येत राही. गृहस्थाश्रमांतील आपलीं कर्तव्यें उत्तम रीतीनें पार पाडून व आपलीच परंपरा पुढें चालविणारी तेजस्वी संतति निर्माण करून गृहस्थ लोक वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करीत व अध्यात्म चिंतन करून शेवटीं संन्यास घेत. ही आश्रमसंस्था पुढेंपुढें अगदीं चिरकाळित झाली व तिच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न शिवकालींहि झाले नाहींत.

वर्णसंस्थेंत एका वर्णातून दुसऱ्या वर्णांत जाण्याची अगदीं आरंभीं मोकळीक असावी. पण या सवलतीचा फायदा घेऊन ब्राह्मण व क्षत्रिय आपलीं जास्त जबाबदारीचीं कर्तव्यें सोडून, कृषि, गोरक्षण, वाणिज्यादि कमी जबाबदारीचीं कामें करूं लागल्याचें आढळून आलें, तेव्हां वर्णांतर करण्याची सवलत काढून घेण्यांत आली व ब्राह्मण आणि क्षत्रिय यांची संख्या वाढली नाहीं तरी घटूं नये अशी व्यवस्था करण्यांत आली. जातिसंस्था यामुळेंच अस्तित्वांत आली व जाति आणि वर्ण यांत यामुळेंच फरक पडूं लागला. जातीनें ब्राह्मण असलेले पण क्षत्रियांचीं कामें करणारे लोक महाभारतकालापासून आतांपर्यंत दृष्टीस पडतात.

वर्णाश्रमसंस्थेचें मूळचें रूप व तिच्यांत कालेंकरून झालेले बदल शिवकालीन विचारी लोकांपुढें होते आणि त्यागावर उभारलेल्या या संस्थेचें महत्त्व व उपकारित्व त्यांना पूर्णपणें पटलेलें असल्यामुळें त्यांच्या काळांत जितकें व जसें शक्य होतें तितकें व तसें या उपकारक संस्थेचें पुनरुज्जीवन करण्याचें ध्येय त्यांनीं आपल्यासमोर ठेविलें होतें.

धर्म, वर्णाश्रमधर्म या शब्दांप्रमाणेंच मराठी संस्कृतीचा वाचक असा आणखी एक शब्द मराठी वाङ्मयांत येत असतो. तो शब्द म्हणजे ‘ महाराष्ट्र—धर्म ’ हा होय. या शब्दाच्या अर्थासंबंधानें आतांपर्यंत केशवाचार्य,त्या

रानडे, भागवत, इ. राजवाडे, भट यांनीं चर्चा केली आहे. केशवाचार्यांनीं महिकावतीच्या बखरींत या शब्दाचा पुढीलप्रमाणें खुलासा केला आहे:—

" वेदशास्त्राचार आहे तो श्रेष्ठ व कुलाचार देशाचार श्रेष्ठ तरी हा धर्म, सर्व धर्माचा जीव मूळ धर्म माराष्ठ- " सर्व धर्मांचा जीवभूत असा जो हा मूळ महाराष्ट्रधर्म त्यांत वेदशास्त्राचार, कुलाचार व देशाचार यांचा समावेश होतो. देशाचार म्हणजे या देशांत चाललेला याज्ञवल्क्य स्मृतीप्रमाणें आचार होय. तात्पर्य, श्रुतिस्मृतीप्रमाणें होणारा ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य कुलांचा जो आचार तो महाराष्ट्र-धर्म होय असा केशवाचार्यांचा आशय आहे.

" देवमात्र उच्छेदिला। जित्यापरिस मृत्यु आला। आपला स्वधर्म बुडविला। ऐसें समजावें ॥ मराठा तेतुका मेळवावा। आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा। येविषयीं न करितां तकवा। पूर्वज हांसती ॥ " या दोन ओव्यांपैकीं, पहिलींतील स्वधर्म शब्दाऐवजींच दुसऱ्या ओवींत ' महाराष्ट्र—धर्म ' असा शब्द रामदासांनीं योजिला आहे; आणि महाराष्ट्राचा स्वधर्म म्हणजे श्रुतिस्मृत्युक्त वर्णाश्रमधर्मच होय हें प्रसिद्ध आहे. श्रीयुत भट यांनीं हाच अर्थ भरपूर पुरावे देऊन सविस्तर सिद्ध केला आहे. श्री. राजवाडे यांनीं महाराष्ट्र—धर्माचें समीकरण खालील प्रमाणें मांडलें होतें. " हिंदुधर्म+धर्मस्थापन + गोब्राह्मणप्रतिपालन+स्वराज्यस्थापन+एकीकरण + धुरीधारण = महाराष्ट्रांतील हिंदु धर्म. " आतां महाराष्ट्रधर्म म्हणजे स्वधर्म किंवा वर्णाश्रमधर्म असें म्हटलें म्हणजे वरील सर्व गोष्टी सहजच त्याच्यामध्यें येतात. वर्णाश्रमधर्माचें मुख्य अंग म्हणजे क्षत्रिय राजा पाहिजे. कारण, धर्मसंरक्षण व गोब्राह्मणप्रतिपालन त्यानें करावयाचें असतें. क्षत्रिय राजा पाहिजे असेल तर स्वराज्यस्थापना झाली पाहिजे. आणि स्वराज्यस्थापना करावयाची असेल तर सर्वांचें एकीकरण करून त्यांचें पुढारीपणाहि स्वीकारिलें पाहिजे. वर्णाश्रमधर्माचें पुनरुज्जीवन करावयाचें म्हणजे त्यांत इतक्या गोष्टींचा अंतर्भाव होतो. शिवकालीं देशभक्ति नव्हती पण धर्मभक्ति होती आणि तिच्यांत इतक्या गोष्टींचा समावेश होत असे. धर्म म्हणजे काय याची आमच्याकडील कल्पना नीट न समजल्यामुळें शिवकालीन पुढाऱ्यांचें धर्मस्थापनेचें ध्येय होतें असें म्हणणें म्हणजे त्यांची योग्यता कमी करण्यासारखें आहे असें कित्येकांना वाटतें. शिवकालीन पुढाऱ्यांना देशभक्ति कशाशीं खातात हेंहि माहीत नव्हतें,

असें म्हणून कित्येक त्यांना कनिष्ठ लेखतात. पण देशालाहि व्यापून उरलेल्या धर्माची ही भव्य कल्पना लक्षांत घेतली म्हणजे त्यांची योग्यता कमी झाल्याचें वाटणार नाहीं किंवा त्यांना कनिष्ठ लेखण्याचेंहि कारण रहाणार नाहीं. उलट त्यांची योग्यता केवळ देशभक्तांपेक्षां फार मोठी होती असेंच म्हणावें लागेल. धर्म म्हटला म्हणजे आपल्या धर्माचा क्षत्रिय राजा राज्य करीत आहे; ब्राह्मण अध्ययन-अध्यापन करून निःस्वार्थी वृत्तीनें लोकांना ऐहिक आणि पारमार्थिक ध्येयांचा मार्ग दाखवीत आहेत; आर्तत्राणाकरितां हातीं शस्त्र घेतलेले क्षत्रिय वीर धर्माचें व सर्व प्रजेचें संरक्षण करीत आहेत; व वैश्य शेती, गोरक्षण आणि व्यापार सुखानें चालवीत असून सर्वत्र शांततेचें रामराज्य आहे; अशी रमणीय कल्पना त्यावेळीं लोकांपुढें उभी रहात असे. वर्णाश्रम-धर्म या तीन शब्दांत ब्रह्मांड साठविलें आहे, असें जें आरंभीं म्हटलें त्याची यथार्थता वाचकांच्या आतां लक्षांत आली असेल. तात्पर्य, धर्म, वर्णाश्रम-धर्म, महाराष्ट्रधर्म या शब्दांत मराठ्यांची सर्व संस्कृति एकवित झाली आहे व ही संस्कृति महाराष्ट्रांत पुनः अवतीर्ण व्हावी अशी शिवकालीन पुढाऱ्यांची तीव्र मनीषा होती असें स्पष्ट दिसतें.

आतां धर्म किंवा वर्णाश्रमधर्म या शब्दाऐवजीं, स्वधर्म, महाराष्ट्र-धर्म असे शब्द कां योजिले असा प्रश्न उत्पन्न होतो. प्रश्नाचें उत्तर सोपें आहे. स्वधर्म म्हणजे आपला धर्म, ' आपला स्वधर्म बुडविला ' असें म्हणणारे व ऐकणारे कोण होते ? मराठे होते. अर्थात् स्वधर्म म्हणजे महाराष्ट्राचा—महारट्टांचा—मराठ्यांचा धर्म हें उघड आहे. हिंदु धर्म म्हणजे ज्याप्रमाणें हिंदु लोकांचा वर्णाश्रमात्मक धर्म, त्याप्रमाणें महाराष्ट्र-धर्म म्हणजे मराठ्यांचा वर्णाश्रमात्मक धर्म होय. महाराष्ट्र देशाचा धर्म असा अर्थ पूर्वी या शब्दाला नव्हता. पूर्वी लोकांचीं नांवें देशाला देत असत. जसें कुरु, पांचाल इत्यादि. त्याप्रमाणें महारट्ट लोकांच्या नांवावरून त्यांच्या देशाला पुढें महाराष्ट्र म्हणूं लागले.

मराठे हे हिंदूच होते. तेव्हां हिंदुधर्म असें म्हटलें असतें तरी चाललें असतें; तसें कित्येक ठिकाणीं म्हटलेंहि आहे; पण त्याच्याहि पुढें जाऊन मराठ्यांचा धर्म असें म्हणण्याचें काय कारण होतें? मराठ्यांचा या धर्मावर विशेष असा काय अधिकार होता? या धर्माकरितां **मराठ्यांनीं काय त्याग केला होता?** हें आपणास आतां पहावयाचें आहे. वस्तुस्थिति अशी आहे

कीं, संपूर्ण हिंदु जातींत वर्णाश्रम-धर्माचें रहस्य जर पूर्णपणें कोणीं जाणिलें असेल तर तें मराठ्यांनीं जाणिलें होतें व ही धार्मिक संस्कृति कायम ठेवण्याकरितां, हिंदूंमध्यें, शतकेंच्या शतकें जर कोणी स्वार्थत्याग व परिश्रम, केले असतील तर ते मराठ्यांनींच केले होते. म्हणूनच या धर्माला मराठ्यांचा धर्म असें अभिमानानें म्हटलें आहे. हें कसें तें आतां जरा सविस्तर पाहूं.

"महाराष्ट्राचा वसाहतकाल" या विद्वत्तापूर्ण लेखांत **इतिहासाचार्य राजवाडे** यांनीं, आपल्या तीव्रबुद्धिमत्तेच्या आणि प्रतिभेच्या जोरावर एक महत्त्वाचा मुद्दा उपस्थित केला आहे. खानदेशांतील हजारों ग्रामनामांचें, निरुक्तिशास्त्रदृष्ट्या परीक्षण करून, रट्ट आणि महारट्ट ह्या उत्तरेकडील क्षत्रिय वर्गाच्या लोकांनीं महाराष्ट्रांत येऊन वसाहती केल्या; असा सिद्धान्त तेथें त्यांनीं मांडला असून उत्तर हिंदुस्थान कायमचें सोडण्याला त्यांना जीं कारणें झालीं त्यांची मीमांसा राजवाड्यांनीं त्या लेखांत केली आहे. त्यांच्या मताप्रमाणें " हें वसाहतकर्म पांचसातशें वर्षें म्हणजे शकपूर्व १००० पासून शकपूर्व ५०० किंवा तीनशेंपर्यंत सुरू होतें. नर्मदोत्तर प्रदेशांतील क्षत्रिय अधिकाऱ्यांनीं या वसाहतकर्मांत पुढारीपण घेतलें होतें. मानव्य, हैहय, भोज, यादव, नल, कदंब, मौर्य, चालुक्य इत्यादि शेंकडों गोत्रांचे रट्ट दंडकारण्यांत वसत्यर्थ शिरलें. रट्ट आणि महारट्ट (राष्ट्रिक आणि महाराष्ट्रिक) या नांवाच्या अधिकारावर असलेलीं शेंकडों क्षत्रियकुळें एकजुटीनें वसाहत करण्यास निघालीं. दुष्काळ, परचक्राचा रेटा, सांथीचे रोग हीं कारणें एकजुटीनें कायमचें देशांतर करण्यास कारण होत नसतात. हीं कारणें आगंतुक असून तीं शमल्यावर लोक पुनः पूर्वस्थळावर येतात. तेव्हां कांहीं कायमचीं कारणें झालीं असलीं पाहिजेत. लोकसंख्येच्या बेसुमार वाढीचा परिणाम रट्टासारख्या देशाधिकाऱ्यांवर होणें शक्य नाहीं. तेव्हां असह्य जुलुमाची बाब तेवढी शिल्लक उरते. शकपूर्व सहाव्या शतकांत, नर्मदोत्तर प्रदेशांत वैदिक धर्मविरोधी बौद्धांचें व जैनांचें अशीं दोन पाखांडें अनिवार वाढलीं. हीं पाखांडें चातुर्वर्ण्य विरोधी असून, शूद्र व चातुर्वर्ण्यबाह्य लोकांचा पुरस्कार करणारीं होतीं. गौतम बुद्धाच्या अगोदरही, क्रकुच, कनकमुनि, काश्यप वगैरे बौद्धमतप्रवर्तक आचार्य होऊन गेले होते. म्हणजे बुद्धाच्या पूर्वी, दीडदोनशें वर्षें ह्या पाखंडाला देशांत जारीनें सुरवात झाली होती. तत्पूर्वी चार्वाकादि पाखांडी होऊन गेले होते.

तात्पर्य, शकपूर्व ९०० किंवा १००० च्या सुमारास देशांत चातुर्वर्ण्य-विरोधी व वैदिकधर्म-विरोधी पाखंडें माजत चाललीं होतीं. ह्या पाखंडांना देशांतील राजांचा आश्रय होता असें दिसतें. लोकायतिक पंथाला सर्ववर्णश्रेष्ठ जे ब्राह्मण त्यांच्यापैकीं, बृहस्पतिसारख्या ब्राह्मणांचा पाठिंबा होता. अशी स्थिति असल्यामुळें ब्राह्मण, क्षत्रिय राजे, शूद्र व चातुर्वर्ण्यबाह्य लोक अशा चौरंगी पेचांत हे चातुर्वर्ण्याभिमानी क्षत्रिय रट्ट लोक सांपडले व ह्या पेचांचा जुलूस त्यांच्या धर्माभिमानी मनाला असह्य होऊन हे एकजुटीनें देशांतर करण्यास उद्युक्त झाले. बुद्धाच्या पूर्वीं जें संकट चातुर्वर्ण्यावर आलें त्यापेक्षांहि मोठें संकट बुद्धोत्तरकालीं चातुर्वर्ण्यावर आलें. महापद्मानंद या शूद्र राजाच्या कारकीर्दींत क्षत्रियांची नर्मदोत्तर प्रदेशांत बिलकुल रया राहिली नाहीं. हा राजा तर शुद्ध क्षत्रियांचा संहार करण्यास उद्युक्त झाला. अशा अराजक, अधार्मिक व अधम राज्यांत राहण्यांत शोभा नाहीं, हें उत्कटत्वानें ज्यांच्या प्रत्ययास आलें अशा नर्मदोत्तर प्रदेशांतील अनेक चातुर्वर्णिकांनीं, दक्षिणारण्यांत वसाहती करण्याच्या निमित्तानें देशांतर केलें. महारट्ट लोक, महापद्मादि दुष्ट शूद्र राजांच्या, जैन-बौद्धादि पाखंडांच्या व व्रात्यशूद्रादि उत्पथांच्या जुलमाला कंटाळून, स्वधर्म, स्वराज्य व स्ववृत्ति यांचा अनुभव घेण्यास दक्षिणारण्यांत, बौद्धकालाच्या प्रथम ज्वानींत म्हणजे शकपूर्व ६०० च्या सुमारास वसाहती करण्यास निघाले. या क्षत्रिय महारट्टांचा धर्म पंचविध आहे. ( १ ) अध्ययन, यजन, दान, ( २ ) युद्धादि कर्मानें दुष्कृतविनाशन म्हणजे पाखंडी, म्लेंच्छ, अधर्माचारी यांचें विनाशन व दंडन, ( ३ ) गोब्राह्मण व स्त्रिया यांचें संरक्षण, ( ४ ) शरणागतास अभयदान व ( ५ ) सर्व आर्य मानवधर्माचें संरक्षण. हीं पंचविध कर्तव्यें त्यांच्या धर्मांत अंतर्भूत होतात. हे रट्ट लोक, नर्मदोत्तर प्रदेशांतील सर्व संस्कृति घेऊन महाकान्तारांत वसाहत करण्यास आले." असा राजवाड्यांच्या विवेचनाचा निष्कर्ष आहे; आणि तो सयुक्तिक नाहीं असें दाखविण्याला आतांपर्यंत कोणतेंहि कारण पुढें आलें नाहीं.

वैदिक धर्मांतील यज्ञादींच्या व कर्मठपणाच्या अतिरेकाला उपनिषदांनींच आळा घातला होता आणि वाटेल तेव्हां संन्यास घेण्याची परवानगी

देऊन आश्रमव्यवस्थाहि ढिली केली होती. पण वैदिक धर्मीयांनींच, आपल्या मताप्रमाणें, वैदिक धर्मात केलेल्या या सुधारणा होत्या. त्यानंतर

पशुश्चेन्निहतः स्वर्गं ज्योतिष्टोमे गमिष्यति ।
स्वपिता यजमानेन तत्र कस्मान्न हिंस्यते ॥
न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः ।
नैव वर्णाश्रमादीनां क्रियाश्च फलदायकाः ॥

असें म्हणून यज्ञयागादिकांची व वर्णाश्रमांची टवाळी करणारे कर्तव्यभ्रष्ट नास्तिक कांहीं कमी निर्माण झाले नाहींत. पण या लोकांच्या उपदेशाला धार्मिक अधिष्ठान नसल्यामुळें, यांच्या उपदेशाचा परिणाम झाला नाहीं. वैदिक धर्माला अजिबात झुगारून देऊन व अहिंसा, सत्य इत्यादि उदात्त धर्मतत्त्वांच्या अधिष्ठानावर उभें राहून चातुर्वर्ण्यसंस्थेवर पहिला जोराचा हल्ला बुद्धानें चढविला. अहिंसेच्या तत्वाचा पुरस्कार करून क्षत्रियवर्णाचा त्यानें धिक्कार केला. चातुर्वर्ण्यसंस्थेचा, क्षात्रियवर्ण हा जीव असल्यामुळें व बौद्ध धर्मानें क्षत्रियांच्या कर्तव्याला कनिष्ठ ठरविल्यामुळें, वर्णसंस्था हतबल झाली आणि वाटेल त्या स्त्री-पुरुषांना, वाटेल तेव्हां संन्यास घेण्याची परवानगी देऊनच केवळ नव्हे, तर तसें करण्याला प्रोत्साहनहि देऊन, आश्रम-संस्थाहि त्यानें धुळीला मिळविली. चातुर्वर्ण्याच्या सामाजिक संस्थेचा नाश केल्यामुळें बौद्धधर्मीयांना सामाजिक कर्तव्यें कांहींच उरलीं नाहींत. संन्यास व भिक्षा यांची दीक्षा घेतल्यानंतर स्वतःच्या चरितार्थाकरितांहि फारसे परि-श्रम करण्याची जरूरी राहिली नाहीं. अशा तऱ्हेच्या सोप्या धर्मात, कर्त्तव्य-शून्य, भ्रष्ट, आळसी आणि आशिक्षित लोकांची भरती फार झपाट्यानें झाली हें सांगणें नकोच. अशिक्षित लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन व त्यांच्या भाषेंत आपल्या धर्माचा उपदेश करून बुद्धानें आपला धर्म सर्वत्र पसरला. शूद्रप्राय झालेले वैश्य, वेदाधिकार नसलेले शूद्र, स्त्रिया व चातुर्वर्ण्य-बाह्य लोक त्याचे अनुयायी झाले; एवढेंच नव्हे तर कित्येक पतित क्षत्रियांनीं आणि ब्राह्मणांनींहि त्याच्या धर्माचा स्वीकार केला. व वर्णाश्रम-धर्माची अगदीं शोचनीय स्थिति झाली.

अशा रीतीनें चोहोंकडून काहूर उठलें असतांहि महाराष्ट्र क्षत्रियांनीं

वर्णाश्रमधर्मावरील आपली श्रध्दा यत्किंचितहि विचलित होऊं दिली नाहीं. कारण, या सामाजिक धर्माचें रहस्य त्यांना पूर्णपणें कळलें होतें. क्षत्रियवर्ण नाहींसा करणें किंवा त्याचें महत्त्व कमी करणें म्हणजे राष्ट्राला पोरकें करून शत्रूच्या भक्ष्यस्थानीं देण्यासारखें बावळटपणाचें आहे हें त्यांना समजत होतें; आणि चातुर्वर्ण्यविध्वंसक बौध्द धर्माच्या प्रसारामुळें राष्ट्रावर येणाऱ्या भावी भेसुर आपत्तीचें चित्र त्यांच्या डोळ्यापुढें स्पष्ट दिसत होतें. स्वतःच्या संस्कृतीवर अशी पूर्ण निष्ठा असल्यामुळें, वरांदारांवर जमीनजुमल्यावर तुळशीपत्र ठेवून व आपली प्राणापेक्षांहि प्रिय असलेली संस्कृति बरोबर घेऊन **महारट्टांनीं देशत्याग केला आणि दंडकारण्यांतील वनवासहि जास्त सुखदायक** मानून देशभक्तीपेक्षांहि धर्मभक्ति श्रेष्ठ आहे ही गोष्ट जगाच्या प्रत्ययाला आणून दिली. संस्कृति कायम राहील तर आज गमावलेला देश आपण पुनः मिळवूं व त्या देशांत या संस्कृतीचा पुनः प्रसार करूं असा त्यांचा विश्वास होता. तात्पर्य, ज्या धर्माच्या संरक्षणाकरितां महारट्टांनीं देशत्याग करून वनवासहि स्वीकारिला तो धर्म आमचा आहे, महारट्टांचा आहे, असें त्यांनीं अभिमानानें म्हणावें, ही गोष्ट अगदीं साहजिक अशीच आहे.

महारट्टांच्या स्वधर्मनिष्ठेची ही केवळ पहिली वेळ होती व कित्येक लोक राजवाड्यांची ही कल्पना निराधार आहे असेंहि म्हणतील. पण जिच्याविषयीं प्रत्यक्ष पुरावा आहे अशी परीक्षेची वेळ त्यानंतर कांहीं शतकांनीं महाराष्ट्रांतच आली. बौध्द धर्माच्या ज्या भुताला भिऊन महारट्ट महाराष्ट्रांत आले, त्या भूतानें त्यांचा पिच्छा येथेंहि सोडला नाहीं. निराळेंच एक रूप घेऊन तें येथेंहि त्यांच्या पाठीस लागलें. त्याचा प्रतिकार कसा केला गेला तें आतां आपण पाहूं.

महारट्ट दंडकारण्यांत लहान लहान गांवें वसवीत चालले व कित्येक शतकांनीं ही वसाहत पुरी झाली. प्रत्येक गांवांत क्षत्रिय मुख्य असे. व त्याला पट्टकील ( पाटील ) म्हणत. गांवाचा अधिकार व संरक्षण त्याच्याकडे असे. न्यायनिवाड्याचें काम पंच करीत. गांवकऱ्यांच्या सर्व गरजा बहुधा गांवांतच पुऱ्या होत; कारण सर्व धंद्याचे लोक गावांत असत. अशा रीतीनें प्रत्येक गांव म्हणजे एक लहानसें राज्यच असे. महाराष्ट्रावर आंध्र, आंध्रभृत्य वगैरे

चातुर्वर्ण्यबाह्य लोकांचीं राज्यें होऊन गेलीं. पण महाराष्ट्रांच्या ग्रामसंस्थेला कोणीं ढका लाविला नाहीं. आपल्या संस्कृतीचें व वंशाचें संरक्षण ग्राम-संस्थेच्या द्वारें करीत मराठे सुखानें कालक्रमणा करीत होते. पुढें या देशावर चालुक्य या क्षत्रियांचें राज्य झालें. या स्वधर्मीय राजांच्या छत्राखालीं उत्कर्ष पावत पावत शेवटीं जाधवांच्या कारकीर्दींत मराठ्यांच्या उत्कर्षाचा कळस झाला. लोक सुखासीन झाले, व्रतें, उद्यापनें भरमसाट बोकाळलीं आणि कर्म-ठपणाला ऊत आला. अशा बेभान स्थितींत अहिंसादि उदात्त तत्त्वांची घोषणा करणाऱ्या पंथांनीं आपलीं डोकीं वर काढलीं तर त्यांत नवल नाहीं. जैनधर्मानें तर महाराष्ट्रांत प्रवेश केलाच होता. त्यानंतर रामदेवराव जाधवाच्या कारकीर्दींत मानभावांचा पंथ फार जोरांत आला. मानभावांच्या पंथाची उत्पत्ति कशीहि झाली असो; मानभाव आणि बौध्द यांच्या तत्त्वज्ञानांत व आचारांत पुष्कळच साम्य आहे असें श्री. चांदोरकर यांनीं दाखविलें आहे. ईश्वर न मानणें, ( २ ) वेदप्रामाण्य न मानणें, ( ३ ) वर्णाश्रमाचा अभाव, ( ४ ) संस्काराचा अभाव, ( ५ ) संघ करून राहणें व (६) स्त्रीपुरुषांना संन्यास देणें. या सहा गोष्टींपैकीं, पहिली वादग्रस्त म्हणून सोडून दिली, तरी बाकीच्या पांच गोष्टी बौध्द व मानभाव या दोन्ही पंथांत अगदीं सारख्या आहेत. अर्थात् बौध्द धर्म हा राष्ट्राला जितका अपायकारक तितकाच हा पंथहि आहे, असें विचारी लोकांना वाटल्यास त्यांत नवल नाहीं. एकनाथांनीं या पंथाविषयीं म्हटलें आहे:—

> होऊनि मानभाव । अवघा बुडविला ठाव
> नाहीं चित्त शुद्ध गति। द्वेष देवाचा करीती
> धरिती उफराटी काठी । रांडा पोरें मोंदावती
> नेसुनिया काळेपण । अंगा लाविती दूषण
> एकाजनार्दनीं देवा । जळो जळो त्यांची सेवा ॥

पुढें पुढें तर मानभाव शब्दालाच मराठींमध्यें वाईट अर्थ आला. अलिकडे कित्येक विद्वानांनीं प्रतिपादिल्याप्रमाणें मातंगी पंथ व महानुभाव पंथ हे वेगळे असले तर एकनाथांनीं किंवा इतर लोकांनीं केलेली निंदा व मानभाव शब्दाला आलेला वाईट अर्थ मातंगी पंथाला अनुलक्षून आहेत असें म्हणावें लागेल. पण ' ऋद्धिपूरवर्णन ' या महानुभावी काव्यांत

" आतां अहिंसें निःसंगु । निवृति भाक्तियोगु । तो नमस्कारु परमार्गु । दातारांचा ॥ या ओवींत व तीवरील टीकेंत " हिंसारहित, संगरहित, प्रवृत्ति धर्मकर्मरहित " असा मानभावी पंथ असल्याचें स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां बौद्ध धर्माप्रमाणेंच महानुभावी पंथहि निवृत्तिपर आहे याबद्दल मुळींच मतभेद नाहीं. बौध्द धर्माप्रमाणेंच या पंथालाहि आरंभीं पुष्कळ अनुयायी मिळाले. महादेवरायाचे वेळेस या पंथाचा प्रमुख चक्रधर होता व राजानक राणे, राउल, पाइक, मानकरी इत्यादि राजसभेचे सर्व लोक चक्रधराच्या नादीं लागल्याचा उल्लेख 'लीलासंवाद' ग्रंथांत आहे. खुद्द राजावर या मताचा परिणाम कितपत झाला होता हें निश्चित कळण्यास मार्ग नाहीं. राजा व प्रधान हेमाद्रि हे मात्र या पंथापासून अलिप्त होते व त्यांनीं राजधानींतून या पंथाच्या लोकांना हांकून लाविलें असा उल्लेख आढळतो. याच्या उलट " या पाखंडांच्या शिकवणीनें कित्येक दुराचारी लोकांनीं देवालयांतील रुद्रलिंगें उपटून टाकलीं. या अधर्मकृत्याचें खापर ब्राह्मणांनीं राजाच्या माथीं मारिलें. त्याचा राग येऊन रामदेवरायाच्या हातून ब्रह्महत्येचें पातक घडलें. त्यामुळें बरेच सनातनधर्मीय, मराठा क्षत्रिय, संस्थानिक व सरदार रामदेवरायापासून फुटून निघाले " असें राजवाडे लिहितात. जाधवांच्या पदरीं मुसलमान सैनिक असल्याचाहि उल्लेख त्यांनीं केला आहे. तात्पर्य, या मानभावी पंथामुळें, चातुर्वर्ण्यावरील लोकांची श्रद्धा नाहींशी होऊन, सर्वत्र गोंधळ उडाला होता ही गोष्ट उघड दिसते. या गोंधळांतून, उत्तरोत्तर बिकट होत गेलेल्या पुढील ३०० वर्षांच्या परिस्थितींत, लोकांना मार्ग दाखवून देण्याचें श्रेय जर कोणाला द्यावयाचें असेल, तर तें ज्ञानोबाराय व त्यांचे अनुयायी यांनाच दिलें पाहिजे. मानभावांनीं गीतेवर बऱ्याच टीका लिहिल्या आहेत असें म्हणतात. त्या अजून प्रकाशित झाल्या नाहींत; तथापि त्यांत आपल्या अहिंसा-संन्यासादि तत्त्वांचें समर्थन त्यांनीं केलें असावें असें वाटतें. तेव्हां गीतेचा भावार्थ प्रकट करिण्याकरितां, ज्ञानोबाराय पुढें आले आणि मराठींतील या ज्येष्ठ व श्रेष्ठ ग्रंथाचा उदय झाला.

श्रीमद्भगवद्गीता ही महाराष्ट्राला अत्यंत प्रिय आहे. महाराष्ट्रांत गीतेचीं जितकीं भाषांतरें व जितक्या टीका झाल्या असतील तितक्या इतरत्र झाल्या असतील कीं नाहीं याची शंका आहे. राष्ट्राच्या आयुष्यांत एखादी कठीण

वेळ आली म्हणजे महाराष्ट्रांतील नेते गीतेकडे वळतात व तिचा उपदेश लोकांना ऐकवितात; असा ज्ञानेश्वरीपासून गीतारहस्यापर्यंत गेल्या अनेक शतकांचा अनुभव आहे. तेव्हां मराठी मनाला आकर्षून घेणाऱ्या कोणत्या गोष्टी गीतेंत आहेत तें थोडक्यांत पाहिलें पाहिजे.

पहिली गोष्ट अशी कीं, मराठ्यांना अत्यंत प्रिय असलेल्या चातुर्वर्ण्याचें उत्कृष्ट विवेचन व समर्थन गीतेंत करण्यांत आलें आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, वर्णाश्रम-धर्मावर वेळोवेळीं आघात करणारी अहिंसा व संन्यास हीं जीं दोन तत्त्वें त्यांच्या मर्यादा काय हेंहि गीतेंत स्पष्टपणें सांगितलें आहे. तिसरी गोष्ट अशी कीं, स्वतःची आध्यात्मिक उन्नति करून घेण्याला सर्व मनुष्यजातीला अधिकार आहे असें समतेचें तत्त्व गीतेनें प्रतिपादिलें आहे. आणि चौथी गोष्ट अशी कीं, सर्व लोकांना आचरण्याला सुलभ अशा भक्तिमार्गाचा उपदेश गीतेनें केला आहे. या चारहि गोष्टींनीं महाराष्ट्राला इतकें मोहून टाकिलें आहे कीं, मराठ्यांच्या संस्कृतीचें यथार्थ स्वरूप लक्षांत येण्यासाठीं त्यांचें थोडें जास्त विवेचन करणें अवश्य आहे.

चातुर्वर्ण्यसंस्थेचा जीवभूत जो क्षत्रियवर्ण त्याचें कर्तव्य इतकें निष्ठुर आहे कीं, अनेक वेळां या कर्तव्यापासून परावृत्त होण्याचा मोह त्याला पडलेला आहे. ज्यांना कर्तव्याची, श्रेष्ठ ध्येयाची, जाणीव नाहीं व मारामारी आणि हिंसा करून पोट भरण्याचा ज्यांचा धंदाच आहे अशा जंगली लोकांना लढाया करणें, कत्तली करणें वगैरे गोष्टींत कांहीं वाटत नाहीं. पण सुसंस्कृत, सुविद्य व बुद्धिमान् क्षत्रियांना, वर्णधर्माप्रमाणें कर्तव्य म्हणून हिंसात्मक युद्धें करण्याचा जेव्हां प्रसंग येतो तेव्हां आपलें हें कृत्य पापकारक तर नाहींना, अशा तऱ्हेची शंका त्यांच्या मनांत आल्यावांचून रहात नाहीं; किंबहुना अशा तऱ्हेच्या धार्मिक परंतु साशंक लोकांच्या नाजुक मनःस्थितीचा फायदा घेऊनच बुद्धापासून मानभावापर्यंतचीं पाखंडें पुढें आलीं. या बावळट आणि कर्तव्यशून्य पाखंड्यांनीं अहिंसेचे गोडवे गाइले आणि वर्णाश्रमधर्म हा हिंसात्मक धर्म आहे अशी ओरड केली. जणुं कांहीं अहिंसाधर्माचें श्रेष्ठत्व वर्णाश्रम-धर्माला माहीतच नव्हतें. ज्या शंकाकुल मनोवृत्तिमुळें अशा तऱ्हेच्या पाखंडांना वाव मिळतो ती वृत्ति नाहींशी करण्याकरितां गीतेला प्रथम युद्धें चांगलीं कीं वाईट याचा निर्णय करावा लागला. वर्णाश्रमधर्माला अहिंसेचें तत्त्व

पूर्ण मान्य आहे; पण सज्जनांच्या आणि दुर्बलांच्या जीवावर उठलेल्या बद-माषांना, अहिंसा तत्त्वाचा आधार घेऊन मोकळें सोडावें व त्यांनीं केलेली हिंसा उघड्या डोळ्यांनीं पहावी हा बावळटपणा त्याला पसंत नाहीं; किंब-हुना असें करणें अहिंसाधर्माच्या विरुद्ध आहे असें त्याला वाटत असल्यामुळें, सज्जनांची हिंसा वांचविण्याकरितां दुर्जनांची हिंसा झाली तरी चालेल एवढेंच नव्हे तर प्रसंगीं तशी हिंसा करणें हें क्षत्रियाचें कर्तव्य आहे, असा वर्णाश्रम-धर्माचा निर्णय आहे. 'आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्' अशी स्मृतींची आज्ञा आहे. पण दुसऱ्याच्या जिवावर उठलेल्या आततायी मनुष्याची हिंसा करण्यांतहि पाप नाहींना, अशी कित्येक अधर्मभीरु लोकांना शंका येत असल्या-मुळें, या शंकेचें निर्मूलन करणें गीतेला अवश्य झालें आणि

पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ।

'या आततायी लोकांची हिंसा करून आम्हाला पाप लागेल' असा अर्जुना-कडून पूर्वपक्ष करवून,

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥

× × × ×

अथ चेत्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥

असें गीतेनें त्याला उत्तर दिलें आहे. अन्यायी लोकांबरोबर कराव्या लाग-णाऱ्या युद्धांत जरी हिंसा झाली तरी तें युद्ध धर्म्य आहे, असें युद्ध कर्तव्य म्हणून करण्याशिवाय दुसरी कोणतीहि गोष्ट क्षत्रियाला श्रेयस्कर नाहीं, असें युद्ध करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे आणि 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' स्वतःचा धर्म पालन करीत असतां मृत्यु आला तरीहि तो श्रेयस्कर आहे, पण स्वधर्म सोडून दुसऱ्याचा धर्म स्वीकारणें अत्यंत घातक आहे. धर्म्य युद्ध करण्यांत पाप तर नाहींच पण उलट तें न करण्यांतच पाप आहे; असा गीतेनें स्पष्ट निर्णय दिला.

"स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः"

वर्णाश्रमधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं कर्में करीत असतां मोक्ष मिळतो; त्याकरतां कर्में सोडण्याचें कारण नाहीं. असें सांगून, युद्धासारख्या दारुण कर्मानें,

आपलें, मोक्षाचें आध्यात्मिक ध्येय दुरावेल कीं काय ही वारंवार उत्पन्न होणारी भीतीहि नाहींशी केली आणि शेवटीं १८ व्या अध्यायांत चारी वर्णांचीं कर्तव्यें कोणतीं तींहि विशद करून सांगितलें.

चातुर्वर्ण्याचें सशास्त्र विवेचन करणाऱ्या या ग्रंथाचा भावार्थ ज्ञानेश्वरांनीं आपल्या भावार्थदीपिकेच्या द्वारें सुबोध करून सांगितला. मराठ्यांची संपूर्ण संस्कृति ज्यांत सांठविली आहे असा 'भावार्थदीपिका' हा जुन्या मराठी वाङ्मयांतील पहिला ग्रंथ असून 'दासबोध' हा शेवटचा ग्रंथ आहे. समुच्चयप्रिय मराठ्यांनीं, तत्त्वज्ञानांत अद्वैत्यांचें अद्वैत घेतलें व त्यांच्या जोडीला द्वैत्यांची भक्ति घेऊन द्वैताद्वैताचा एकप्रकारें समुच्चय केला. चार वर्णांच्या चतुर्विध कर्तव्यांचा ज्यांत समुच्चय केला आहे असें चातुर्वर्ण्य, व्यवहाराकरितां त्यांनीं पूर्वींच स्वीकारिलें होतें. गीतेंत या सर्व गोष्टी सुसंगत रीतीनें मांडल्या असल्यामुळें, ज्ञानेश्वरांनीं गीतेचा उपदेश आपल्या रसाळ मराठी वाणीनें महाराष्ट्राला विदित केला. युद्ध करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. त्याचें पालन करण्यांत पाप नाही हें सांगताना ज्ञानेश्वर लिहितात:—"तूं अर्जुना का न विचारिसी । काइ हें चिंतितु आहासी । स्वधर्म तो विसरलासी । तरावें जेणें ॥ अर्जुना तुझें चित्त । जऱ्हीं झालें द्रवीभूत । तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमई ॥ वायांचि व्याकुळ काई । आपुला निजधर्मु तूं पाहीं । जो आचरितां बाधु नाहीं । कव्हणा कालीं ॥ जैसें मार्गेंचि चालतां । अपावो न पवे सर्वथा। कां दीपाधारें वर्ततां । नाडळिजे ॥ तियापरी पार्था । स्वधर्में राहाटतां । सकल काम पूर्णता । सहजें होय ॥ म्हणूनि तूं पाहीं । क्षत्रियां आणिक कांहीं । संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥ क्षत्रीं बहुत पुण्य कीजे । तें जूझ ऐसें लाहिजें । जैसें मार्गें जातां आडळिजे । चिंतामणी ॥ म्हणूनि हा सोडशील । तरी पापा वरपडा होशील । आणि अपयश तें न वचैल । कल्पांतु वेऱ्ही ॥ देखे स्वधर्मु आचरितां । दोषु नाशे असता । तुज हे भ्रांति कवण चित्ता । एथ पातकाची ॥ म्हणूनि तुज पार्था । हेतू सोडूनि सर्वथा । क्षात्रवृत्ती जुंझतां । पाप नाहीं ॥" वर्णाश्रमधर्मप्रमाणें प्राप्त झालेला, स्वतःच्या वर्णाचा धर्म आचरिला म्हणजे त्यानेंच मोक्ष मिळतो, या गीतासिद्धान्ताचें ज्ञानेश्वर विवरण करितात:—देखा अनुक्रमाधारें । स्वधर्म जो आचरें । तो मोक्ष तेणे व्यापारें । निश्चित असे ॥ तुम्हीं व्रतनियम न करावे ।

शरीरानें न पीडावें । दुरिकेंहि न वचावें । तीर्थासि गा । देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु होईल । येऱ्हवी प्रजा हाचि नाडील । तुमतें सदा ॥ तैसा स्वधर्म जरी लोपला । तैसा सुखाचा थारा मोडला । जैसा दीपासवें हारितला । प्रकाशु जाये ॥ अगा जयाचें जें विहित । तें ईश्वराचें मनोगत । तें केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥"

दुष्ट, आततायी, खुनी अशा मनुष्यांवर सुद्धां दया करावी; त्यांच्या अज्ञानाबद्दल कींव करावी; प्रेमानें त्यांना जिंकावें, नाहींतर त्यांच्या अत्याचाराला बळीहि पडावें, पण प्रतिकार करूं नये,अशा रीतींच्या अहिंसावाचांच्या उच्च परंतु भोळसट उपदेशाला ज्ञानेश्वरांनीं स्वतःच जें उत्तर दिलें आहे तें फार मननीय आहे:—" तूं निर्मत्सर सदयता । येथूनि निघशील कीर मागौता । परि ते गती समस्तां । न मनेल ययां ॥ हे चहूंकडूनि वेढितील । बाण वरी घेतील । एथ पार्था न सुटिजेल । कृपाळूपणें ॥ तूं आणिक एक न विचारिसी । एथ संभ्रमें जूझों आलासी । आणि सकरुणपणे निघालासी । माघौता जरी ॥ तरी तुझें तें अर्जुना । एयां वैरियां दुर्जनां । कां प्रत्यया येईल मना । सांगैं मज ॥" तूं निर्मत्सर, सदय, कृपाळु होऊन युद्धांतून माघारा फिरलास तरी तुझ्या अन्तःकरणाची ती उच्च स्थिति, तुझ्याशीं लढण्याकरितां आलेल्या लोकांना कळण्याइतकी त्यांची लायकी नाहीं. ते तुला वेढितील आणि बाणांनीं छिन्नविच्छिन्न करितील. तेव्हां ज्यांना दया, निर्मत्सरता इत्यादि श्रेष्ठ गुणांची ओळखहि नाहीं अशा अनधिकारी लोकांना दया न दाखवितां शिक्षा करणेंच योग्य आहे असा ज्ञानेश्वरांचा आशय आहे.

चातुर्वर्ण्यद्वेष्टे, समाजाचा बुद्धिभेद करण्याकरितां नेहमीं असें सांगत असतात कीं, सर्व वर्णांत ब्राह्मण श्रेष्ठ आहेत, त्यांना समाजांत सर्वांकडून मान मिळतो, क्षत्रिय आणि वैश्य ब्राह्मणांनीं कमी योग्यतचे मानले आहेत ही गोष्ट क्षत्रियवैश्यांनीं कां सहन करावी ? त्यांनीं ब्राह्मण कां होऊं नये ? दुसरे कांहीं श्रद्धाळु लोक असतात त्यांना वाटतें कीं, ब्राह्मण झाल्यावांचून मोक्ष मिळत नाहीं. तिसरें कांहीं असतात ते स्वतःचीं कर्तव्यें तर करीत नाहींतच, पण ब्राह्मणांनाहि खालीं ओढण्याचा प्रयत्न करितात. हे सर्व मत्सराचे व अज्ञानाचे खेळ होत हें उघड आहे. अध्ययन व अध्यापन करून समाजाला ऐहिक व पारमार्थिक ध्येयाचे मार्ग दाखविण्याचें बौद्धिक सामर्थ्य

व जन्मभर दारिद्यांत राहण्याचें मानसिक सामर्थ्य ज्याच्याजवळ असेल तो पूर्वी ब्राह्मण वर्णाचा स्वीकार करीत असे. आणि समाजाच्या कल्याणाकरितां स्वसुखावर पाणी सोडणाऱ्या अशा निःस्वार्थी ब्राह्मणांना समाजाकडून सहजच मान मिळत असे. पुढें वाटेल त्यानें वाटेल त्या वर्णांत प्रवेश करण्याची पद्धति बंद पडल्यानंतर, ब्राह्मणाच्या पोटीं जन्माला आलेल्या प्रजेलाच जरी ब्राह्मण म्हणूं लागले तरी त्यांच्यांतहि वर सांगितलेल्या बौद्धिक व मानसिक सामर्थ्यानें जे युक्त असत त्यांनाच समाजाकडून मान मिळत गेला. केवळ जातिब्राह्मणांची योग्यता विचारी लोकांनीं केव्हांहि मोठी मानिली नाहीं. तसेंच खरे ब्राह्मण हे समाजाचे नेते असल्यामुळें त्यांची योग्यता मोठी मानिली तरी त्यामुळें क्षत्रिय आणि वैश्य यांचा दर्जा कनिष्ठ होतो असेंहि नाहीं. समाजाला उपकारक अशीं आपआपल्या वर्णाचीं कर्मे जे योग्य रीतीनें करीत त्या सर्वांचा समाजांतील दर्जा श्रेष्ठ मानिला जात होता. ही गोष्ट ज्ञानेश्वरांनीं स्पष्ट करून सांगितली.

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप । कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः

या श्लोकावर व्याख्यान करितांना ज्ञानेश्वर म्हणतात:—" तेचि च्याऱ्ही वर्ण । पुससी जरी कोण । तरी ब्राह्मण । मुख्य जे कां ॥ एर क्षत्री वैश्य दोन्ही । तेही ब्राम्हणाच्याचि मानिचं मानी । जे ते वैदिक विधानीं। योग्य म्हणौनि ॥ चौथा शूद्र जो धनंजया । वेदीं लाभु कीर नाहीं तया । तरी वृत्ती वर्णत्रया । आधीन तयाची ॥ जैसी फुलाचेनि सांघातें।तांथू तुरंबिजे श्रीमंतें । तैसें द्विजसंगें शूद्राते । स्वीकारिती श्रुति ॥ " तात्पर्य, ज्ञानेश्वरांनीं, चातुर्वर्ण्याचें स्वरूप स्पष्ट केलें. त्या विषयींचें गैरसमज नाहींसे करून त्याची आवश्यकता व श्रेष्ठता प्रतिपादन केली आणि चातुर्वर्ण्यांत सर्व समाजाचा ऐहिक व पारमार्थिक दर्जा सारखाच आहे असें प्रतिपादन केलें. एवढें करूनच ते थांबले नाहींत; तर आबालवृद्धांना सुलभ अशा भक्तिमार्गाचा त्यांनीं सर्वांना उपदेश केला. कर्तव्यभ्रष्ट व उन्मत्त झालेल्या कित्येक ब्राह्मणांनीं, आणि क्षत्रियांनीं त्यांच्या उपदेशाकडे जरी काणाडोळा केला तरी एकंदर समाजांतील विचारी लोकांना त्यांचा उपदेश मानवला. नामदेव शिंपी, नरहरी सोनार, गोरा कुंभार, चोखा मेळा, बंका महार, वगैरे सर्व जातींच्या पुढाऱ्यांनीं ज्ञानेश्वरांचा उपदेश शिरोधार्य मानला व भक्तिमार्गाचा सर्वत्र प्रसार केला.

समाजांतील प्रमुख घटक जे ब्राह्मण व क्षत्रिय ते कर्तव्यभ्रष्ट झाल्यामुळें व मानभावी पाखंडाच्या जोरामुळें, जाधवांचें राज्य लवकरच नामशेष झालें. हा राष्ट्रीय अधःपात पहाण्याला ज्ञानेश्वर जगले नाहींत. या अधःपातांतून डोकें वर काढण्याला साधन म्हणून आपला ग्रंथ आपल्या अनुयायांच्या स्वाधीन करून ते आधींच समाधिस्थ झाले होते. ज्ञानेश्वरांच्या अनुयायांनीं, ज्ञानदेवीला आपली आई मानिलें. या आईनें, महाराष्ट्र जरी स्वराज्यभ्रष्ट झाला तरी पुढें ३०० वर्षेपर्यंत त्याला संस्कृतिभ्रष्ट होऊं दिलें नाहीं. व म्हणून लोकांना शिवकालीं पुन्हां स्वराज्य दिसलें.

यानंतर १५० वर्षांनीं म्हणजे शके १३७० च्या सुमाराला मराठा क्षत्रियांची स्थिति कशी शोचनीय झाली होती याचें वर्णन महिकावतीच्या बखरींत दिलें आहे:—"या उपर देशामध्यें तेही बहुत यवन झाले. राज्य अभिमान सोडला. शस्त्रें सोडिलीं. कृषि धरिली....बहुत आचारहीन झाले. बहुत गोत्र, प्रवर, कुळस्वामीण, कुळगुरु, ठिकाणें सांगतां विसरूं लागले. जाणोन देवीनें, **धर्म माराष्ट्र** रक्षाया कारणें राजश्री नायकोरावास स्वप्न दिल्हें. जर हा जातिमेळवा करावा. श्रीदेवी आद्यशक्ति जगदंबिका **महाराष्ट्र धर्मरक्षिका** तुम्हांस प्रसन्न असो." असा दृष्टांत झाल्यावर मालाडचा देसाई नायकोराव यानें आसपासचे ३—३॥ हजार क्षत्रिय व ४—५ शें ब्राह्मण एके ठिकाणीं जमविले व पूर्वी सांगितल्याप्रमाणें केशवाचार्याकडून महाराष्ट्र धर्म म्हणजे काय तें समजून घेतलें. त्या ठिकाणीं क्षत्रिय वर्ग विशेषतः जमला असल्यामुळें, "मराठा क्षत्रिय जो आहे त्यानें कुक्कुटशब्दापासून उठावें. शौचस्नान संपादावें. देवपूजन नित्य कर्म आचार्ययुक्त करावें. शास्त्रवचनाधारें न्याय निवडावा, पुराणेतिहास प्रत्यहीं ऐकावा. शस्त्र कमरेस बांधून भोजन करावें. गाफील कदापि न रहावें; असें शास्त्रोक्त, धर्मचोदित आचरण जो करील तो क्षत्रिय, गर्भादान, चौल, व्रतबंध, विवाह, महोत्सव, विद्यारंभ इत्यादि कर्में वेदोक्त करण्यास योग्य आहे" अशा आशयाचा क्षत्रियधर्म केशवाचार्यानें त्यांना सांगितला. पण क्षत्रिय आपला धर्म ऐकण्याच्या मनःस्थितींत त्या वेळीं नव्हते. स्वतःचें राज्य स्थापावयाचें बाजूलाच राहिलें, पण उलट आपआपसांत भांडून, मुसलमानांच्या पदरीं त्यांचेंच राज्य वाढविण्याकरितां त्यांनीं सेवा पत्करिली होती! अशी स्थिति असल्या-

मुळें ब्राह्मण क्षत्रियांचीं कर्तव्यें सांगत बसण्याऐवजीं नामदेव, एकनाथ, तुकारामादि साधुसंतांनीं भक्तिमार्गाचा उपदेश तेवढा जोरानें चालू ठेविला. अशा हेतूनें कीं, स्वधर्मांतील देवतांवरील भक्तीमुळें लोक परधर्मांत तरी निदान जाणार नाहींत. साधुसंत वर्णाश्रमधर्माच्या विरुद्ध होते. त्यांना सर्वत्र एकंकार करावयाचा होता वगैरे कल्पना अज्ञानमूलक आहेत; हें संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास ज्यांनीं केला आहे त्यांना नव्यानें सांगण्याचें कारण राहिलें नाहीं. " धर्म रक्षायासाठीं । करणें आटी आम्हांसी॥ " किंवा " धर्माचें पाळण । करणें पाखांडखंडन ॥ हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥ " असें जें तुकोबांनीं म्हटलें आहे तें खरें आहे. खरें ब्राह्मण्य व समता किंवा भूतदया यांचा विरोध नाहीं, ही गोष्ट एकनाथांनीं आपल्या चरित्रानेंच लोकांच्या नजरेस आणून दिली होती आणि ज्ञानेश्वर-एकनाथांच्या ग्रंथांचीं पारायणें केलेल्या तुकोबांनीं त्यांचीच परंपरा पुढें चालविली होती. " वर्णधर्म कोणी न धरिती विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ " " राहिले वर्णाश्रम धर्म । अन्योन्य विचरती कर्म ॥ " असा खेद प्रदर्शित करून, त्याबद्दल जास्त काहीं न बोलतां, खरें बोला, द्वेष करूं नका इत्यादि सामान्य नीतितत्त्वांचा उपदेश संतमंडळानें चालविला होता.

शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ।  
पराविया नारी माऊली समान । मानलिया धन काय वेचे ।  
न करितां परनिंदा द्रव्याभिलाष । काय तुमचें यास वेचे सांगा ।  
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेचे यास ऐसें सांगा  
तुका म्हणे देव जोडे याचसाठीं । आणिक ते आटी नलगे कांहीं ॥

अशा रीतीचा नीत्युपदेश तत्कालीन नीतिभ्रष्ट व पतित समाजाला करणें अगदीं अवश्य झालें होतें. नीतीनें वागा व शुद्ध अन्तःकरणानें ईश्वराची भक्ति करा म्हणजे तुम्ही कोठल्याहि जातींत जन्माला आलां असलां तरी परमेश्वराची प्राप्ति तुम्हाला झाल्यावांचून रहाणार नाहीं. कारण, ईश्वराच्या घरीं भेदभाव नाहीं.

" ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळा आहे अधिकार ।  
बाळें नारी नर । आदी करोनि वेश्याही ॥ "

" उंच नीच कांहीं । नेणें हा भगवंत। तिष्ठे भावभक्त । देखोनियां"
असा समत्वाचा उपदेश तुकोबांनीं केला.

" वेदश्रुति नाही ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मानी जो ।
तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ "

" वेदशास्त्र नाहीं पुराण प्रमाण । त्याचें वदन नावलोका "
असें म्हणून तुकोबांनीं वेदशास्त्रांचा मोठेपणाही प्रतिपादन केला. धर्माच्या बाह्य आचारांत किंवा कर्मठपणांतच केवळ गुंतून न पडतां अंतरंगांत शिरा व ईश्वराची भक्ति करा. भक्तीनें, नामस्मरणानें, सर्व कांहीं साधेल असें त्यांनीं कंठरवानें सांगितलें. तुकोबांचा भक्तिहीन ब्राह्मणांवर फार कटाक्ष होता; याच्या उलट " अपमानिले वेदपाठक । सात्त्विक शास्त्रज्ञ संपन्न " अशा योग्य ब्राह्मणांचा लोक अपमान करीत याचें त्यांना वाईटहि वाटे. आचार-भ्रष्ट ब्राह्मणांना मात्र त्यांनीं अगदीं वाटेल तशा शिव्या दिल्या आहेत. " जो ओतिला सत्त्वगुणें । कामादि दोषां नातळे मनें । तोचि ब्राह्मण निश्चय जाणें । जातिमात्र तो नव्हे ॥ " असें खऱ्या ब्राह्मणाचें लक्षण मुक्तेश्वरानें सांगितलें आहे. तुकोबांच्या वेळीं असे ब्राह्मण अगदीं कमी होऊन जाति-ब्राह्मणांचाच भरणा फार झाला होता.

" वेदाचे पाठक सेविताती मद्य । न देखती भेद विषयीं भांड "
" सोडिले आचार । द्विज चहाड झाले चोर । " "थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सोडूनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥ "

समाजाला संस्कृतीपासून भ्रष्ट न होऊं देण्याचें ज्यांचें कर्तव्य ते ब्राह्मणच अशा रीतीनें स्वतः भ्रष्ट झाले होते. वेदाचें अध्ययन ज्यांनीं करावें त्या ब्राह्मणांत कांहीं मद्यपीहि निपजले होते. त्यांनीं मुसल-मानांच्या नोकऱ्या, मुसलमानी आचारविचार व मुसलमानी भाषा स्वीकारिली होती. अशा ब्राह्मणांना तुकोबांनीं शिव्या दिल्या याबद्दल त्यांना दोष देण्याला जागा कुठें आहे ? तुकोबा म्हणतात ब्राह्मणांनींच असें केलें म्हणजे " वैश्यशूद्रादिक । हे तों सहजच नीच लोक॥ " क्षत्रियहि कर्तव्यभ्रष्ट झाले होते पण ब्राह्मणांवर सर्वांपेक्षां जास्त जबाबदारी असल्यामुळें तुकोबांनीं त्यांच्यावर अगदीं झोड उठविली. विठ्ठल नामाच्या गर्जनेनें, सर्व महाराष्ट्र अगदीं दणाणून सोडलें व पंढरपुराकडे त्याला आकृष्ट केलें. आषाढी कार्तिकीला

महाराष्ट्राचे प्रतिनिधि या वार्षिक महासभेला जमून देवभक्तीचा संदेश आप-आपल्या गांवीं परत नेऊं लागले-महाराष्ट्रभर पसरवूं लागले व अशा रीतीनें महाराष्ट्रावर आलेलें संस्कृति-नाशाचें मोठें संकट टळलें.

ज्ञानबा-तुकारामांनीं महाराष्ट्राला पंगू बनविलें असा आक्षेप संतांचें वाङ्मय वाचून राजवाड्यांनीं संतांवर घेतला होता व नुसतें वाङ्मय वाचून तसाच ग्रह पुष्कळांचा होईल असें वाटतें. पण एकांगी ज्ञान हें पुष्कळ वेळां सदोष असतें. संतांनीं जो उपदेश केला तो देशाच्या कोणत्या परिस्थितींत केला ? यापेक्षां निराळा उपदेश त्या वेळेस करणें शक्य होतें कीं नाहीं ? लोकांची त्या वेळची मनःस्थिती कशी होती ? याचा संपूर्ण इतिहास ज्या वेळेस राजवाड्यांनीं पाहिला नव्हता संतांनीं केलें हेंच पुष्कळ केलें असें त्यांना वाटलें व त्यांनीं आपलें मत बदललें. १९०० सालीं लिहिलेल्या चौथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत, संतांवर त्यांनीं भयंकर टीका केली होती; पुढें १९०३ सालीं प्रसिद्ध झालेल्या सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेंत त्यांचें मतांतर होत आहे असें दिसलें. व १९१० सालीं पुण्याच्या शिवराज्याभिषेकोत्सवांत वाचलेल्या 'शिवकालीन समाजावस्था' या निबंधांत त्यांचें पूर्ण मतांतर झाल्याचें आढळून आलें. अजूनहि हा वाद मधून मधून ऐकूं येतो. पण राजवाड्यांनींच उत्पन्न केलेल्या पूर्वपक्षाचा उत्तरपक्षहि त्यांनींच केलेला असल्यामुळें त्यांच्या निबंधांतील उताराच येथें देतों: "आठरापगड जातींचे ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र स्वधर्मभ्रष्ट झाले असतां ते बहुतेक मुसलमान बनल्यासारखेच झाले. इतकेंच कीं, त्यांनीं सुन्नतीची दीक्षा मात्र घेतली नाहीं. तीहि त्यांनीं घेतली असती. परंतु त्यांच्या आड एक मोठी धोंड आली. ती धोंड महाराष्ट्रांतील साधुसंत होत. भांडणें, तंटे, अपेयपान, अभक्ष्यभक्षण यांचें साम्राज्य सर्वत्र मातलेलें पाहून ही बजबजपुरी ताळ्यावर यावी या सद्धेतूनें, साधुसंतांनीं सर्वांना सहजासाध्य व सुलभ असा भक्तिमार्ग सुरू केला. प्रजा आर्यधर्माला, सनातन संस्कृतीला सोडून जावयाच्या पंथास लागली होती; बरेच लोक सोडूनहि गेले होते. बाकी राहिलेल्या लोकांचा मगदूर पाहून साधुसंतांनीं परमकारुणिक बुद्धीनें, भक्तिमार्ग सुरू केला. अशा सद्धेतूनें कीं, कसेंहि करून हे लोक हिंदुत्वांत रहावे. आणि अशा सदाशेनें कीं, पुढेंमागें लोकोत्तर अवतारी पुरुष निपजलाच तर त्याच्या द्वारां हे लोक पुनः धर्मकर्म-

निष्ठ बनण्याचा संभव रहावा. ' अज्ञं छंदानुवृत्तेन ' असा प्रकार साधुसंतांनीं केला. स्नान, संध्या, जपजाप्य, दंडप्रायश्चित्त, धर्माधर्म यांचा द्वेष अज्ञ लोकांच्या ठायीं होताच. त्या द्वेषाला साधुसंतांनीं गुणाचें स्वरूप दिलें. 'स्नान-संध्या टिळेमाळा' या ढोंगाची आमच्या या भक्तिमार्गांत जरुरी नाहीं असा पुकारा त्यांनीं केला आणि भगवन्नामस्मरणाचा साधा मंत्र जो भेटेल त्याला देण्याचा सपाटा चालविला. मुमुक्षु, नामस्मरणानें आकृष्ट झाला म्हणजे, त्याला ते नवविधा भक्तीची माहिती देत. त्यांत शुचिर्भूतपणें कसें रहावें, सत्य, अहिंसा इत्यादि धर्म कसे पाळावे वगैरे हिंदुधर्मातील विधिनिषेधांची ओळख करून दिली जाई. वर्णाश्रमधर्माचें फारसें नांव काढीत नसत. फक्त कुलधर्म, जातिधर्म, पितृधर्म पाळण्यांत पुण्य आहे एवढेंच सांगितलें जाई. अशा रीतीनें, साधुसंतांनीं, या भक्तिमार्गाच्या द्वारां, वर्णाश्रमधर्मलोपप्रधान अशी ही महाराष्ट्रांतील दुर्दैवी प्रजा, दोन अडीचशें वर्षे आर्यसमाजांत मोठ्या शिताफीनें थोपवून धरिली आणि आर्यसंस्कृतीचें संरक्षण केलें. तेव्हां आपल्या या देशावर त्यांचे उपकार बिनमोल झाले ह्यांत काडीचाहि संशय नाहीं. जर भरतखंडांत व महाराष्ट्रांत त्या कालीं भक्तिमार्ग नसता तर अफगाणिस्थान, इराण, वगैरे देशांतल्याप्रमाणें ह्या देशांतील सर्व प्रजा एकवर्णी मुसलमान झाली असती; आणि आर्यसंस्कृति, आर्यसारस्वत, आर्यसमाज, आर्यचातुर्वर्ण्य, आर्यशील ह्या जगांतून समूळ उच्छिन्न झालें असतें. " साधुसंतांच्या कामगिरीचें राजवाड्यांनीं केलेलें हें वर्णन, यापेक्षां सुंदर रीतीनें क्वचितच करितां येईल. असो.

भक्तिमार्गाचा असा जोराचा प्रसार साधुसंतांनीं महाराष्ट्रांत एकीकडे चालविला असतां, सर्व हिंदुसंस्कृति ज्यांत सांठविली आहे असे हिंदूंचे राष्ट्रीय ग्रंथ जे रामायण व महाभारत त्यांचाहि महाराष्ट्राला मराठी भाषेंत परिचय करून देण्याचें काम एकीकडे सुरू होतें. ज्ञानेश्वरांनीं गीतेचा भावार्थ जसा भावार्थदीपकेच्या द्वारें सविस्तर सांगितला त्याचप्रमाणें एकनाथांनीं रामायणाचा भावार्थहि भावार्थरामायणाच्या द्वारें सांगितला. दासोपंतांनीं गीतेवर मोठाल्या टीका लिहिल्या. त्यानंतर एकनाथांचे नातु जे मुक्तेश्वर त्यांनीं भारताची रचना करण्यास सुरवात केली. ही रचना जर पूर्ण झाली असती तर महाराष्ट्राचा राष्ट्रीय ग्रंथ म्हणून मुक्तेश्वराचें भारत सर्वत्र मान्यता पावलें असतें. दुर्दैवानें पहिल्या चार पर्वांखेरीज मुक्तेश्वराचें

भारत उपलब्ध नाहीं. या चार पर्वांतच आपल्या ओजस्वी लेखणीनें मुक्तेश्वरांनीं आदर्श ब्राह्मण व आदर्श क्षत्रिय यांचीं चित्रें महाराष्ट्रापुढें उभीं केलीं. वनपर्वांत द्रौपदी व धर्म यांच्या संवादांत द्रौपदीकडून मुक्तेश्वरांनीं जें तत्त्वज्ञान वदविलें आहे तें यापुढें सुरू होणाऱ्या रामदासी उपदेशाची प्रस्तावनाच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुसलमानी अमलाखालीं गांजून गेलेल्या महाराष्ट्राला, शांति आणि क्षमा यांच्या मर्यादा, धर्मग्रंथांत कोणत्या सांगितल्या आहेत हें कळणें अवश्यच होतें. प्रपंच व परमार्थ, तसेंच वैयक्तिक व सामाजिक धर्म यासंबंधीं मराठ्यांच्या कल्पना काय होत्या हें मुक्तेश्वरांच्या खालील ओव्यांवरून कळून येईल.

वनपर्वांतील चौथ्या अध्यायांत द्रौपदीचें धर्मराजाशीं संभाषण असें आहे:—

" साधलिया स्वराज्य संपत्ति । यज्ञीं देव तृप्त होती ।
श्राद्धीं पितृगण अतिथी । अन्नदानें तोषती ॥ ३९ ॥
हरेल दारिद्र्याचें दुःख । मित्रबंधु पावती सुख ।
अनित्य संसारीं कौतुक । करूनि जाती दादुले ॥ ४० ॥
जेणें पाविजे परम दुःख । काय तें साधुवृत्तीचें सुख ।
धैर्य उपहासिती लोक । म्हणती दीनें अशक्तें ॥ ४१ ॥
टाकिशी रायाचे धर्म । तोचि रायातें अधर्म ।
शांतीनें क्लेश परम । कुटुंबेसी भोगिसी ॥ ४२ ॥
व्यवहारीं शांति न ये कामा । परमार्थ क्रोध नाशी धर्मा ।
जेथें ज्याचाचि महिमा । तें तेथेंची योजावें ॥ ४५ ॥
प्रपंचीं अवलंबिल्या शांति । जोडिली ते जाय वृत्ती ।
आपुल्या दारातें संपत्ति । प्राप्त न व्हे आपणिया ॥ ४६ ॥
प्रपंचीं धरितां सात्त्विकता । तें आपण केलें आपल्या घाता ।
सत्त्वगुण तो **परमार्था** । शोभा आणी सर्वत्र ॥ ५१ ॥
खळाकुटिलाचे ठायीं । शांति धरितां पडणें अपायीं ।
जैसे कंटक मर्दावे पायीं । तेवीं दुर्जन दंडावे ॥ ५४ ॥
देखोनियां साधुसंता । भावें चरणीं ठेविजे माथा ।
तेथें दावितां क्रूरता । अधःपाता जाईजे ॥ ५५ ॥

धर्मराजानें द्रौपदीला दिलेल्या उत्तरांतहि वरील युक्तिवादाचें खंडन

केलेलें नाहीं. ' आपल्याला सध्यां काळ अनुकूल नसल्यामुळें शांति धरिली पाहिजे ' असें धर्मराजानें सांगितलें आहे.

ज्ञानदेवांनीं भक्तिमंदिराचा पाया रचला व तुकोबा त्याचे कळस झाले ही समजूत अगदीं बरोबर आहे. कारण तुकोबापर्यंत तीन शतकें नुसत्या भक्तिमार्गाचाच उपदेश सुरू होता तो आतां थांबला. यानंतर भक्ती-बरोबर शक्तीचाहि उपदेश सुरू होणार होता. यापूर्वीं मंदिरांतून, कमरेवर हात ठेविलेली विठ्ठलमूर्तीच दिसत होती; यानंतर उभारल्या जाणाऱ्या मंदि-रांतून धनुर्धारी रामाच्या, बलभीमाच्या आणि **महाराष्ट्रधर्मरक्षिका** जग-दंबेच्या मूर्ति सिंहासनावर अधिष्ठित होणार होत्या. भक्तिमंदिरावर कळस झालेल्या तुकोबांची कामगिरी संपत आली होती व " मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें ॥ " अशी आपली घनगंभीर वाणी सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून घुमवीत, समर्थ रामदासांची ब्रह्मचारी मूर्ति, आपला प्रवास संपवून निश्चयात्मक मुद्रेनें, महाराष्ट्रांत पदप्रक्षेप करीत होती. अमावास्येच्या गाढ अंधकारानंतर उगवलेली बालशिवाजीची भाग्योदयसूचक प्रतिपच्चन्द्र-रेखा, सह्याद्रीच्या कड्यावरून समर्थांच्या सूक्ष्म दृष्टीला स्पष्ट दिसत होती. हीच रेखा हळुहळू विकसित होऊन तिच्या शीतल चंद्रिकेखालीं मराठ्यांची संस्कृति सुखानें नांदूं लागेल असा विश्वास त्यांना वाटूं लागल्यामुळें तिच्या पुनरुज्जीवनाच्या प्रयत्नांना त्यांनीं सुरवात केली होती. या वेळच्या समाज-स्थितीचें चित्र समर्थांचे वडील बंधु रामीरामदास यांनीं रेखाटलें आहे. शिवकालीन पुढारी लोकांचीं ध्येयें व संस्कृति पहात असतां शिवकालीन समाज कोणत्या स्थितींत होता हेंहि पहाणें अवश्य आहे. रामीरामदास म्हणतातः— " अति तीव्र शासन यावनी । अब्रह्मण्य झाली कित्येक अवनी॥ वर्णचतुष्टय नारीनर । सर्व धर्मपराङ्मुख ॥ क्षत्रिय वैश्य स्वधर्मभ्रष्ट । शूद्र झाले सेवानष्ट । किती हेंचि बोलावें स्पष्ट । शीण वाटे वाचेसी ॥ दुष्ट सेवा दुष्ट प्रतिग्रह । दुराचारी दुराग्रह । गो-ब्राह्मणा अतिनिग्रह । तेथें कैचा प्रतिपाळ ॥ असूया तिरस्कार शुष्क वैर । अधर्मनिरत वृथा अहंकार । परस्परें आक्षेप साक्षेप थोर । मीच अधिक हा कळहो ॥ " महाराष्ट्रांतील चातुर्वर्ण्य कसें स्वधर्मच्युत झालें होतें याचें हें अगदीं यथार्थ चित्र आहे. मुसलमानांचें शासन अत्यंत तीव्र होतें. गाई-ब्राह्मणांचा निग्रह होत होता आणि असूया, मत्सर, तिरस्कार, निष्कारण वैर आणि मीच थोर असा

शुष्क अहंकार इत्यादि पारतंत्र्यांत जोरानें वाढणाऱ्या दुर्गुणांनीं समाज अगदीं नासून गेला होता. परतंत्र लोकांचीं मनें किती क्षुद्र होतात याचें हें उत्तम चित्र आहे आणि आजच्या लोकांना भोवतालीं पाहून तें पटल्यावांचून रहाणार नाहीं. रामदास मोठ्या खेदानें म्हणतात:– " आलें भगवंताच्या मना। तेथें कोणाचें चालेना ॥ विप्रीं सांडिला आचार। क्षेत्रीं सोडिला विचार ॥ नीतिमर्यादा उडाली। भक्ति देवाची बुडाली ॥ जनीं दोष झाले फार। तेणें होतसे संहार ॥ पुण्यक्षेत्रें तीं मोडावीं। आणि ब्राह्मण्यें पीडावीं ॥ पुण्यवंत ते मरावें। पापी चिरंजीव व्हावें ॥ लोके भेणोंचि चालती। त्यास होताली विपत्ति ॥ धर्मवृत्ति हे बुडावी। शास्त्रमर्यादा सांडावी ॥ रामदास म्हणे देवें। बौद्ध होऊनि बैसावें ॥"

लोक भित्रे झाल्यामुळें त्यांच्यावर आपत्ति येत आहेत. ब्राह्मणांनीं आपले आचार सोडले आहेत व लोकांना वळण लावण्याचें कर्तव्य ते करीत नाहींत. क्षत्रियांनीं तरी विचार करावा तोहि होत नाहीं. पुण्यक्षेत्रें मोडून गेलीं आहेत.आणि इतकें झालें तरी देव बौद्ध होऊन व हात जोडून अहिंसाव्रताचा उपदेश करीतच बसला आहे, याबद्दल समर्थांनीं आश्चर्य व खेद व्यक्त केला आहे. देवांच्या मूर्ती फोडणें हें काजींचें एक कामच होतें. ' सनदापत्रां 'त ८२ पानावर मुल्ला महमद शरीफ यास जी सनद दिली आहे तींत " देवाच्या मूर्ति दगडाच्या वगैरे आकारी बिनआकारी मोडून टाकणें " असें म्हटलें आहे. मुसलमानांनीं वाटेल तो अन्याय केला तरी त्याबद्दल त्याला शिक्षा होण्याची भीति नसे. म. इ. सा. च्या १५ व्या खंडांत पैठणच्या ब्राह्मणांचा शके १५३२ चा एक निर्णय छापला आहे तो वाचनीय आहे. मसूरच्या जगदळ्यांचा एक पूर्वज मुसलमान झाला व मेल्यावर आपली कबर करून एका बाजूला मुसलमानांनीं कंदुरी करावी व दुसऱ्या बाजूला हिंदूंनीं खैरात करावी, अशी त्यानें इच्छा दर्शविल्यावरून तशी व्यवस्था करण्यांत आली. पूर्वीच्या या मराठा जगदळ्याला पीर जलालुद्दीन अशी संज्ञा मिळाली व मुसलमान आणि हिंदु दोन्ही त्याच्या कबरीची पूजा करीत असल्यामुळें, त्याला ' मुसलमानांचा पीर व हिंदूंचा वीर ' असें म्हणूं लागले. पुढें मुसलमान मुजावरांनीं, त्यांच्या पद्धतीप्रमाणें हिंदु पुजाऱ्यांच्या हक्कावर अतिक्रमण केलें. तेव्हां प्रस्तुत खटल्यांतील, नरसोजी जगदळा याच्या आजानें तक्रार केली. त्याचा आकस मनांत धरून, मुसल-

मान मुजावरांनीं, नरसोजीच्या आजाला व चुलत्याला ठार मारिलें. यावेळीं नरसोजीचा बाप लहान होता. तो जेव्हां मोठा झाला तेव्हां तीन मुजावरांचा खून करून त्यानें आपल्या बापाच्या व भावाच्या खुनाचा सूड घेतला. पुढें त्याला पकडण्यांत आलें व वृद्ध होऊन तो मरण पावला. मुजावरानें त्याचा मुलगा नरसोजी यास त्रास देण्यास सुरवात केली व पैठणच्या ब्राह्मणापुढें तक्रार सांगितली. त्यांनीं खालील निर्णय दिला. " मुजावरांनीं जगदळे याचे निरपराधे दोन्ही खून केले. **एका एका खुनास अकरा अकरा खून** घ्यावे तेहि न करितां जगदळे यांनीं तीन खून घेतले ऐसे धर्माधिकारी बोलले. कागदपत्र असतां गळां पडोन तुवांच नरसोजी जगदळे याचा बाप धरून नेऊन नागवण बांधली आणि वतनास भ्रष्ट केला. आणि आतां नरसोजी जगदळे याचे गळां पडोन त्यास कष्टी केलें.वतनास विक्षेप केला.ऐसा तूं गुन्हेगार. तुज देहांत प्रायश्चित द्यावें; परंतु **मुसलमानांची पादशाही आणि तूंहि मुसलमान याकरितां क्षमा केली.**" देहांतप्रायश्चिताला योग्य असलेले मुसलमान कसे सुटत असत व न्याय देणाऱ्या ब्राह्मणांतील निस्पृहपणा व निर्भयपणा किती कमी झाला होता; हें या उदाहरणावरून स्पष्ट दिसतें. ब्राह्मणाकडे असें वादाच्या निर्णयाचें काम क्वचितच येत असलें पाहिजे. काजीकडेच न्यायाचें काम असे. आणि जेथें ब्राह्मण अशा रीतीनें निर्णय देत तेथें काजींच्या न्यायालयांत न्यायाचे कसे फार्स उडत असतील तें सहज समजण्यासारखें आहे. इ. स. १६२३ ते २६ च्या दरम्यान हिंदुस्थानांत प्रवास करणारा पोर्तुगीज प्रवासी डेलाव्हॅले यानें मुसलमानांच्या अमलाविषयीं खालील उद्गार काढले आहेत. " And it is that indeed which is the worst of all Governments, called by Aristotle, arbitrary, illimited tyrannical such as a most severe master useth to his servants not that which a Good King administreth to subjects. There are no laws for Government" ते यथार्थ आहेत. अशी स्थिति असल्यामुळें जुलूमजबरदस्तीला नुसता ऊत आला होता. मंदिरांतील देवतांप्रमाणेंच गृहदेवताहि सुरक्षित नव्हत्या.

" किती गुर्जिणी ब्राम्हणी भ्रष्टविल्या । किती शांमुखी जाहाजीं फांकविल्या ॥
किती एक देशांतरीं त्या विकील्या । किती सुंदरा हाल होऊनि मेल्या ॥"

अशी स्थिति होती. शिवदिग्विजयकार म्हणतो " त्यांत यावनी अधिकार परम नष्ट, स्त्रियांस बलात्कार-साम-दामें नेऊन, द्रव्य देऊन वश्य करून भोगि-

तात. स्त्रियांस उन्माद येऊन, भ्रतार गोलांगुलवत् मानितात. कदाचित् भ्रतारें शिक्षा केली असतां यवनाशीं स्त्रीअनुकूलता. " हें म्हणणें जर खरें असेल तर शिवकालापूर्वी मराठ्यांचा झालेला अधःपात केवढा मोठा होता याची कल्पना येते. या मानुषी आपत्तींत दुष्काळाच्या दैवी आपत्तीचीहि भर पडली. पदार्थमात्र तितुका गेला। नुसता देशचि उरला। येणें करितां बहुताला संकट झालें ॥ माणसा खावया अन्न नाहीं। आंथरूण पांघरूण तेंहि नाहीं। घर कराया सामग्री नाहीं। काये करिती ॥ " अशा रीतीनें सर्व बाजूंनीं महाराष्ट्राची दुर्दशा झाली असतां समाजाचे पुढारी जे ब्राह्मण ते काय करीत होते ? समर्थ म्हणतातः—" ब्राम्हणांस ग्रामणीनें बुडविलें " ग्रामण्यें करण्यांत व बहिष्कार घालण्यांत ब्राह्मण गढून गेले होते. ' शिव-चरित्रसाहित्यांत शके १५२२ मधील एक कागद लेखांक ३४० चा आहे. कान्होजीराजे प्रभानवल्लीकर यांनीं गोळवलीकर पाध्यांना हें पत्र लिहिलें आहे. त्यांत पाध्यांची तक्रार अशी आहे "देवरुखे आम्हांस म्हणतात कीं, आमचे घरीं भोजन कराल तरी आमचे येथें उपाध्यपणादिक सर्व कर्मे तुम्हीं चालवा; भोजन न करा तरी आमचे येथें येऊं नका. " देवरुखे यांस हकीकत विचारतां " आमच्या घरीं अनुष्ठान करून अन्यत्र भोजनास जातात; स्वयंपाकहि करून भोजन करीत नाहींत. याकरितां आम्हीं खेदी होऊन नेणतेपणें बोलतों. " यावरून या *ग्रामण्याची कल्पना येईल. पण ब्राम्हण नुसतीं ग्रामण्यें करूनच थांबले नाहींत. परकी देवतांची उपासना व परधर्माचा स्वीकार करण्यासाहि त्यांनीं सुरवात केली होती. " ब्राह्मण बुद्धी-पासून चेवले। आचारापासूनि भ्रष्टले। गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्याचें ॥ कित्येक दावलमलकास जाती। कित्येक पीरास भजती। कित्येक तुरुक होती। आपुले इच्छेनें "॥ दा. १४-७-३२ ही सर्व शोचनीय स्थिति पाहून समर्थ चिंताग्रस्त झाले. " देशकाल वर्तमानें। आपण चिंताग्रस्त होती मनें। कैची वाचतील जनें। कैसीं ब्राह्मण्यें राहतील ॥ कैसी क्षेम राहील जगती। कैसी देवदेवाल्यें तगती। कैसे कुटुंबवत्सल लोक जगती। कोणीकडे जातील हे ॥ " विचारांतीं, चातुर्वर्ण्यसंस्थेचें पुनरुज्जीवन करून ब्राह्मण आणि क्षत्रिय यांना कर्तव्योन्मुख केल्याशिवाय ही स्थिति सुधारणें अशक्य आहे असें त्यांना वाटलें व " रायांनीं करावे राजधर्म। क्षत्रीं करावे क्षत्रधर्म।

* या तंट्याचा निकाल झाल्याबद्दलची टीप शिवचरित्र साहित्य खंड २ पृ. ३४२ वरील पहावी.

ब्राह्मणीं करावे स्वधर्म । नाना प्रकारें ॥ " असा उपदेश करण्यास त्यांनीं सुरवात केली. " राज्य नेलें म्लेंच्छक्षत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं । आपण अरत्रीं ना परत्रीं । कांहींच नाहीं ॥ हें ब्राह्मणांस कळेना । त्यांची वृत्ती वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥" असें टोंचून बोलून ब्राह्मणांच्या दु:स्थितीची जाणीव त्यांना करून दिली व " बरें ऐसा प्रसंग जाला । जाला तो होऊन गेला । आतां तरी ब्राह्मणी आपणाला । शहाणें करावें ॥ " असें सांगून पुढील उद्योगाला त्यांना प्रवृत्त केलें. खरे ब्राह्मण निर्माण झाले म्हणजे समाजाची विस्कळित झालेली घडी नीट बसेल असें समर्थांना वाटल्यामुळें ब्राह्मण्यरक्षणाचा उपदेश ब्राम्हणांना त्यांनीं केला व निस्पृह ब्राह्मण कसे असावे हें दाखविण्याकरितां शिष्य व महंत आपल्या तालमींत तयार केलें. " स्नानसंध्या सोडूं नये । कुळाचार खंडूं नये । अनाचार मांडूं नये । चुकूरपणें ॥ २-२-३४ ॥ स्नानसंध्या जपध्यान तीर्थयात्रा भगवद्भजन । नित्य नेम पवित्रपण । अंतर शुद्ध असावें ॥ दृढ निश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा । विश्वजन उद्धरावा । संसर्गमात्रें ॥ २-९-२०-२१ ॥" हा दासबोधांतील उपदेश विशेषत: ब्राह्मणांना उद्देशून केलेला दिसतो. ब्राम्हण कसा असावा हें समर्थांच्या परंपरेंतील स्वानुभव दिनकर ग्रंथांत सांगितलें आहे. " परंतु हो प्रपंची अथवा निरपृह । तेणें वैराग्ययुक्त असावें नि:संदेह । वर्णाश्रमधर्मकर्मसमूह । प्राणांतींहि न सोडिजे ॥ अहर्निश करावी रामभक्ती । वर्णाश्रमधर्माचिया युक्ति । श्रीरामउपासनेची अभिव्यक्ति । केलीच करावी नि:शंक ॥" ही समर्थांचीच शिकवण असली पाहिजे. पण समर्थांनीं केवळ ब्राह्मणांना उद्देशून जें विवेचन केलें आहे त्यापेक्षां क्षत्रियांना उद्देशून त्यांच्या कर्तव्याचें विवेचन पुष्कळच जास्त केलें आहे. कारण, जोंपर्यंत सत्ता हातीं आली नाहीं तोंपर्यंत स्वधर्माचें व स्वसंस्कृतीचें स्थापन, संरक्षण व संवर्धन अशक्य आहे हें त्यांना उघड दिसत होतें. त्यामुळें धर्माबरोबर राजकारणालाहि आपल्या उपदेशांत त्यांनीं प्रमुख स्थान दिलें होतें. " राजकारण बहुत करावें । परी कळोंच न द्यावें । परपीडेवरी नसावें । अन्त:करण ॥ " वगैरे उपदेश ज्यांत आहे असा 'राजकारणनिरूपण' नांवाचा एक स्वतंत्र समासच ११ व्या दशकांत त्यांनीं घातला आहे. शिवाजी महाराजांना उद्देशून, उत्तम पुरुषाचें, आदर्श क्षत्रियाचें १८ व्या दशकाच्या ७ व्या समासांत केलेलें वर्णन तर प्रसिद्धच आहे. महा-

राष्ट्र-धर्माच्या संरक्षणाला पाहिजे तशा क्षत्रियोत्तमाची देणगी ईश्वरानें दिली, याबद्दल या समासांत, समर्थांनीं आपला आनंद जागोजाग व्यक्त केला आहे.:—

"देव-ब्राह्मण-आचारविचार । कित्येक जनांस आधार । सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ देवाचा कैपक्ष घेणें । ब्राह्मणाचिंता वहाणें । बहुत जनासी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार । जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिवसांचें माजलें बंड । याकारणें अखंड । सावधान असावें ॥" अशी सावधगिरीची सूचनाहि त्यांस दिली. शहाजी महाराजांनीं स्वकीय संस्कृतीच्या उद्धाराचें जें कार्य कर्नाटकांत चालविलें होतें, तेंच कार्य महाराष्ट्रांत सुरू करणाऱ्या शिवाजीला, सर्व मराठी क्षत्रियांनीं साहाय्य करावें म्हणून समर्थांनीं, त्यांना क्षात्र धर्माचा उपदेश करून जें आव्हान केलें आहे तें वीर रसानें ओथंबलें आहे "जयास जीवाचें वाटे भये । त्यानें क्षात्रधर्म करूं नये । कांहीं तरी करूनि उपायें ।पोट भरावें ॥ विन्मुखमरणीं नर्क होती। वांचूनिया मोठी फजीती । इहलोक परलोक जाती । पहाना का ॥ मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें । फिरोनि येतां भोगावें । महद्भाग्य ॥ देवमात्र उच्छेदिला । जित्यापरिस मृत्यु आला । आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें ॥ मराठा तेतुका मेळवावा । आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा । येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥ मरण-हांक तों चुकेना । देह वांचवितां वांचेना । विवेकी होऊन समजाना । काय करावें ॥ भले कुळवंत म्हणावे । तेंही वेगीं हजीर व्हावें । हजीर न होतां कष्टावें । लागेल पुढें॥ देव-द्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परौते । देवदास पावती फत्ते । येदर्थी संशय नाहीं ॥ अहो हे तुळजा भवानी । प्रसिद्ध रामवरदायिनी । रामदास ध्यातो मनीं । यन्निमित्य "॥ सर्व मराठे जर एक झाले तर यश ठेविलेलें आहे; अशी खात्री असल्यामुळें जे जे आपल्याला अस्सल मराठे म्हणवीत होते अशा सर्वांना वेगीं हाजिर होण्याकरितां समर्थांनीं हांक मारिली होती. समर्थांच्या या हांकेनें महाराष्ट्रांतील सुप्त क्षात्रतेज खरोखरच जागृत झालें व देवद्रोही कुत्त्यांना हाकून लावून महाराष्ट्र—धर्माची त्यांनीं संस्थापना केली. त्या वेळची स्थितीच अशी होती कीं, प्रत्येक व्यक्तीनें क्षत्रियाचा पेशा पत्करणें अवश्य झालें होतें; त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील, ब्राह्मणांनीं व शूद्रांनींहि क्षत्रि-यांचा पेशा पत्करिला व क्षत्रियांसह सर्व जण युद्धाला तयार झाले. शिवाजी

महाराजांच्या अष्टप्रधानापैकीं, न्यायाधीश व डबीर या दोघां प्रधानांशिवाय बाकीच्या सर्वांना नेहमीं युद्धावर जावें लागे. अशा रीतीनें चातुर्वर्ण्याचे मुख्य घटक जे ब्राह्मण व क्षत्रिय, त्यांना जागें करून समर्थांनीं कामाला जुंपलें. लोकांच्या पारमार्थिक ध्येयाकडे त्यांनीं दुर्लक्ष करणें अशक्यच होतें. कारण, लोकांना निर्वेधपणें आपली आध्यात्मिक प्रगति करून घेतां यावी म्हणून तर ही सर्व खटपट होती. त्यामुळें त्यांनीं अद्वैताचें निरूपण करून ईश्वराच्या येथें सर्व सारखे आहेत असा समानतेचा उपदेश केला. " ब्राह्मणाचें ब्रह्म तें सोंवळें । शूद्राचें ब्रह्म तें ओवळें । ऐसें वेगळें आगळें । तेथें असेचि ना ॥ सकळासी मिळोन ब्रह्म एक । तेथें नाहीं हें अनेक । रंक अथवा ब्रह्मादिक । तेथेंचि जाती ॥ " ७–२–२५, २७ आणि रंकापासून रावापर्यंत सर्व लोकांना आध्यात्मिक ध्येयाची प्राप्ति सुलभ व्हावी म्हणून दासबोधांत नवविधाभक्तीचें सविस्तर निरूपण केलें. लोकांना धर्मप्रवण करून, " शुचि नाहीं स्वधर्म नाहीं । आचार नाहीं विचार नाहीं । आरत्र नाहीं परत्र नाहीं । मुक्त क्रिया मनाची ॥ ऐसे प्रकारीचे पाहतां जन । ते जीवचीं प्रेता समान । त्यांसी न करावें भाषण । पवित्र जनीं ॥ " असा अधार्मिकांविषयीं तिटकाराहि उत्पन्न केला. तात्पर्य, अद्वैत, भक्ति, चातुर्वर्ण्य, समानता इत्यादि महाराष्ट्र–धर्मातील प्रमुख गोष्टींचा उपदेश करून रामदासांनीं, लोकांचा अधःपात थांबविला. तीनशें वर्षेपर्यंत लोपून गेलेली मराठ्यांची संस्कृति पुनरुज्जीवित केली आणि या संस्कृतीचें संरक्षण करण्याकरितां बद्धपरिकर होऊन शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापना केली.

आपल्या देशांत, गो-ब्राह्मण-प्रतिपालक असा क्षत्रिय राजा उत्पन्न व्हावा व त्यानें सर्व परकी लोकांचा पराजय करावा अशी इच्छा शिवकालापूर्वींच विचारी लोकांच्या मनांत उत्पन्न झाली होती. मुक्तेश्वरानें शके १५४० ते ५० च्या दरम्यान रचिलेल्या भारतांत, आदिपर्व अध्याय १९ मध्यें दुष्यंतानें सर्व राजे जिंकिल्याचें वर्णन केलें आहेच. त्यांत " जाबी, जंगी, फिरंगी, क्रूर । नायी, इंग्रजी, मल्लोबार । काबे, कवठे, कंक, मखर । जळतस्कर मांसाशी ॥ रूमशाम, खोरासान । मुलतान, हबशान, अर्बस्तान । उजबेख, पठाण, तुर्कमान ॥ बदकशान, मेवार॥" हे सर्व जिंकिल्याचें वर्णन कालविपर्यासाचा दोष पत्करूनहि केलें आहे. पांडवांनीं दिग्विजय केला तेव्हां त्यांनींहि मुसलमान, इंग्रज यांना जिंकिल्याचा उल्लेख आहे. यावरून त्या वेळच्या ग्रंथ-

कारांच्या मनांत कोणते विचार घोळत होते तें दिसून येतें. नारदनीती सांगत असतां, उत्तम राजा कसा असावा याचें मुक्तेश्वरानें केलेलें वर्णन पहाण्यासारखें आहे:—

" आज्ञा कीर्ति द्विजपालन । दान भोग मित्रसंरक्षण । साही गुणीं तव प्रधान । सालंकार असती कीं ॥ सांगावया क्लेश गोष्टी । दुर्बळ येऊं इच्छिती भेटी । तयां येतयां आडकाठी । तुझ्या दारीं नाही कीं ॥ श्रोत्रिय कुटुंबी निर्धन । साधु सात्त्विक वृत्ती क्षीण । त्यांचें परिहरूनि दैन्य । सदा पाळण करिसी कीं ॥ नापेक्षितां मेघजळें । सर्वदा पिकें पिकती सकळें । अभंग तडागें पाटस्थळें । पै निर्मिलीं असतीं कीं ॥ कृषीवळें खंगली भणंगें । धनधान्य वोपूनि अंगें । शेताचेनि राज्यमार्गें । पाळिसी कीं नरेंद्रा ॥ " शिवाजी महाराजांनीं स्वराज्य-स्थापना केल्यामुळें लोकांना पाहिजे होता तसा क्षत्रिय राजा मिळाला व स्वधर्माला आणि स्वभाषेला चांगले दिवस आले. अध्ययनअध्यापन करणाऱ्या ब्राह्मणांना राजाश्रय मिळूं लागला. शके १५९३ मध्यें कऱ्हाडचे अध्यापक गिजरे यांना अध्ययनअध्यापनाबद्दल इनाम मिळाल्याचा उल्लेख आहे. शके १५९८ मध्यें मोरेश्वर पंडितराऊ यांजकडून प्रांत मर्दनगड व प्रांत भिवगड येथील अधिकाऱ्यांना खालील पत्र गेलें आहे " उभये देशामध्यें ब्राह्मण आहेत; देशस्त, कराडे, चित्पावन व जोतिसी पधे देशोपाध्याय आहेत. या सकलांची परीक्षा घेऊन उत्तम ब्राह्मण दानायोग्य म्हणवुनु राजश्री छत्रपती स्वामींचे आज्ञेप्रमाणें धर्मादाये दानपूर्वक करून देऊनु प्रतिष्ठा केली जे, पुरातन जैसें चालिलें आहे त्याप्रमाणें त्याची वृत्ति त्यांनीं चालवून सुखरूप असावें. " सप्तप्रकरणात्मक चरित्रांत पुढील उल्लेख आहे. "वेदशास्त्र उच्छिन्न झाले होते. एक ग्रंथ अधीत त्यास मणभर धान्य, दोन ग्रंथ त्यास दोन मण. पंचग्रंथी, दशग्रंथी यांस पांच मण, दहा मण परीक्षा करून द्यावें. श्रावणमासीं सर्वांस पंडितराव यांनीं परीक्षा करून देत जावें. " स्वकीय राजा असला म्हणजे स्वकीय विद्यांना कसें उत्तेजन मिळतें त्याचें हें उदाहरण आहे. महाराजांनीं, राजव्यवहारकोश करवून स्वकीय शब्दाऐवजीं, परकीय शब्द जे राजव्यवहारांत घुसले होते त्यांची बरीच हकालपट्टी केली. कृष्ण ज्योतिसी यांजकडून ' करणकौस्तुभ ' ग्रंथ करवून ज्योतिषाला चालना दिली व गागाभट्टांकडून ' शिवार्कोदय ' नांवाचा मीमांसेवरील ग्रंथ लिहविला. शिवाजी महाराज हे गो-ब्राह्मण-प्रति-

पालक असल्यामुळें " मोरया गोसावी यांनीं हुजूर येऊन मालूम केलें कीं, यासी गाई दहावीस आहेती. तेणेंकरून अतीत अभ्यागतास पावतें. गाईस चरावयास रान नाहीं. महाराज गो-ब्राह्मण-प्रतिपालक आहेती. गाईचा प्रतिपाल केलिया बहुत पुण्य आहे " या विनंतीप्रमाणें गाईंना चरण्याला मोफत रान मिळालें असेल हें सांगणें नलगे.

शिवाजी महाराजांच्या पूर्वी निजामशाही-आदिलशाहींमध्यें मराठे सरदारांचा प्रवेश होऊन, मोठमोठ्या जागा त्यांना मिळाल्यामुळें, शहाजी, मुरार जगदेव वगैरे सरदारांच्या साहाय्यानें खुद्द बादशहाकडून ब्राह्मणांनीं वतनें संपादन केल्याचे दाखले आहेत. खुद्द चिंचवडच्या गोसाव्यांनीं निजामशहाकडून असें इनाम संपादन केलें होतें. शिवाय मराठे सरदारहि देवाच्या पूजेबद्दल, अभिषेकाबद्दल, ब्राह्मणांना ल्हानसहान वृत्ति देत असत. १५ व्या खंडांत रणदुल्लाखानानें निंबच्या सदानंद मठाला इनाम दिल्याचा उल्लेख आहे. एखादा बादशहा, एखादा मुसलमान सरदार धर्मसहिष्णु नसे असें नाहीं. पण हिंदुधर्मद्वेष्टयांचा एक पक्ष मुसलमानी दरबारांत सदैव असल्यामुळें धार्मिक जुलमाला सवड सांपडे आणि बादशहापासून खालच्या अधिकाऱ्यापर्यंत, सर्वच हिंदुधर्मद्वेष्टे असा जेव्हां प्रसंग येई त्या वेळीं हिंदूंच्या हालांना सीमाच रहात नसे. म्हणून स्वधर्मीय राजा लोकांना पाहिजे होता. तो मिळाल्यानंतर स्वधर्माला राजाश्रय मिळाला व तो निर्भयपणानें समाजांत वावरूं लागला. मराठ्यांच्या संस्कृतीचें पुनरुज्जीवन करण्याचा समर्थ शिवबांचा हेतु सिद्धीस गेला. " उदंड जाहलें पाणी स्नान-संध्या करावया !" म्हणून ब्राह्मणांना हर्ष झाला. पराक्रम दाखविण्याला वाव असलेलें, महाराष्ट्र-धर्म वाढविण्याचें ध्येय पुढें आल्यामुळें क्षत्रियांचे बाहु फुरफुरूं लागले व मराठ्यांची संस्कृति नव्या जोमानें हिंडूं फिरूं लागली.

स्वधर्माचा उत्कर्ष झाल्यामुळें परधर्मीयांचे हाल झाले असतील अशी कोणाची कल्पना असेल तर ती बरोबर नाहीं. स्वधर्म—निष्ठा म्हणजे परधर्मद्वेष ही गोष्ट मराठ्यांच्या संस्कृतीला मान्य नाहीं; दुसऱ्या धर्मांत किंवा उपासना मार्गांत मराठे कधींहि हात घालीत नाहींत. एक धर्म किंवा पंथ आपल्या मार्गानेंच जाण्याविषयीं इतरावर जबरदस्ती करीत नाहींना ? एवढेंच मराठी संस्कृतींतील क्षत्रिय राजा पहातो; व तशी जबरदस्ती कोणी करीत असेल तर क्षत्रिय धर्मप्रमाणें त्याला शासन करितो. शिवाजी महाराजांच्या राज्यांत किंवा त्रे

परप्रांतांत स्वारीवर असतांहि मशिदी, कुराण व स्त्रिया सुरक्षित असत; अशी कबुली मुसलमान इतिहासकार काफीखान यानेंच दिली आहे. परधर्मीयां-विषयीं जेथें इतकी सहिष्णुता तेथें परप्रांतस्थ स्वधर्मीयांविषयीं महाराजांना शत्रुत्व वाटत होतें अशी कल्पना कशी करावी ? 'महाराष्ट्र धर्म' किंवा 'मराठ्यांची संस्कृति' हे शब्द ऐकिले कीं कित्येक परप्रांतस्थांना चांगलें वाटत नाहीं. पण या संस्कृतीचें यथार्थ ज्ञान नसल्याचा हा परिणाम आहे. स्वराज्य-स्थापनेच्या प्रयत्नांना मदत म्हणून परप्रांतस्थ हिंदूकडून महाराजांनीं खुशीनें किंवा सक्तीनें द्रव्य मिळविलें. पण मुसलमानांच्या गुलामगिरींत राहून स्वतःचें ऐश्वर्य कायम टिकविण्याची इच्छा करणाऱ्या हिंदूंनीं याबद्दल कोणत्या तोंडानें तक्रार करावी ? महाराजांनीं स्वतःच्या प्रजेला त्रास दिल्याचें उदाह-रण तर नाहींच, पण परप्रांतांत जेव्हां स्वारी होई तेव्हां सैनिकांना सक्त हुकूम असत कीं, " परमुलखांत बायको न धरावी. मर्दाना सांपडेल तर धरावा. गाई न धरावी. बैल ओझ्याला मात्र धरावा. ब्राह्मणास उपद्रव न द्यावा. कोणी बदअमल न करावा. " ( सभासद )

अशा नीतिमान् क्षत्रियश्रेष्ठ राजाला क्षत्रियांचे सर्व संस्कार व्हावे व त्यानें सिंहासनावर बसून प्राचीन काळच्या क्षत्रिय राजाप्रमाणें राज्या-भिषेक करून घ्यावा, अशी धर्मप्रवण जनतेला साहजिकच उत्कंठा लागली. कांहीं क्षुद्र मशकांनीं शिवाजी हा क्षत्रिय नव्हे अशी एका कोपऱ्यांत गुण-गुण केली. पण त्यांच्या या हास्यास्पद बोलण्याकडे कोणींहि लक्ष दिलें नाहीं. गागाभट्टांनीं महाराजांना विनंति केली कीं, " या कलियुगीं क्षात्रधर्म अगदीं बुडाला. संपूर्ण पृथ्वी यवनमय होऊन सिंहासनारूढ यवन झाले. सूर्यसोमवंशास गति नाहीं. यजनयाजनमखादिक राहिलीं. ब्राह्मणधर्म अगदीं राहिला. सार्वभौमत्व यवन करूं लागले. छत्रें यवनाचे मस्तकीं विराजलीं. तुह्मीं पराक्रमें दक्षिणेंतील चारी पातशाह जिंकिले. दिल्लीचा औरंगजेब सार्वभौम यास ठायीं ठेविला. साधनसंपदा अमोघ असतां तुह्मांस तख्त नाहीं. यास्तव तुह्मांस तख्तारूढ करावें. राजा, तुह्मीं सिंहासनाधीश्वर जालियाविना जगीं भूषणप्रताप नाहीं. एतद्विषयीं ईर्षा संपूर्ण ब्राह्मणवृंदास लागली आहे. एवढा आमचा सर्व जनांचा हेतु परिपूर्ण केलियानें संपूर्ण मोदार्दित होतील." ही विनंति महाराजांनीं मान्य केली. राज्याभिषेकाची सर्व तयारी झाली. आणि " श्रीभवानीशंकराचें व वडिलांचें स्मरण करून

सिंहासनास साष्टांग नमस्कार घालून श्रीछत्रपति नरचूडामणि हिंदुपति पादशाह सिंहासनारूढ झाले. ते वेळीं लक्ष लक्ष ब्राह्मण मंत्रघोषाचा उच्चार करून जयजयकाराचा ध्वनि केला. सर्वांस परमानंद याच्या कोटी जाहल्या " (चित्रगुप्त). तीन शतकें मुसलमानांच्या पातशाह्या झाल्यानंतर महाराष्ट्रांत शिवाजी महाराजांनीं हिंदुपदपादशाही स्थापन केली. प्राचीन पद्धतीप्रमाणें राज्याभिषेक करून घेऊन हिंदूंची संस्कृति पुनः सिंहासनारूढ झाल्याचें, त्यांनीं जगाला जाहीर केलें. हिंदुजातीला त्यामुळें आनंद झाला. सर्वांनीं महाराजांना मुजरे केले. हिंदु संस्कृतींतील त्यागाचें तत्त्व सर्वांना सांगणारा भगवा झेंडा रायगडावर उभारण्यांत आला. शिवाजी महाराजांच्या त्रिशतसांवत्सरिक जन्मोत्सवप्रसंगीं, त्यांना व त्यांनीं उभारलेल्या हिंदूंच्या त्या अलौकिक ध्वजाला आह्मीहि वंदन करितों.

## विवेचनाचा निष्कर्ष.

शिवकालीन समाजांतील कर्त्या आणि विचारी पुढाऱ्यांच्या आचारविचारां-वरून शिवकालीन संस्कृति कशी होती तें आतांपर्यंत पाहिलें. कोणत्याहि राष्ट्रांत उत्तम, मध्यम, अधम असे सर्व तऱ्हेचे लोक नेहमींच असतात. पण राष्ट्रीय संस्कृति ही त्यांतील श्रेष्ठ अशा व्यक्तींच्या आचारविचारांवरून ठरवावयाची असते. कारण, कोणत्याहि देशांतील आचारविचारांची कमा-लीची प्रगति त्यांतील श्रेष्ठ व पुढारलेल्या नेत्यांमध्येंच आढळून येते. त्याप्र-माणें पाहिलें असतां आतांपर्यंतच्या विवेचनाचा निष्कर्ष असा निघतो कीं, शिवकालीन पुढाऱ्यांचें धर्मस्थापनेचें ध्येय होतें. हा धर्म ह्मणजेच वर्णाश्रमा-त्मक धर्म होय. परकी भाषेंत शिक्षण मिळाल्यामुळें धर्म म्हटला ह्मणजे religion शब्द व त्याचा संकुचित अर्थ पुष्कळांच्या मनांत येतो. पण त्यापेक्षां आमच्या धर्म या शब्दाचा अर्थ व्यापक असून त्यामध्यें वर्णाश्रमांचा ह्मणजे हिंदूंच्या भव्य संस्कृतीचा अंतर्भाव होतो. हिंदुधर्म आणि महाराष्ट्रधर्म यांत भेद नाहीं. हिंदूंची जी प्राचीन संस्कृति तीच मराठ्यांची संस्कृति होय. त्यामुळें महाराष्ट्रधर्म किंवा मराठ्यांची संस्कृति हे शब्द ऐकून परप्रांतीयांना वैषम्य वाटण्याचें कांहींहि कारण नाहीं. महाराष्ट्रांत मुसलमानी सत्तेनें हाहा:-कार चालविला होता; तेव्हां याच हिंदुसंस्कृतीचें संरक्षण विजयानगरला कर्नाटक करीत होता व तीच परंपरा पुढें शहाजीनें चालविली व तीच

शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांत पुनः सुरू केली. वर्णाश्रमधर्म दोन हजार वर्षे अनेक हालअपेष्टा सोसून, प्रसंगीं देशत्याग करून, प्रसंगीं हजारों लोकांचे बळी देऊनहि मराठ्यांनीं संरक्षिला म्हणून त्यालाच ते महाराष्ट्र-धर्म मराठ्यांचा धर्म, असें अभिमानानें म्हणूं लागले. या धर्मांत जी संस्कृति अंतर्भूत झाली आहे तिच्यांत मराठे क्षत्रिय हे प्रमुख आहेत. किंबहुना क्षत्रिय-संरक्षित अशी ही संस्कृति आहे. समाजाच्या संरक्षणाकरितां, अन्यायी आणि जुलमी लोकांना शासन करणारा क्षत्रियवर्ग समाजांत नेहमीं पाहिजे; असा आग्रह मराठ्यांनीं धरिला. त्यामुळें क्षत्रियांची संस्था, क्षत्रियांचें आधिपत्य हें या संस्कृतीचें वैशिष्ट्य आहे. अद्वैताचें तत्त्वज्ञान या संस्कृतीला मान्य आहे. नराचें नारायण होणें हें या संस्कृतीचें शेवटलें ध्येय असून, भक्ति हें त्याचें साधन आहे. हें ध्येय साधण्याला राजकीय सत्ता स्वधर्मीयांकडेच असणें अवश्य असल्यामुळें, या संस्कृतींत राजकारण ही सुद्धां एक धार्मिक बाबच होऊन बसली आहे. ब्राह्मणांनीं अध्ययनअध्यापन करून लोकांच्या सर्वांगीण प्रगतीकडे लक्ष द्यावें व ऐहिक आणि आध्यात्मिक ध्येयांची स्मृति लोकांत सदैव जागृत ठेवावी. क्षत्रियांनीं सर्व समाजाचें आधिपत्य स्वीकारून त्याचें अंतर्बाह्य संरक्षण करावें. वैश्यांनीं, कृषि, वाणिज्यादि साधनांनीं राष्ट्र संपन्न करावें व ज्यांना या तिहींपैकीं कोणतेंच काम करतां येत नसेल त्यांनीं सेवा करावी; अशी या संस्कृतीची घटना आहे. समतेच्या तत्त्वाचा या संस्कृतीनें पुरस्कार केला आहे. आयुष्य म्हणजे चैन नसून कर्तव्य आहे; समाजाच्या कल्याणाकरितां स्वार्थत्यागपूर्वक प्रत्येक व्यक्तीनें आजन्म आपलें कर्तव्य केलें पाहिजे असा या संस्कृतीचा सर्वांना संदेश आहे. ही संस्कृति जितकी स्वधर्मनिष्ठ आहे तितकीच परधर्मसहिष्णूहि आहे. गाई, स्त्रिया व योग्य ब्राह्मण यांची या संस्कृतींत फार काळजी घेतली जाते. ध्येय आणि व्यवहार यांची या संस्कृतींत उत्तम सांगड घातलेली आहे. उच्च ध्येयवादांत मराठे कोणालाहि हार जात नाहींत पण त्याबरोबरच तें साधण्याच्या व्यावहारिक साधनाकडेहि ते कधीं दुर्लक्ष करीत नाहींत. मराठ्यांचें डोकें जरी आकाशांत भ्रमण करीत असलें तरी त्यांचे पाय पृथ्वीला कधींहि सोडीत नाहींत. ध्येय आणि व्यवहार यांचा उत्कृष्ट समुच्चय मराठ्यांच्या स्वभावांत झाला आहे. अद्वैताला भक्तीची, ज्ञानाला कर्माची व ब्राह्मणांना क्षत्रियांची जोड देऊन, मराठ्यांनीं आपली ही समु-

चयप्रियताच व्यक्त केली आहे. " सर्वे नः सुखिनः संतु । सर्वे संतु निरामयाः । सर्वे भद्राणि पश्यंतु । मा कश्चिदुःखभाग्भवेत् ॥ अशी या संस्कृतीची मनीषा असल्यामुळें, सज्जनांचा छळ जेथें जेथें होत असेल तेथें तेथें धांवून जाणें व दुष्टांचा नाश करून सज्जनांना संकटमुक्त करणें हें या संस्कृतींत आवश्यक समजलें जातें. किंबहुना—

' परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । '

साधूंचें संरक्षण करून दुष्टांचा विनाश करणें हेंच या संस्कृतीचें जीवनकार्य आहे. अशा अभिजात संस्कृतींत शिवाजी महाराज जन्माला आले. याच थोर संस्कृतीच्या संस्थापनेकरितां व संरक्षणाकरितां ते व त्यांचे सहकारी यांनीं भीमपराक्रम केले व त्यांत यशस्वी होऊन, स्वसंस्कृतीचें, त्यांनीं यावच्छक्य पुनरुज्जीवन केलें. महाराज व त्यांचे सहकारी यांनीं आपल्या समोर ठेवलेल्या या स्वधर्मस्थापनेच्या व संस्कृतिसंरक्षणाच्या भव्य ध्येयामुळेंच तत्कालीन इतिहासाला उदात्तरम्यता प्राप्त झाली आहे आणि यानंतरहि मराठी तरुणापुढें, महाराष्ट्राच्या या परंपरागत दैवी संस्कृतीचें संरक्षण व संवर्धन करण्यापेक्षां जास्त श्रेष्ठ असें दुसरें कोणतें ध्येय असणार आहे ?

---

## ' दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा ! '

मलिकंबराचा मुलगा फत्तेखान यानें आपला सुलतान बुऱ्हाण निजामशहा याला ठार मारून मोंगलांचें अंकितत्व पत्करण्याची इच्छा मोंगलांकडील अधिकाऱ्यांना कळविली. तेव्हां विजापूरकरांना वैषम्य वाटून दौलताबादचा किल्ला फत्तेखानाकडून हिसकून घ्यावा असा त्यांनीं विचार केला. परंतु विजापूरकरांपेक्षां दिल्लीकरांचा आश्रय करणें श्रेयस्कर असें फत्तेखानाचें मत होतें. तें मोंगलांना कळवितांना " तैमूरवंशांतील राजपुरुषांच्या दरबारांत झाडूवाला झालास तरी पत्करलें; परंतु विजापूरच्या राज्यांतील अत्युच्च पद मिळालें तरी तें स्वीकारूं नको" अशी माझ्या पित्याची मला आज्ञा आहे असें त्यानें सांगितलें. किल्ला प्रत्यक्ष स्वाधीन करण्याची आणीबाणीची वेळ आली तेव्हां फत्तेखानाला पश्चात्ताप होणें साहजिक होतें. त्याप्रमाणें त्यानें आपल्याकडून शिकस्त करून नाइलाज झाल्यावरच किल्ला हवाली केला [ श.१५५५ज्येष्ठ = इ.१६३३जून ]. परंतु वरील विधान करितांना तत्कालीन सर्वमान्य समजूत जी ' दिल्लीश्वरोवा जगदीश्वरो वा ' तिचाच अनुवाद त्यानें केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. [ 'मासीर-अल-अमरा,' स्कॉटकृत फेरिस्ताचें भाषांतर, भा. १ पृ. ४०२ ]

# निजामशाही व आदिलशाही सुलतान

| शक-दशक | शक | निजामशाही | आदिलशाही | सन | सन-दशक |
|---|---|---|---|---|---|
| १४७० | | | इब्राहीम (इ.३४पा) | | १५४८ |
| | ७५ | हुसेन १ | | ५३ | |
| १४८० | ८० | | अली १ | ५८ | १५५८ |
| | ८७ | मूर्तजा १ | | ६५ | |
| १४९० | | | | | १५६८ |
| १५०० | | | | | १५७८ |
| | ०२ | | इब्राहीम २ | ८० | |
| | ०८ | हुसेन २ | | ८६ | |
| १५१० | | | | | १५८८ |
| | ११ | इस्माएल | | ८९ | |
| | १३ | बुऱ्हाण २ | | ९१ | |
| | १७ | इब्राहीम | | ९५ | |
| | १८ | बहादर | | ९६ | |
| १५२० | | | | | १५९८ |
| | २५ | मूर्तजा २ | | ०३ | |
| १५३० | | | | | १६०८ |
| १५४० | | | | | १६१८ |
| | ४९ | | महमद (इ. ५७ पर्यंत) | २७ | |
| १५५० | | | | | १६२८ |
| | ५२ | हुसेन २ | | ३० | |
| | ५४ | मूर्तजा ( शहाजीनें बसविलेला ) | | ३२ | |
| | ५५ | | | ३३ | |
| | ५८ | निजामशाहीचा अंत | | ३६ | |

# श्रीशिवाजी महाराजांचे कुलोपाध्याय

( ले.–गो. रा. राजोपाध्ये, सातारा. )

शहाजीराजे हे विजापूरच्या बादशहाच्या अधिराज्याखालीं बंगळुरास राज्य करीत होते त्यावेळीं त्यांचे दरबारांत मल्हारभट व प्रभाकरभट हे राज-पुरोहित होते ( राधामाधवविलासचंपू ). हे व प्रभाकरभटाचे पुत्र बाळंभट हे शिवाजी महाराजांचे पुरोहित होते. शिवाजी महाराजांचें जें भोसलेकुल त्याच्याशीं या घराण्याचा पुरोहितत्वाचा संबंध शिवाजी व शहाजी यांचे पूर्वीपासून आहे व तो अद्याप चालत आहे. तसेंच भोसले घराण्याच्या शाखा जिकडे जिकडे पसरल्या तिकडे तिकडे या पुरोहितांच्याहि शाखा पसरल्या आहेत. तंजावर, सातारा, कोल्हापूर, अक्कलकोट व नागपूर येथें या उभय कुलांच्या शाखा आहेत. वर उल्लेखिलेले मल्हारभट व प्रभाकरभट हे या पुरोहित घराण्याच्या साताऱ्यांतील दोन शाखांचे पूर्वज होत. खालील माहिती ही या दोन शाखांची दिली असून ती भोसले यांच्या घराण्याशीं असलेल्या संबंधापुरतीच दिली आहे.

भोसल्यांचे पुरोहित राजोपाध्ये हे देशस्थ ऋग्वेदी आश्वलायनसूत्री असून त्यांचें गोत्र शाकल्य आहे. या घराण्याचे मूळपुरुष मुद्गलाचार्य गोसावी हे भोसले यांचें मूळ घराणें उदेपुरास होतें तेथें त्यांचे पुरोहित होते; असें न्यायशास्त्री पंडितराव ( वरील दोन शाखांपैकीं एक शाखा ) यांची जी बखर प्रसिद्ध झाली आहे तिचे पुरवणींत म्हटलें आहे. परंतु उदेपूरच्या या पुरोहितत्वाविषयीं ऐतिहासिक पुरावा उपलब्ध नाहीं. या घराण्याचे कुल-स्वामी मौजे आर्वी ता. श्रीगोंदे जि. अहमदनगर येथील देवस्थान श्रीमुद्गले-श्वर हे होत. येथें या घराण्याची वसति असल्यापासूनची माहिती उपलब्ध आहे.

शिवाजी महाराजांचे पणजे बाबाजी भोसले हे आर्वी, देऊळगांव, हिंगणी, पेडगांव, वडगांव व शिरापूर या गांवचे मोकाशी व पाटिलकीचे वतनदार होते, त्या वेळीं वरील दोन शाखांचे पूर्वज ( मल्हारभट व प्रभाकरभट यांचेहि पूर्वीचे ) मल्हारभट व रामेश्वरभट हे त्याच गांवांचे

वतनदार कुलकर्णी व जोशी असून मुद्गलेश्वर देवस्थानचे वहिवाटदार आणि भोसले यांचे उपाध्ये होते. रामेश्वरभट बिन नारायण भट यांचे नांवाचा उल्लेख असलेलीं पत्रें म. इ. सा. खंड १५ पृ. ४००–४६०मध्यें प्रसिद्ध झालीं आहेत. हीं पत्रें शके १५१९ पासून शके १५५५ पर्यंतचीं आहेत. यांपैकीं भोसले यांचीं पत्रें पुढील प्रमाणें आहेत:—

| नांव | शक | शि. प. सा. सं. | विषय |
|---|---|---|---|
| बाबाजी भोसले | १५१९ | ( ११ ) | पेडगांव येथील जमीन दिली असे. |
| संभाजी भोसले | १५४३ | (१२७) | (सदर जमीन चालविणें.) |
| विठोजीचे मुलगे | १५४४ | (१७७) | द्रव्य ठेवलेलें परत मिळाल्याची |
| मालोजीराजे | ,, | (१७८) | ,, पावती |
| विठोजी राजे | १५४५ | (२०४) | वरात दिली ती आदा करणें. |
| शहाजी राजे सरलष्कर | १५४७ | (२२२) | वडगांवची जमीन चालविणें. |
| कृष्णाजी राजे | १५५० | (२८०) | ,, ,, |
| शहाजी राजे | १५५३ | (३३३) | चांभारगोंदे येथील जमीन चालविणें |
| ,, | १५५४ | (३३४) | जलालपूर येथील जमीन चालविणें. |

वरीलप्रमाणें रामेश्वरभट यांस दिलेल्या जमिनी चालविण्याबद्दल भोसले यांचीं आज्ञापत्रें आहेत. याशिवाय आर्वी वगैरे गांवांतील जमिनी चालविण्याबद्दल मलिकअंबर इत्यादि मुसलमान अधिकारी व इतर मराठे आणि ब्राह्मण सरदार अधिकारी यांचींहि आज्ञापत्रें आहेत. या पत्रांत रामेश्वरभट यांस जुनारदार 'धर्माधिकारी' असें उपपद लाविलें आहे; भोसले यांनीं त्यांस उपाध्ये असें म्हटलें आहे. आर्वी वगैरे कडील कांहीं जमिनी या घराण्यांत अद्यापि चालत आहेत.

रामेश्वरभट यांनीं (१) बाबाजी (२) मालोजी व विठोजी व (३) शहाजी अशा तिन्ही पिढ्यांच्या कारकीर्दींपैकीं दुसरी सबंध व पहिली आणि तिसरी अंशत: पाहिली होती. ते विशेषत: आर्वीसच रहात होते. मल्हारभट हे बाबाजी भोसले यांचे बरोबर वेरूळास गेले होते. ते बाबाजींचे सांगण्यावरून कांहीं राजकार्याकरितां उदेपुरास जाऊन व तेथून परत आल्यावर यवनांचे कैदेंत वारले, असें बखरींत नमूद आहे. मल्हारभटांचे पुत्र लक्ष्मणभट यांनीं मालोजीचें लग्न फलटणचे निंबाळकर नाईक देशमूख यांचे बहिणीशीं जमविलें. ते मालोजीजवळच रहात असत. शहाजीचे दरबारीं असलेले

मल्हारभट पुरोहित हे या लक्ष्मणभटाचे पुत्र व त्याच दरबारीं असलेले प्रभाकरभट हे रामेश्वरभटाचे पुत्र होत. शहाजीराजे शके १५५८ चे सुमारास कर्नाटकांत गेले तेव्हां त्यांचे बरोबर हे दोघे गेले असावे.

प्रभाकरभट ह्यांचा उल्लेख वरील खं. १५ यांतील श. १५४० ले. ३८५ चे पत्रांत आहे व तो त्यांजकडे जमीन चालविण्याबद्दलचा आहे. त्या वेळीं ते आर्वीकडे रहात असत. पुढें शहाजीराजे यांचेबरोबर ते कर्नाटकांत गेले. तेथें राजांकडे विद्वान् लोक येत. त्यांची दाद लावून त्यांचा योग्य परामर्श घेणें हें काम त्यांचेकडे होतें ( रा. मा. वि. चंपू पान २३५ ). शहाजी-राजे यांस स्वप्नांत श्रीशंकराचा दृष्टांत झाला. तें स्वप्न त्यांनीं प्रभाकरभट यांस सांगितलें; व त्यांच्या अनुमोदनानें शिवाजीची रवानगी त्यानीं पुण्याकडे केली ( शिवभारत अध्याय १० श्लोक २२।२३ ). पुढें शहाजीराजे यांस विजापूरच्या बादशहानें कैद केले व नंतर सोडले. परंतु बादशाहा मनांत दंश धरून कदाचित् शिवाजीवर सूड उगवील या शंकेनें कान्होजी जेधे प्रभृति मंडळींस शिवाजीचे मदतीस शहाजीनें पाठविलें; त्यांजबरोबर प्रभाकर-भटहि शिवाजीकडे गेले असावे. शहाजीराजे संकटांतून पूर्णपणें मुक्त व्हावें यासाठीं शिवाजीकडून कांहीं दैविक अनुष्ठान करविणें इष्ट होतें. म्हणून मातुःश्री जिजाबाई व प्रभाकरभट यांचे विद्यमानें शिवाजी महाराजांनीं महाबळेश्वरास गोपाळभटाकडून मंत्रोपदेश घेतला व त्यांस सूर्यानुष्ठान करण्यास सांगितलें ( भा. इ. सं. मं. इतिवृत्त शके १८३४ पृ. ३२६ ). याबद्दल प्रभाकरभट यांचे सांगण्यावरून मातुःश्री जिजाबाईंनीं गोपाळभट यांस वर्षासनाची सनद करून दिली ( वाडकृत सनदापत्रें पृ. ११८ ले. ३ ). पुढें अफजलखानाचे भेटीचे प्रसंगीं प्रभाकरभट शिवाजी महाराजांचे सान्नि-ध्यांत होते. त्यांनीं त्यावेळीं महाराजांकडून श्रीशंकराची पूजा करविली व नंतर महाराज तुळजादेवीचें चिंतन करून व पुरोहित ( प्रभाकरभट ) आणि इतर ब्राह्मण यांस नमस्कार करून खानाचे भेटीस निघाले ( शिवभारत अ. २१ श्लोक ११।१५ ). कांहीं निर्णयाकरितां राजापूर येथें विद्वान् शास्त्री-पंडितांचीं सभा भरली होती. तींत प्रभाकरभट हे उपस्थित होते ( भा.इ. सं.मं. इतिवृत्त शके १८३५ प्र. २९५ ). सभेच्या निर्णयपत्रांत सभासदांची यादी दिली आहे व तेथें ह्यांस काशीस्थ पंडित असें म्हटलें आहे. यावरून प्रभाकरभट

यांनीं अध्ययनाकरितां कांहीं दिवस काशीवास केला होता असें दिसतें. यानंतर शिवराज्याभिषेकापूर्वींच ते वारले.

लक्ष्मणभटांचे पुत्र मल्हारभट हे शहाजीराजांचे दरबारीं होते हें पूर्वी सांगितलेंच आहे. शहाजीराजे यांस कैद केलें त्या वेळीं त्यांचे मुक्ततेकरितां त्यांनीं शंकराचें अनुष्ठान केलें ( रु. १७१ पृ. १८ ). शहाजीराजे मृत्यु पावले त्यावेळीं ते त्यांचे सांनिध्यांत होते. पुढें शिवाजीमहाराजांकडे ते आले. शिवाजीमहाराज दिल्लीकडे गेले त्यावेळीं ते त्यांच्याबरोबर होते. शिवाजी व संभाजी औरंगजेबाचे कैदेंतून सुटून दक्षिणेंत आले त्यावेळीं वाटेंत संभाजी-विषयीं बादशहाचे लोकांस संशय आला. पण संभाजीस आपल्या ताटांत जेवावयास घेऊन तो ब्राह्मणच आहे असें मल्हारभटांनीं बादशहाचे लोकांस भासविलें व सर्वांची सुटका करून घेतली. पुढें सर्व मंडळी आर्वीस आली व तेथें मुद्गलेश्वराचें दर्शन घेऊन आपापल्या ठिकाणीं गेली ( कै. भावेप्रकाशित रुमाल नं. १ पृ. ५७ पहा ). पुढें मल्हारभट यांस शिवाजी महाराजांनीं न्यायशास्त्री पंडितराव अशी पदवी दिली. परंतु राज्याभिषेकसमयीं तत्संबंधीं अधिकार राजोपाध्ये घराण्याचे तंजावरचे शाखेपैकीं रघुनाथभट यांस दिला. कारण, रघुनाथभट हे फार विद्वान् म्हणून प्रख्यात होते. मल्हारभट यांस भास्करभट व शंभुभट अशीं दुसरीं दोन नांवें होतीं. शिवाजीमहाराजांचे पश्चात् सोयराबाई व संभाजी यांचा तंटा लागला त्यावेळीं मल्हारभटांनीं संभाजीचा पक्ष घेतला होता. मल्हारभट हे शेवटीं आरवीस राहिले व तेथेंच निवर्तले.

प्रभाकरभट वारल्यानंतर त्यांचे पुत्र *बाळंभट हे शिवाजीमहाराजांचे

---

* बाळंभट हे प्रभाकरभटांचे दत्तक पुत्र होत. प्रभाकरभट यांनीं त्यांस दत्तक घेतल्यानंतर प्रभाकरभटांचे पश्चात् त्यांचे स्त्रीनें दत्तकपत्र लिहून घेतलें आहे. त्याची मिति शके१५९६ आषाढ शुद्ध एकादशी अशी आहे. त्यावर साक्षी आहेत त्या येणें-प्रमाणें:--१ शामभट आरवीकर २ महादेवभट आरवीकर ३ विश्वनाथभट टोंके ४ बाळकृष्णभट टोंके ५ खंडभट गुरु ६ अनंतभट गुरु ७ शंभुभट गौतम ८ रत्नेश्वर निवासकर ९ धेनु जोशी १० कोनेर जोशी ११ गागाभट १२ जयराम १३ केशवभट शृंगारपूरकर १४ मुकुंद जवदा १५ महादेवभट पोटे १६ होसिंग नरसिंहभट. यांपैकीं पहिलें नांव कोल्हापूर शाखेच्या पहिल्या पुरुषाचें आहे. तिसरें नांव रा. मा. वि. चंपूंत आहे. ११ वें नांव प्रसिद्ध आहे. १२ वें रा. मा. वि. चंपूकाराचें आहे असें वाटतें.

आश्रयास होते. त्यावेळच्या मुत्सद्दीवर्गांत त्यांची गणना होती ( विष्णु गोपाळ भिडे कृत शिवाजीमहाराज यांचे वंशाचा व अष्टप्रधानांचा इतिहास). बाळंभटांचा उल्लेख १५ व्या खंडांतील शके १६१० ले. ४२३ चे पत्रांत आहे. त्यांत कृष्णाजी भोसले यांनीं सैन्याचे खर्चाकरितां ५ शें रुपये पाठविण्याविषयीं त्यांस लिहिलें आहे. शिवाजीमहाराजांचे पश्चात् ते तंजावरकडे गेले. शके १६०९ सालीं शहाजीची उपस्त्री नरसांबा ( संताजीची आई ) इनें तंजावरकडील एका गांवाचें पूर्वीचें नांव बदलून व त्यास ' नरसांबापूर ' असें नांव ठेवून तो गांव अर्धोदयपर्वनिमित्त ब्राह्मणांस अग्रहार दिला व त्या गांवचीं २३ क्षेत्रें करून एक क्षेत्र बाळंभट यांस दिलें ( इ. वृ. १८३८ पृ. १३१-३२ ). शके १६१२ सालीं कृष्णाजी गंगाधर भोसले यांनीं मंगळूर प्रांतांतील कंजनकोळ हा गांव सूर्यग्रहणानिमित्त बाळंभट यास धारादत्त दान दिला. या दानपत्रावर " सरकार-इ-आली सर सेनानी " अशा अर्थाचा फारशी शिक्का आहे. त्यावरून हे कृष्णाजी भोसले सेनापतीच्या हुद्यावर होते; असें दिसतें. पण कोणाच्या तें स्पष्ट नाहीं.

संभाजीनें पंडितरावाचे अधिकार रघुनाथभटाचे पुत्र मोरेश्वरभट यांस प्रथम दिलें * ( मोरेश्वरभटांच्या शिक्क्याचें एक दानपत्र शके १६०३ सालचें म. इ. सा. खंड २० यांत लेखांक २७१ म्हणून छापलें आहे ). परंतु हा अधिकार अष्टप्रधानांच्या इतर अधिकाराबरोबर संभाजीनें पुढें आपल्या आवडत्या कलुशास दिला. पुढें रघुनाथभट व मोरेश्वरभट हे राजारामाबरोबर तंजावराकडे गेले व तिकडेच राहिले.

मल्हारभटांचे बंधु शामभट म्हणून होते तेहि राजारामाबरोबर तंजावराकडे गेले व पुढें पन्हाळ्याकडे राहिले. हे व यांचे पुत्रपौत्र कोल्हापूरच्या

---

* श्रीशिवाजी महाराजांनीं ज्यांस पंडितरावाचे अधिकार दिले त्यांच्यावर श्रीसमर्थांची कृपा होती. त्यांस समर्थांनीं स्वदस्तुरचें पत्र लिहिलें. तें भा. इ. सं. मं. वृत्त शके १८३६ यांत पान १६४-६५ वर दिलें आहे. मोरेश्वर पंडितराव यांचें आज्ञापत्र शके १६०८ चैत्र शु. २ चें संभाजी महाराजांचे कारकीर्दीतील आहे. याचा उल्लेख भा. इ. सं. द्वि. सं. शके १८३५ यांत पान १३०-३१ वर आला आहे. गंगाधर रंगनाथ कुलकर्णी यास मोंगलांनीं बलात्कारानें बाटविलें त्यास प्रायश्चित्त देण्यासंबंधीं हें आज्ञापत्र आहे. यावरून मोरेश्वर रघुनाथ हे शके १६०८।९ पर्यंत तरी पंडितराव पदावर होतें असें दिसतें.

महाराजांचे राजोपाध्ये म्हणून तेथें राहिले. हल्लीं त्यांचा वंश कोल्हापुरास आहे. राजारामानें पंडितराईचे अधिकार श्रीकराचार्य कालगांवकर यांस दिले व त्यांचेच वंशाकडे ही पदवी सध्यां चालत आहे. उपाध्येपण फक्त राजोपाध्ये यांच्या कोल्हापूर शाखेकडे चालू होतें ( तें 'वेदोक्त प्रकरणांत' नाहींसें झालें ). सातारच्या शाखेकडे उपाध्येपण व पंडितराई हीं दोन्ही कामें राहिलीं.

मल्हारभटाचे पुत्र *मुद्गलभट हे, संभाजीचे वधानंतर येसूबाई व शाहू यांस बादशहानें धरून दिल्लीस नेलें त्यांचे बरोबर गेले होते. पुढें शाहूमहाराज सुटून दक्षिणेंत आल्यावर ह्यांचा व ताराबाईचा तंटा लागला. त्यावेळीं मुद्गलभटांनीं शाहूमहाराजांचा पक्ष घेतला व पुढें ताराबाईस कैद करण्याच्या कामीं प्रमुखपणें मदत केली. त्यामुळें ताराबाईचा व त्यांचा वाकुडपणा फारच वाढला. पूर्वी मल्हारभटांनीं संभाजीचा पक्ष घेतला होता त्यावेळीं त्यांच्याशीं व पुढें त्यांचे पुत्र मुद्गलभट यांच्याशीं सोयराबाई व ताराबाई यांचा वाकुडपणा होताच; त्यांत वरील कारणामुळें विशेषच भर पडली. शाहूमहाराजांनीं राज्याभिषेकसमयीं पंडितराईचें अधिकार मुद्गलभटास दिले व त्यांस विसापूर, चिंचणेर इत्यादि गांवें इनाम दिलीं. मुद्गलभट हे शके १६५२ मध्यें वारले. त्यावेळीं त्यांचें वय ९९ वर्षांचें होतें.

बाळंभटाचे पुत्र रामेश्वरभट यांचा उल्लेख १५ व्या खंडांतील शके १६०९।१०।११ या सालच्या पत्रांत आहे. पहिल्यांत कृष्णाजी भोसले यांनीं त्यांस कर्नाटकाकडील जमीन दिल्याचा मजकूर आहे व दुसऱ्या दोन पत्रांत कृष्णाजी भोसले यांनीं त्यांचेकडून कर्ज घेतल्याचा मजकूर आहे. राजाराम महाराजांनीं त्यांस वालगुंड प्रांतांतील कंजनकोल हा गांव इनाम दिला होता. तो त्यांनीं तसाच शके १६३१ सालीं पलुसकर नामक ब्राह्मणास दान दिला. या दानपत्रांत 'भोसले' या नांवाचें संस्कृतीकरण 'भवशाल'+

---

* मुद्गलभट पंडितराव यांचा उल्लेख देवस्खे यांच्या पंक्तिपावनत्वासंबंधींच्या लेखांत भा. इ. सं. इतिवृत्त शके १८३६ यांत पान १८—१९ वर आला आहे.

+ आमच्या संग्रहीं श १६३१ माघ व. १४ ( १६।२। १७१० ) ची एक सनद आहे. तींत 'भवशाल' हें भोसले शब्दाचें संस्कृतीकरण केलेलें आहे. सनदेंतील कार्यापुरता उल्लेख असा-शिवरात्रिपर्वकाले हारीतसगोत्रोत्पन्नाय ऋक्शाखाध्यायिने अधीतसांगवेदशास्त्राय महादेवभटपुत्राय श्रीधरभट्टशर्मणे ब्राह्मणाय शाकल्यगोत्रोत्पन्नेन.... भवशालपुरोहितेन श्रीमदखिलनृपधुंरधरयशःप्रशस्तिप्रस्तावप्रथमनिर्वर्णनीयनिरवद्यगुण-

असें केलें आहे. बाळंभट व रामेश्वरभट यांस कर्नाटकाकडील जीं इनामें मिळालीं तीं सध्यां त्यांचे वंशाकडे चालत नाहींत.

राजोपाध्ये घराण्याच्या साताऱ्च्या ज्या दोन शाखांच्या वंशावळीची वर हकीकत दिली त्या वंशावळी येणेंप्रमाणें:–

| (१) | (२) |
|---|---|
| मल्हारभट | रामेश्वरभट बिन नारायणभट |
| \| | \| |
| लक्ष्मणभट | प्रभाकरभट |
| \| | \| |
| मल्हारभट | बाळंभट |
| \| | \| |
| मुद्गलभट | रामेश्वरभट |

यांत फक्त वडील पुरुषांचींच नांवें दिलीं आहेत. यापुढील वंशावळींतील नांवें खालीं दिलीं आहेत.

| | |
|---|---|
| रघुनाथराव | रघुनाथभट |
| \| | \| |
| रामचंद्रराव | धोंडभट उर्फ गोपाळभट |
| \| | \| |
| रघुनाथराव | हैबतराव |
| \| | \| |
| रामचंद्रराव | अमृतराव |
| \| | \| |
| ( हींच नांवें याच क्रमानें पुढें ) | कृष्णराव |

---

गणनिकेतनस्य **श्रीमन्मालजीराजवर्मणः** प्रपौत्रेण सतत–दिगंतसमागतार्थिजन-मनोरथातिगवसुवितरणाविस्मरितकर्णबालिप्रमुखवदान्यधर्मस्य श्रीमत् **शाहजीराजवर्मणः** पौत्रेण निजभुजबलमात्रनिर्जितानेकजनपदस्य परमपौरुषाक्रांतचिरंतनागिरिभूदुर्गवर्गाभिनवविरचितसुदुस्तरगिरिदुर्गपतेः श्रीमत् **शिवराजवर्मणः** पुत्रेण देवद्विजसंस्थापनमात्राभ्युपेतमहिततरक्षात्रधर्मेण दिगंतविश्रांतयशसा कौशिकगोत्रोत्पन्नेन **श्रीराजारामवर्मणा** नृपमुकुटोत्तंसेन....वालगुंडप्रांतान्तर्गत कंजनकोलग्रामः....दत्त... स्वहस्तेन विलिखितम् । [ ह्या दानपत्राच्या खरेपणाबद्दल संशय आहे. कारण छ. राजाराम ह्या वेळीं स्वर्गस्थ आहे.—सं. ]

* मुद्गलभटांचे पुत्र रघुनाथभट यांचें कऱ्हाड येथील ब्राह्मणास पत्र. पर्जन्यसूक्ताचें अनुष्ठान करण्याविषयींचें भा. इ. सं. इ. वृत्त श. १८३६ पृ, ४२ वर आलें आहे.

मुद्गलभटांचे पश्चात् त्यांचे पुत्र रघुनाथराव यांस शाहूमहाराजांनीं पंडितराव हेंच पद दिलें. पुढें शाहूमहाराज निवर्तल्यावर रामराजे गादीवर आले व सर्व सूत्रें ताराबाईकडे आलीं. त्यावेळीं तिनें मुद्गलभटाचा वाकुडपणा मनांत आणून रामचंद्रराव यांजकडून पंडितराईचे अधिकार काढले व त्यांस कांहीं काळ कैदेंतहि ठेविलें. रघुनाथराव शके १६८१ सालीं वारले. त्यावेळीं त्यांचे पुत्र रामचंद्रराव तीन वर्षांचे होते. त्यास पुढें रामराजाचे पुत्र दुसरे शाहूमहाराज यांनीं पंडितराईचीं वस्त्रें दिलीं. त्यानंतर त्यांचे पुत्र रघुनाथराव यांस तीं मिळालीं. रघुनाथरावांचे पश्चात् त्यांचे पुत्र रामचंद्रराव यांस पंडितराईचीं वस्त्रें प्रतापसिंहमहाराज यांनीं दिलीं.

रामेश्वरभटांचे पश्चात् त्यांचे पुत्र रघुनाथभट यांस कोल्हापूरचे संभाजी उर्फ संभूमहाराज यांनीं मौजे वाकुर्डे ता. शिराळें हा गांव इनाम दिला. परंतु पुढें कोल्हापूरचे शंभु व सातारचे शाहू यांचे तहाचे घालमेलींत तो गांव रद्द झाला व पुढें शाहूमहाराज मिरज प्रांतीं असतांना त्यांनीं रघुनाथभट यांचे पुत्र धोंडभट यांस मौजे वासंबे ता. तासगाव हा गांव कुलोपाध्ये म्हणून इनाम दिला. पुढें शाहूमहाराजांचे पश्चात् राज्यसूत्रें ताराबाईचे हातांत आल्यावर तिनें पंडितराव हेंच पद धोंडभट ऊर्फ गोपाळभट यांस दिलें तें त्यांच्याकडे २७ वर्षे होतें. त्यांचे पश्चात् त्यांचे पुत्र हैबतराव यांस पंडितराईचा पोषाख माधवराव पेशवे यांजकडून दसऱ्यानिमित्त येत असे ( वाडकृत माधवराव पेशवे यांचे रोजनिशींतील उतारे पान ५३ ). हैबतरावाचे पुत्र अमृतराव ऊर्फ दाजीबा हे प्रतापसिंह महाराज वासोटा किल्ल्यावर दुसरे बाजीरावाचे कैदेंत असतां त्यांचेबरोबर होते. तेथें ते राजकारणांत व इतर गोष्टींत प्रतापसिंहांचे उपयोगी पडले म्हणून त्यांनीं त्यास मौजे भाटमरळी ता. सातारा हा गांव इनाम दिला. १५ व्या खंडांत रंगो बापूजीची हकीगत प्रसिद्ध झाली आहे. तींत दाजीबासंबंधीची हकीकत थोडी आली आहे. अमृतराव यांजकडे शिक्केनिसीचा अधिकार प्रतापसिंह यांनीं दिला होता. त्यांचे पुत्र कृष्णराव हे, प्रतापसिंह महाराजांस पदच्युत करून काशीस नेले त्यावेळीं त्यांचे बरोबर गेले होते. प्रतापसिंहाचे धाकटे बंधु शहाजी उर्फ अप्पासाहेब महाराज यांचे आज्ञेविरुद्ध ते प्रतापसिंहाबरोबर गेले म्हणून त्यांचा भाटमरळी हा गांव त्यांनीं जप्त केला.

येणेप्रमाणें भोसले घराणें व राजोपाध्ये घराणें यांच्या परस्परसंबंधाची सातारचे राज्य खालसा होईपर्यंतची हकीकत थोडक्यांत दिली आहे.

यापुढील वरील दोन शाखांची वंशावळ अशी:—

( १ ) रघुनाथराव—रामचंद्रराव—रघुनाथराव—रामचंद्रराव(हल्लीं) पंडितराव.

( २ ) गोपाळराव—रामचंद्रराव—गोविंदराव ( विद्यमान ).

कोल्हापूरचे शाखेची वंशावळ अशी:—शामभट ( मल्हारभटाचे बंधु वर उल्लेख केलेले )—लक्ष्मणभट—

—सदाशिवभट—शामभट— सदाशिवराव—

—नारायणराव — सदाशिव—नारायण ( विद्यमान )

साताऱ्च्या दोन शाखा वर सांगितल्या त्याशिवाय ज्या शाखेची उपाध्येपणाची वृत्ति साताऱ्यास आहे; पण वसति साताऱ्यास नाहीं, अशी तिसरी शाखा आहे. ही शिराळ्याची शाखा होय. या शाखेशीं जवळच अक्कलकोटची शाखा आहे. या दोन्ही शाखांचे पहिले पुरुष, तंजावर शाखेपैकीं मल्हारभट हे शाहूमहाराजाचे वेळेस होते त्यांचे, दोन पुत्र होत. तंजावरच्या शाखेसुद्धां या सर्व शाखा मूळपुरुष मुद्गलाचार्य यांचे नातू मुद्गलबावा यांच्यापासून पुढें फुटल्या. साताऱ्च्या पहिल्या शाखेंतील मल्हारभट ऊर्फ शंभुभट यांचे द्वितीय पुत्रापासून एक व मुद्गलभट यांचे द्वितीय पुत्रापासून दुसरी, अशा दोन उपशाखा फुटल्या. तसेंच साताऱ्च्या दुसऱ्या शाखेपैकीं धोंडभट यांचे द्वितीय पुत्रापासून आणखी एक उपशाखा फुटली.

पंडितराई व उपाध्यिक यासंबंधींचीं कामें खालीलप्रमाणें होतीं:—

१ सरकारचे नित्यनैमित्तिक अनुष्ठानांवर देखरेख करणें. २ शास्त्रार्थ जरूर लागेल तो सांगणें. ३ आचार, व्यवहार, प्रायश्चित्त यासंबंधीं निर्णय देणें. ४ नित्यनैमित्तिक दानें सरकारांकडून देवविणें. ५ शांतिपुष्टिसंबंधीं कृत्यें यथाशास्त्र करणें व करविणें. ६ ब्राह्मणभोजन व हव्यकव्य यासंबंधीं तजवीज करणें. ७ सणाचे व समारंभाचे दिवशीं सरकारचा प्रथम सत्कार करणें व सरकारनें प्रथम यांचा करणें. ८ कार्यप्रस्थ, तिथिपर्वणी वगैरेसंबंधीं जो विधि सरकारनें करणें असेल त्याची तयारी पूर्वदिवशीं करून घेणें. ९ दूरस्थ व क्षेत्रस्थ जे ब्राह्मण येतील त्यांस राजदर्शन करवून त्यांचा योग्य सत्कार होईल अशी तजवीज करणें. १० सरकारचे राशीस इष्टानिष्ट ग्रह कोणते याची नित्य चालना ठेवून तत्संबंधीं जे विधि करणें असतील तें करणें व करविणें. ११ कचेरीस शिष्ट येतील त्यांचा सत्कार करणें. १२ आचारव्यवहारासंबंधीं जरूर ती चौकशी करणें व त्या कामीं जासूद चपराशी लागतील ते सरकारकडून घेणें.

# शिवचरित्राचें एक लुलेंपांगळें साधन

( ले.—प्रो. रा. प. सबनीस, पुणें )

जॉन फ्रायर नांवाचा केंब्रिज विश्वविद्यालयाचा वैद्यकशास्त्रांतील एक पदवीधर ईस्ट इंडिआ कंपनीच्या कांहीं कामासाठीं हिंदुस्थानाला येण्यास ९ डिसेंबर १६७२ रोजीं निघाला. हिंदुस्थानांत व इराणांत सुमारें नऊ वर्षे प्रवास करून तो २० आगष्ट १६८२ रोजीं इंग्लंडला परत जाऊन पोहोंचला. आपल्या प्रवासाचा वृत्तांत छापण्यास तो फारसा उत्सुक नव्हता, असें ह्मणतात. पण जेव्हां इंग्रजांना कमीपणा देणाऱ्या फ्रेंच प्रवासवृत्तांचीं भाषांतरें वरचेवर होऊं लागलीं, आणि पुष्कळ लोक त्याला माहितीकरितां नाना प्रकारचे प्रश्न विचारूं लागले; तेव्हां त्यानें शेवटीं आपल्या प्रवासाची हकीकत छापून प्रसिद्ध केली. स्वतःच्या पुस्तकाचें वर्णन, त्यानें असें केलें होतें:—" हिंदुस्थान व इराण यासंबंधीं नवीन माहिती ( आठ पत्रें ). १६७२ ते १६८१ या नऊ वर्षांत केलेल्या प्रवासाचें वर्णन. नकाशे, आकृति व उपयुक्त कोष्टकें यांसह. लंडन, १६९८ * "

या आठ पत्रांपैकीं हिंदुस्थानच्या माहितीचीं चार पत्रें आहेत. पहिलें पत्र मच्छलीपट्टण, मद्रास, मलबारचा किनारा या मार्गानें मुंबईला पोंचल्यावर बरोबर एक वर्षानें लिहिलें आहे. यांत सहा प्रकरणें केलेलीं आहेत. पहिल्या तीन प्रकरणांत मच्छलीपट्टणाला पोंहोचेपर्यंत हकीकत दिलेली असून चवथ्यांत मच्छलीपट्टणाचें, पांचव्यांत कारोमांडेल किनाऱ्या-वरील युरोपीयांच्या वसाहतीचें व सहाव्यांत मलबारच्या किनाऱ्याचें वर्णन केलें आहे. दुसरें पत्र १५ जानेवारी १६७५ रोजीं पाठविलेलें आहे. यांत मुंबई व आसपासचा प्रदेश यांचें वर्णन पांच प्रकरणांत केलेलें असून त्यांतील

---

* Dictionary of National Biography. आमची आवृत्ति स्मिथ एल्डर आणि कंपनीनें १८७३ त काढिलेली आहे. कलकत्त्याच्या आठवड्याच्या इंग्लिशमन या पत्रांतील लेख कंपनीनें पुस्तकरूपानें छापून काढिले. पुस्तकाला प्रस्तावना व सूची या तर नाहींतच, पण अनुक्रमणिका देखील नाहीं. अशुद्धांची गर्दी आहे. लेखांत [ ] कंसांत दिलेले आंकडे या आवृत्तींतील पानांचे आहेत.

चवथ्या प्रकरणांत शिवाजीकडे त्याच्या राज्यारोहणाच्या प्रसंगीं मुंबईच्या प्रेसिडेंटनें ( गव्हर्नर ही पदवी मागून उपयोगांत आली ) पाठविलेल्या वकिलातीची हकीकत आहे. त्यानंतर फ्रायर सुरतेकडे जाऊन पुन्हां दक्षिणेंत परत आला; व त्यानें जुन्नरपर्यंत प्रवास करून तेथील मोंगल सुभेदाराची भेट घेतली. या प्रवासाची हकीकत २२ सप्टेंबर १६७५ रोजीं लिहिलेल्या पंचप्रकरणात्मक तिसऱ्या पत्रांत दिली आहे. चवथ्या पत्राला तारीख नाहीं; पण हें पत्र आणि या पत्रांतील चवथें प्रकरण सर्वांत महत्त्वाचें आहे. प्रथम फ्रायर कारवारला गेला, तेथील अराजकामुळें झालेल्या अव्यवस्थेचें वर्णन त्यानें पहिल्या प्रकरणांत केलें आहे. तेथून तो गोंवें व वेंगुर्लें या गावांची सफर करून कारवारला परत आला. या सफरीची हकीकत दुसऱ्या प्रकरणांत आहे. तिसरें प्रकरण मनोरंजक झालें आहे; कारण, मुसलमानांचा वेष करून फ्रायर गोकर्णाची यात्रा करितो, तेथील उत्सव पाहतो व भोंवतालच्या राजांचें त्रोटक वर्णन करितो. पुढील म्हणजे चवथ्या प्रकरणांत विजापूरच्या राज्याची स्थिति वर्णिली आहे, व दरबारांतील दुफळीमुळें त्या राज्याची इमारत कशी ढासळत चालली होती, हें दाखविलें आहे. या प्रकरणांत शिवाजीचें त्रोटक चरित्र देण्यांत आलेलें आहे. पांचव्या प्रकरणांत कांहीं किरकोळ गोष्टींचा उल्लेख असून फ्रायर मुंबईला परत गेला, त्या प्रवासाचा वृत्तांत आहे. सहाव्या प्रकरणांत एकंदर सर्व हकीकतीचा सारांश दिला असून सातव्या प्रकरणांत नाणीं, वजनें इत्यादिकांविषयीं माहिती दिली आहे.

फ्रायर हा चांगला विद्वान् होता. शिवाय त्या वेळीं प्रवासाच्या सोई आतांसारख्या भरपूर नसल्यामुळें जवळचा प्रवास करणारा मनुष्य देखील जास्त चतुर होत असे. मग मूळचा हुषार असून दहा हजार मैलांचा प्रवास केलेला व बारा देशांचें पाणी प्यालेला मनुष्य किती चतुरस्र झाला असेल ! फ्रायरची जिज्ञासा व त्याचे परिश्रम वाखाणण्यासारखे आहेत, यांत संशय नाहीं. हिंदुस्थानांतील तत्कालीन राजकारणाची माहिती तर या पुस्तकांत आहेच, पण त्याशिवाय निरनिराळ्या जाती व त्यांच्या चालीरीती, वनस्पती, पशुपक्षी, लोकांचें शास्त्रीय ज्ञान, या सर्वांसंबंधीं बरीच मनोरंजक माहिती त्यानें या पुस्तकांत सांठविली आहे. आम्ही या लेखांत

राजकारणविषयक माहितीचाच व विशेषतः शिवाजीविषयींच्या माहितीवर विचार करणार आहों.

सर्वसाधारण माहितीची वासलात आपल्याला थोडक्यांत लावितां येईल. (१) हिंदुस्थान त्या वेळीं भरभराटींत होतें, व हिंदुस्थानच्या कला-कौशल्याच्या पदार्थांनीं पाश्चात्यांना इकडे आकर्षिलें होतें. रुंद रस्ते, भव्य इमारती, हरतऱ्हेच्या जिनसांनीं भरलेले बाजार-अशीं वर्णनें अनेक ठिकाणीं आहेत. उदाहरणार्थ मच्छलीपट्टणाचें वर्णन [ १७४-५ ]. (२) आमच्या भूतदयेविषयींच्या वगैरे विक्षिप्त व आचरट कल्पना चांगल्या प्रचलित झाल्या होत्या. गाईंना मिठाई, पाखऱ्यांना दाणे व मुंग्यांना साखर उधळणारे 'धर्मात्मे' आपल्या शेजाऱ्याचा किंबहुना सख्ख्या भावाचा गळा निशंक-पणें कापीत असलेले आपण प्रत्यहीं पाहतों. तशीच स्थिति त्या वेळीं होती. फ्रायर म्हणतो- " (कालिकतमध्यें ) गाईचे दवाखाने आहेत. लोक कुत्र्यांचा विटाळ घरांत येऊं देत नाहींत, पण त्यांना बाहेर खावयास घालतात. एकं-दरींत ते माणसांपेक्षां पशूंविषयीं जास्त भूतदया दाखवितात " [ २१६ ]. कांहीं जण नखें बोटाएवढीं वाढविलीं म्हणून साधु, कांहीं जण हाताचीं हाडें निखळून ते लुले करून घेतले म्हणून साधु [ २९२ ], कांहींजण शरिरावर किळसवाणे व्रण होते म्हणून साधु [२९५]; आणि अशा साधूंच्या भजनीं आमचे लोक लागावयाचे. (३) संघटनेच्या अभावामुळें हिंदूंना दास्य आलें होतें, ही गोष्ट फ्रायरनें जाणून तिचा उल्लेख ठिकठिकाणीं केला आहे. आमच्या आतिथ्याचा मासला—" प्रबळ अशा गोवळकोंड्याच्या राजानें या परकीयांना किल्ले कां बांधूं द्यावे ?....खरें कारण असें आहे कीं, इतर राजां-प्रमाणें गोवळकोंड्याचा राजाहि समुद्रावर दुबळा आहे. परशत्रूच्या स्वाऱ्यां-पासून रक्षणासाठीं, एवढेंच नव्हे तर मोंगलांनीं पराभव केल्यास आश्रयासाठीं म्हणून हे समुद्रकांठावरील किल्ले 'मित्र' मानलेल्यांच्या हातांत देण्याचा प्रघात यांनीं पाडिला आहे " [ २०१ ]. गोवळकोंड्यास मुसलमानांची सत्ता कशी स्थापिली गेली ? वैश्यवर्ग उन्मत्त होऊन त्यानें वरील जातींचा अपमान व खालच्या जातींचा छळ केला. म्हणून वैश्यांविरुद्ध इतर जातींनीं मुसलमानांची मदत मागितली. वैश्य मेले, पण त्याबरोबरच सर्व हिंदूंच्या पायांत दास्याची शृंखला पडली. " हिंदूंना स्वातंत्र्य परत मिळविण्याची खटपट नको, त्यांना मुसलमानांच्या सुलतानी अंमलाखालीं राहिलेलें चालतें."

[ १७६ ]. औरंगजेबानें नाना प्रकारचे असह्य कर लादून हिंदूंना बाटविण्याचा सपाटा चालविला; तेव्हां अनेक हिंदु राजांनीं त्याचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनीं संघटित प्रतिकार केला काय ? " ते पोर्तुगीजांच्या अंमलाखालीं व मुंबईला जाऊन राहूं लागले. पण जर त्यांनीं एकी करून प्रतिकार केला असता, तर मोंगलांनीं शिकस्तीचा प्रयत्न करून जमविले असते, त्याच्या हजारपट शिपाई त्यांना जमवितां आले असते. " [ ३०८ ]. दक्षिण हिंदुस्थानांतहि तोच प्रकार. " दक्षिणेंत अजुनहि इतके राजे आहेत कीं, जर ते गेलेलें स्वातंत्र्य मिळविण्याचा एकजुटीनें प्रयत्न करतील, तर मुसलमानांचा या मूर्तिपूजकांपुढें टिकाव लागणार नाहीं. पण देवांना ज्याचा नाश करावयाचा असतो, त्याचा ते असा बुद्धिभ्रंश करितात कीं, त्याला स्वतःचा नाश दिसेनासाच होतो *. त्यांच्यापैकीं एकालाहि दुसऱ्याचा उत्कर्ष सहन व्हावयाचा नाहीं. त्यांच्या अंगीं हा प्रकृतिसिद्ध मत्सर नसता तर मुसलमान त्यांना आपल्या अंमलाखालीं ठेवूंच शकले नसते." [ ४०० ]. ब्राह्मणाचा मुसलमान होऊन हाजीसखान ( अझीझखान नांवाचा फ्रायरनें अपभ्रंश केला आहे. ) हा शिवाजीला विरोध करीत होता [३५६]. स्वतःच्या फायद्यासाठीं परक्याच्या लाथा खावयास 'व्यापारी' जय्यत तयार असत. " या दिवशीं मला बनियांचा चहाडखोरपणा व चोंबडेपणा पहावयास मिळाला. ते सारखे माझ्या पावलावर पाऊल ठेवून येत होते. जेथें मी जाई, तेथें ते गड्यासारखे माझ्या तैनातीला हजर रहात " [ ३५७ ]. ( ४ ) जेव्हां एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यावर घाला घालतें, तेव्हां त्याचे परिणाम दोघांनाहि अनिष्ट असे होतात. गुलामाप्रमाणें त्याचा धनीहि बिघडून दोघांच्या स्वभावांतील सर्व दुर्गुण वाढीला लागतात. इंग्रजांनीं मुंबई बेट वसविलें, तेव्हां त्यांना रहिवासी बहुतेक सर्व उनाडटप्पू मिळाले. [ २३९ ]. फ्रायरनें युरोपांतून आलेल्या गुरख्यांचें क्रौर्य, आशाळभूतपणा,

---

* न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत्।
यं तु रक्षितुमिच्छन्ति बुद्ध्या संयोजयन्ति तम् ॥
यस्मै देवा प्रयच्छन्ति पुरुषाय पराभवम् ।
बुद्धिस्तस्यापकर्षति सोऽवाचीनानि पश्यति ॥
भट्ट आनन्दक

हे असें एक संस्कृतांत सुभाषित आहे. ज्याचें रक्षण करावयाचें त्याला देव बुद्धि देतात. अर्थात् ज्याचा नाश करावयाचा असेल त्यांची बुद्धि देव नाहींशी करतात.

स्वार्थीपणा इत्यादि दुर्गुणांचें वर्णन प्रसंगानुरोधानें केलें आहे. " पोर्तुगीजांनीं आपल्या मूळच्या सद्गुणांना रजा देऊन टाकिली आहे. ते विषयलंपट झाले आहेत.....त्यांच्यांत धैर्य मुळींच राहिलें नाहीं. आश्चर्य असें वाटतें कीं, त्यांच्या अंमलाखालीं कांहीं प्रदेश तरी अजून कसा राहिला आहे! याचें कारण एवढेंच कीं, ज्यांच्यामध्यें ते राहिले आहेत, ते लोक अगदींच नेभळट आहेत " [ २३२ ]. पोर्तुगीज सरदार जान द मेन्दो याच्या मुलीचें बारा वर्षे पुरीं होण्याच्या अगोदर लग्न झालें [ २४९ ]. कान्हेरीचीं लेणीं इतर लेण्यांप्रमाणेंच कोणालाहि आश्चर्यानें थक्क करून टाकतील अशींच आहेत. आजहि शास्त्रीय ज्ञानाची इतकी प्रगति झाली असतां त्या प्राचीन काळीं माणसांनीं हीं खोदलीं असतील तरी कशीं, हें गूढ उकलत नाहीं. आपण ज्या वस्तूंचा आत्यंतिक अभिमान बाळगिला पाहिजे, अशा गोष्टींमध्यें हिंदुस्थानचे लोक साहजिकपणेंच लेण्यांची गणना करितात; तर त्यांचें अस्तित्व हिंदु लोकांना रानटी ठरवितां येत नाहीं, म्हणून पाश्चात्यांना असह्य झालें होतें. फ्रायर म्हणतो कीं, शिकंदरानें हीं लेणीं खोदिलीं अशी गप्प उठविण्यांत आली होती. फ्रायरनें ही गोष्ट असंभवनीय म्हणून ठरविण्याचा समंजसपणा दाखविला आहे. पोर्तुगीजांचा राक्षसीपणा अशा थराला पोंचला होता कीं, अलौकिक कारागिरीचे हे अवशेष जमीनदोस्त करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला [ २४८ ]. द्राक्षें आंबट या न्यायानें हिंदुस्थानच्या सृष्टिवैभवाला नाकें मुरडणाऱ्या इंग्रज लेखकांचा समाचार घेतांना विष्णुशास्त्री चिपळुणकरांनीं केलेल्या " जेथील ( इंग्लंडांतील ) मोठीं स्वादिष्ट फळें म्हणजे इकडील रानफळांसारखीं. " * या विधानाशीं फ्रायरचें एक विधान विलक्षण जुळतें आहे—" कांदे सफरचंदाइतके गोड व स्वादिष्ट " [ २४८ ]. इंग्रजांचा खादाडपणा हा युरोपांतील सर्व लोकांच्या चेष्टेचा विषय आहे. त्यांचीहि उदाहरणें फ्रायरच्या पुस्तकांत सांपडतात. " येथें ( मुंबई बेटांत ) इंग्रजांसाठीं एका महिन्यांत जितकें मांस लागतें, तितकें दाट वस्तीच्या सुरत शहरांतील सर्व मुसलमानांना वर्षांत देखील लागत नाहीं " [ २३९ ]. शिवाजीकडे गेलेल्या इंग्रज वकिलानें व त्याच्या बरोबरच्या कंपनीच्या इंग्रज नोकरांनीं मांसाचा असा फन्ना उडविण्यास सुरवात केली कीं, त्यांना मांस पुरविणारा

* निबंधमाला पृ. ५९२—चित्रशाळा आवृत्ती ३ री.

म्हातारा खाटीक ‘ हे खादाड प्राणी आहेत तरी कसले, ’ ते पहाणे म्हणून मुद्दाम रायगडावर चढून गेला. त्यानें त्रिच्याऱ्यानें कित्येक वर्षांत विकलें नव्हतें इतकें मांस थोड्या दिवसांत या नामांकित गिऱ्हाइकांना त्याला पुरवावें लागलें होतें [ २६३ ]. इंग्रज आदिकरून पाश्चात्यांचें खरें धोरण, राज्यकर्त्यांशीं विशेष संघट्टन झालेला फ्रायरसारखा प्रवासी बेसावधपणानें जे उद्गार काढून जातो, त्यांतच जास्त बरोबर प्रतिबिंबित झालेलें असतें. फ्रायरचें म्हणणें असें आहे. “ जिच्यामुळें हिंदुस्थानचे लोक आपल्याशीं चढाओढ करूं लागतील अशी एकहि महत्त्वाची कला इच त्यांना शिकवीत नाहींत; आणि मला वाटतें नौकानयन-शास्त्रासारख्या उपयोगी शास्त्रांचें शिक्षण त्यांना देणें शहाणपणाचें धोरण होणार नाहीं. शत्रूला शस्त्रें अशीं वापरावीं म्हणून कोण शिकवील ?” (२०१). येथें ते हिंदुस्थानच्या लोकांना शत्रु लेखीत होते ही गोष्ट जशी स्पष्ट झाली आहे, त्याप्रमाणेंच ते दुसऱ्यांची प्रगति कोठपर्यंत होऊं देतील, त्याची मर्यादा आंखून दिली आहे.

आतां आपण शिवाजीची जी माहिती फ्रायरनें दिली आहे, तिजकडे वळूं. प्रथम शिवाजीचें *त्रोटक चरित्र फ्रायरनें लिहिलें आहे, त्याचा विचार करूं.

भोसल्यांच्या वीरकुळांत शिवाजीचा जन्म झाला होता. त्याचा आजा, बंगूजीराजा हा निजामशाहींत मोठ्या लौकिकाला चढला. त्याचा बाप, शहाजी याला जुन्नरगडच्या सुभेदारानें सेनापति केलें. येथेंच शिवाजीचा जन्म झाला. शहाजीचा दुसरा मुलगा, संभाजी; व दुसऱ्या एका बायकोपासून व्यंकोजी हा तिसरा मुलगा झाला. निजामशाही बुडाल्यावर शहाजी व त्याचे मुलगे यांनीं विजापूर दरबारांत नोकरी धरिली. शिवाजीनें मात्र सरदारांना विजापुराविरुद्ध उठवून आपला उत्कर्ष करून घेतला. म्हणून मरतांना शहाजीनें त्याला आपल्या जहागिरीपैकीं कांहीं न देतां बंगलूरची जहागीर व्यंकोजीला दिली. [ ४०९ ].

शिवाजीची महत्त्वाकांक्षा पाहून त्याचा आरंभींच नायनाट करून टाकण्याच्या इच्छेनें विजापूरच्या सुलतानानें त्याच्यावर अबदुलखान हा कसलेला योद्धा पाठविला. शिवाजीनें त्याला शरण आलोंसें दाखवून ‘ माझें दरबारशीं सख्य करून द्यावें, ’ अशी नम्रपणें विनंति केली. तेव्हां दोन्ही सैन्यांच्यामध्यें दोघांची समक्ष भेट व्हावी, असें ठरलें. अबदुलखानाला शिवाजी सर्व खरेंखरें बोलत आहे असें वाटलें, व मित्रांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून तो त्याला भेटावयास गेला. खानानें बरोबर आपला मुलगा व दुसरे शिपाई घेतले होते. शिवाजीनें आपले शिपाई लपवून ठेऊन बाह्यात्कारीं खानापेक्षां थोडे शिपाई

* शाइस्तेखान व जयसिंग यांचा नुसता उल्लेखहि फ्रायरनें केलेला नाहीं.

बरोबर आणिले होते. खान दुरून दिसतांच शिवाजीनें त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला, व 'दरबारकडून क्षमा करविली, असें खान म्हणेपर्यंत तो उठला नाहीं. सदरेवर जावयाचें तेव्हां घाबरल्यासारखें करून तो ओरडला, "माझें डोकें उडवून टाकावें." आपण सशस्त्र व शिवाजी दिसायला निःशस्त्र, म्हणून तो भ्याला आहे, असा यावर अबदुलखानानें तर्क केला. म्हणून त्यानें आपली तरवार व खंजीर हीं शस्त्रें हुजऱ्याच्या स्वाधीन केलीं, व 'न भितां आतां यावें' असें तो शिवाजीला ह्मणाला. थोडा वेळ बोलणें झालें नाहीं, तोंच शिवाजीनें हळूच अस्तनींतून बिचवा+ काढिला व खानाच्या पोटांत खुपसला. ही इशारत मिळतांच शिवाजीचे लपून बसलेले शिपाई धावून आले. चकमकींत खानाच्या मुलानें शिवाजीला जखम केली, पण लौकरच त्याला वेष बदलून पळून जावें लागलें. खानाच्या सैन्याची दाणादाण झाली, व शिवाजीचा मार्ग मोकळा झाला. [ ४१०-११ ].

शिवाजीला यामुळें जोर चढला, व त्यानें संपन्न व मजबूत अशा पन्हाळा शहरावर हल्ला चढविला. गडावर शत्रूचे शिपाई फार नव्हते, तरी 'गड अवघड फार,' म्हणून त्यानें युक्तीचा अवलंब केला. त्याचे सातआठशें शिपाई पन्हाळ्याला गेले व तक्रार करूं लागले, "शिवाजी हा दुष्ट राक्षस आहे. आम्ही त्याची इमानानें नोकरी करीत होतों, तरी त्यानें आमचे हालहाल करून आम्हांला हांकून दिलें." असें म्हणून आपल्या अंगावरील वण त्यांनीं दाखविलें. मुसलमानांना आनंद होऊन त्यांनीं या शिपायांना आंत घेतलें व त्यांना तटावर पाहरा करावयास ठेविलें. ठरलेल्या रात्रीं संधि साधून शिवाजीची फौज या शिपायांनीं आंत घेतली. अशा रीतीनें शिवाजीनें पन्हाळा काबीज केला [ ४११ ].

त्यानंतर शिवाजीनें भोंवतालचा प्रदेश उजाड करण्यास सुरवात केली. इतक्यांत अबदुलखानाचा मुलगा बापाच्या वधाचा सूड घेण्याचा निश्चय करून बसला होता, त्याला रुस्तुमजमान येऊन मिळाला. परंतु शिवाजीनें रुस्तुमजमानाला पैशानें वश करून घेतलें. ऐन लढाईच्या वेळीं रुस्तुमजमानें घोडेस्वारांची पलटण मागें ठेविली. अबदुलखानाचा मुलगा मूठभर लोकांनिशीं शिवाजीवर तुटून पडला व आव्हान देऊं लागला—"हे भित्र्या शिव्या! हा मी येथें आहें." शिवाजीनें अर्थातच याकडे दुर्लक्ष केलें. तो म्हणाला "हा आहे तरणाबांड आणि अविचारी! याचा निकाल दुसरा कोणी तरी लावो." शिवाजीनें त्याचा विजापुरापर्यंत पाठलाग केला. शिद्दीजोहार मोठ्या फौजेनिशीं तेथें आला नसता, तर शिवाजीनें विजापूरहि काबीज केलें असतें [ ४१२ ].

शिवाजी यानंतर पन्हाळ्याला परत आला. शिद्दीजोहारानें पन्हाळ्याला वेढा घातला. पण त्याच्याशीं संगनमत करून एका रात्रीं शिवाजी तेथून निसटला. खोट्या

---

+ Stiletto असा शब्द फ्रायरनें योजिला आहे.

फर्मानाच्या जोरावर शिवाजीनें शिद्दीचें दंडाराजपुरी हस्तगत केलें. पन्हाळयाच्या मोबदला राजापूर घेतलें, अशी बतावणी त्यानें केली. इकडे विजापुरांत यादवी माजली व शिद्दीजोह्याराचें डोकें उडालें. याचा शिवाजीला फायदाच झाला. शिद्दी जोह्याराची अडचण निघाल्याबरोबर शिवाजीनें सावकाशपणें दंडाराजपुरी सारखीं अनेक गांवें घेतलीं. दंडाराजपुरीच्या अधिकाऱ्याला फक्त तेथील किल्ला तेवढा शिल्लक राहिला. त्यानें मोंगलांचें रक्षण मागितलें. जलमार्गानें त्याला मदत मिळाल्यामुळें शिवाजीला पंधरा वर्षे त्या किल्ल्यावर मारा करूनहि तो घेतां आला नाहीं. [ ४१२-१३ ]

या वेळीं विजापूरचा सुलतान मेला, व त्याचा तान्हा मुलगा राज्यावर बसला. शिवाजीनें या संधीचा फायदा घेऊन राज्यविस्तार केला, व सुरतेपर्यंत दौड करून पुष्कळ संपत्ति घेऊन तो परत आला. भावांचा धुव्वा उडविल्यामुळें व बाप मेल्यामुळें अवरंगजेबाचें आसन नुकतेंच स्थिर झालें होतें. या प्रख्यात बंडखोराला धाकदपटशानें नव्हे, तर ममतेनें बळवितां आलें तर पहावें, म्हणून अवरंगजेबानें अभयवचन देऊन त्याला दरबारीं नेलें. पण ज्यांच्या नातलगांच्या रक्तानें शिवाजीचें हात माखले होते, त्या ( राजघराण्यांतील ) स्त्रियांनीं विलाप करण्यास आरंभ केला, तेव्हां त्याला पेटाऱ्यांतून पळून यावें लागलें. " जास्त चांगली रक्षणाची तजवीज झाल्याशिवाय तो आतां पुन्हां आग्र्याला जाण्याचें धाडस करणार नाहीं. " [ ४१३-१४ ].

यानंतर शिवाजीनें सुरतेवर आणखी एकदां स्वारी केली. " अलीकडे त्यानें रामनगरचें राज्य खालसा केलें आहे. त्यानें प्रथम फक्त दक्षिणेकडे गोंव्याच्या तटापर्यंत राज्यविस्तार केला; तेथून त्यानें कर्नाटकाच्या सरहद्दीपर्यंत व सुंद ( सोंदा ) राजाच्या प्रदेशापर्यंत पाय पसरले " [ ४१४ ].

या चरित्राच्या रूपरेखेंत गाळिलेल्या कांहीं प्रसंगांची हकीकत फ्रायरनें दुसरीकडे दिली आहे. हे प्रसंग असेः—

१ शिवनेरी किल्ला घेण्याचा शिवाजीचा निष्फळ प्रयत्न. मूळचा ब्राह्मण असून नंतर कडवा मुसलमान झालेला अझीझखान जुन्नरला सुभेदार होता. त्याला मोठा तनखा असून खर्च मुळींच नव्हता, व ही गोष्ट त्याच्या लोभी स्वभावाला फार आवडती होती. शिवाजीला जेव्हां हें कळलें, तेव्हां त्यानें खानाला फितविण्याचे हरप्रयत्न करून पाहिले. ' किल्ला माझ्या हवालीं केल्यास सोन्याचे डोंगर तुला मिळतील, ' असें आश्वासन त्याला शिवाजीनें दिलें. त्यानें द्रव्य घेण्यास मुळींच मागेंपुढें पाहिलें नाहीं व ' ७००० शिपाई आपण अमक्या दिवशीं पाठवा म्हणजे किल्ला खालीं करून देतों; ' असा निरोप शिवाजीला पाठविला. इकडे ही

बातमी त्यानें बहादुरखानाला कळविली, व बहादुरखानानें शिवाजीचें सैन्य आलें तेव्हां त्याच्यावर छापा घालून तें उधळून लाविलें [ ३५६ ].

२ सुरतेवरील स्वाऱ्या– शिवाजीनें सुरत लुटली, तेव्हां सर जार्ज आक्सेंडाइन तेथील प्रेसिडेंट होता. त्यानें कंपनीच्या लोकांचें व व्यापाऱ्यांचें रक्षण इतकें उत्तम केलें कीं त्याबद्दल त्याला पोषाख बक्षीस मिळाला व शेंकडा २॥ खेरीज करून बाकीच्या जकातीची माफी मिळाली [ २७३ ]. सुरतेवरील दुसऱ्या स्वारीच्या वेळीं जेराल्ड आंजिअर प्रेसिडेंट होता व त्यानेंहि शिवाजीला विरोध करून वाहवा मिळविली [ २७४ ]. " शिवाजीनें घातलेल्या धुमाकुळाचे अवशेष शहरभर जिकडे तिकडे दिसतात. अजून ( म्हणजे इ. १६७५ त ) डागडुजीचें काम सुरूं झालें नाहीं." [ २८९ ]

३ कारवारकडील इ. १६७५ तील एक झटापट— " सकाळीं दळवीचे सुमारें पांचशें लोक आले. तेव्हां शिवाजीचे लोक १०० पायदळ व २५ घोडेस्वार किल्ल्यावर गेले. दोन्ही बाजूचे शिपाई म्हणजे शिपाईच होते–प्राचीन ब्रिटनांसारखे उघडे नागडे–व उग्र वाद्यांचा गोंगाट चालूं होता. आरडाओरड करणाऱ्या बाजारबुणग्यांचा थवा जमला होता. अव्यवस्थित रीतीनें कूच करीत ते इंग्रजांच्या वखारीपर्यंत आले. त्यांचा पुढारी भव्य पण लुच्चा दिसत होता. त्याचें तत्त्व म्हणजे जिकडे पगार जास्त तो सत्पक्ष " [ ३६९ ]. " कारवारांतील सर्व लोक-बायकामुलें देखील-दुपारीं इंग्रजांच्या वखारींत गेले. शिवाजीचे लोक गांवांत यावयास निघाले होते, व त्यांना येथील रहिवासी जास्त भितात. पण देसायाचा गुराब किंवा होडी दिसूं लागल्या बरोबर ते पळून गेले. हा देसाई पूर्वी विजापुराच्या सुलतानाच्या हाताखालीं सर्व मुलखांवरील अधिकारी होता. हजार शिपाई त्याच्या हाताखालीं असून दळवी त्यांवर मुख्य होता. दळवीला त्यानेंच चढविलें होतें. पण विश्वासघात करून दळवीनें त्याला शिवाजीचें स्वामित्व कबूल करावयास लाविलें. पुढें शिवाजीकडून पाहिजे होतें तितकें मिळालें नाहीं. तेव्हां पूर्वीच्या धन्याला ' पुन्हां स्वामित्व मिळवून देतो ' असें आश्वासन दळव्यानें दिलें आहे. रात्रीं बातमी आली कीं दळवी नदी ओलांडून गेल्याबरोबर ६० शिपायांच्या पाहऱ्यांत असलेलें त्याचें सामान शिवाजीच्या लोकांनीं पळविलें. त्यांचा दळव्यानें पाठलाग केला व सामान परत घेतलें. शिवाजीच्या पक्षाकडील दोन घोडे सांपडले. व एक घोडेस्वार ठार झाला " [ ३७० ].

४ विजापुरांतील अंदाधुंदी, हुबळी, रायबाग वगैरे, व्यापारी शहरांवरील स्वाऱ्या व रामनगरचें राज्य खालसा करणें.–" शिवाजीनें सर्वत्र गोंधळ उडवून दिला आहे. विजापूरच्या सरदारांना पंचाईत अशी पडली आहे कीं, पक्ष तरी कोणाचा घ्यावा ? शिवाजीच्या बेतांचा त्यांना थांग लागत नाहीं. तो दक्षिणी सरदारांना म्हणतो, ' मीच तुमचा वाली आहें. माझ्याशिवाय देशाचें रक्षण करण्याचें धैर्य कोणालाहि नाहीं. ' एखादे वेळीं तुम्हांला लुटावें लागलें, तरी तें माझ्या

शिपायांना पगार देण्याकरितां. आम्ही हे इतके श्रम करून तुम्हाला यापेक्षां खडतर अशा गुलामगिरींतून सोडवितों ' [ in endeavouring to free them from a more unnatural slavery ]. सरदारांना शिवाजीचें कपट व बहलोलखानाची अरेरावी दोन्ही सहन होत नाहींत. मोंगलांना मदतीला बोलावण्याचाहि त्यांचा निश्चय होत नाहीं. शिवाजी मात्र त्यांच्या अनिश्चयाचा फायदा घेऊन विजापूरच्या मुलखांत वाटेल तसा धुमाकूळ घालतो. एक फौज मुलाबरोबर देऊन गोवळकोंड्याच्या राज्यांत बदनगरपर्यंत [ भागानगर ] स्वारी करवितो. दुसरी फौज घेऊन सुरतेपर्यंत स्वत: जाऊन येतो. मुख्य सैन्य पणजीपुढें ठेवितो. संभाजी बदनगर ( भागानगर ) लुटून व जाळून परत येत असतां बहलोलखानानें त्याच्यावर टेहळणी ठेविली. त्यामुळें त्याला विजापुराकडे फिरकून कांहीं करितां आलें नाहीं. पण विजापुरांत सरदारांचीं कारस्थानें चालू असल्यामुळें बहलोलखानाला सैन्य घेऊन फार दिवस बाहेर राहतां आलें नाहीं. तेव्हां संभाजीनें हुबळी, रायबाग व इतर व्यापारी शहरें लुटलीं. शिवाजीनेंहि सुरतेहून लूट आणिली व व येतां येतां ' माझ्या खजिन्याचा दरवाजा दुसऱ्याच्या ताब्यांत ठेऊन कसें चालेल ? ' म्हणून रामनगरचें राज्य खालसा केलें. या राज्यांतील टेंकड्यावरून त्याला सुरतेपासून तीस मैलांच्या आंत जातां आलें. सर्व वाटा वगैरे नीट पाहून ठेऊन त्यानें परत येतांना राज्य खालसा केलें. " [ १९५-९६ ]

या माहितीची ग्राह्याग्राह्यता आतां आपल्याला ठरविली पाहिजे. समकालीन लेख म्हणून फ्रायरच्या पुस्तकाला महत्त्व आहे, यांत संशय नाहीं. परंतु म्हणूनच त्यांतील हकीकत खरी असली पाहिजे, असें निष्पन्न होत नाहीं. मराठीपेक्षां इंग्रजी व इंग्रजीपेक्षां फारसी लेख शिवाजीच्या चरित्राच्या बाबतींत जास्त ग्राह्य, अशी जी योग्यतेची चढती भांजणी प्रो. सरकारांनीं मांडिली आहे, तिच्या अनेक कारणांपैकीं इंग्रजी व फारसी लेखकांनीं तारखा दिलेल्या असतात हें एक होय! * फ्रायरच्या लेखांत तरी निदान तारखांचा मागमूस सांपडत नाहीं. तेव्हां या शिवचरित्र-साधनाचें हें पहिलें मोठेंच व्यंग होय.

---

* प्रो. सरकार यांना वाटेल तीं अप्रयोजक मतें प्रतिपादण्याचा हक्क आहे. व तो हिरावून घेण्याचा विचारहि आमच्या मनांत येत नाहीं. पण आम्हाला असें म्हणणें भाग आहे कीं, मराठी ग्रंथांच्या महत्त्वावर जे भर देतात, त्यांची टर उडविण्याचा अश्लाघ्य प्रयत्न त्यांनीं केला नसता, तर तें बरें झालें असतें. " मराठी लेख फारसी व इंग्रजी लेखांपेक्षां जास्त ग्राह्य मानणें देशाभिमानाचें द्योतक होईल; पण प्रामाणिक इतिहासकाराचें कर्तव्य होणार नाहीं. " असा शेरा त्यांनीं मारिला आहे. असला मनाचा कुत्सितपणा दाखवून फायदा काय ?

यानंतर लेखांतील माहितीची पारख करण्याकरितां, लेखकाची बौद्धिक योग्यता काय, माहिती मिळविण्याचीं कोणतीं साधनें त्याला उपलब्ध होतीं, लेखकांत खरेपणाची आवड किती, लेखक पूर्वग्रहदूषित होता काय, या मुद्द्यांचा निकाल लावणें जरूर आहे. फ्रायर हा विद्वान् व जिज्ञासु होता; हें मागें सांगितलें आहे. पण त्याची माहिती मिळविण्याचीं साधनें फारशीं चांगलीं होतीं असें म्हणतां येणार नाहीं. तो जुन्नर, गोवें, कारवार वगैरे ठिकाणीं स्वतः हिंडला; पण अशीं ठिकाणें फार थोडीं. शिवाय त्याला वेळहि फारसा नव्हता. त्यामुळें प्रत्यक्ष कांहीं पाहण्याचे प्रसंग फार थोडे; व त्यांची योग्य संगति लावण्यास फुरसत बेताची. चारदोन आठवडेच हिंदुस्थानचा प्रवास करून धंदेवाल्या प्रवाशाच्या चुका फ्रायरच्या हातून होणें अपरिहार्य आहे. त्याचा मुख्य भर असणार ऐकीव माहितीवर. ही माहिती त्याला पुरविणारे कोण ? एक ज्यांच्याशीं त्याचा संबंध आला ते हिंदी लोक व दुसरे त्याचे इंग्रज देशबांधव. हल्लींच्या काळांत देशी भाषा शिकण्याचीं साधनें इतकीं मुबलक असतांहि पुष्कळ साहेबांचें त्या भाषांचें ज्ञान किती अगाध असतें हें आपण पाहातोंच. लोकांची भाषा समजत नाहीं, अशा स्थितींत दुभाष्यांवरच अवलंबून राहणें फ्रायरला भाग पडलें असलें पाहिजे. हे पोटार्थी, साहेबांना आवडण्यासारखी असेल तीच माहिती पुरविणार व मिळतील त्या कवड्यारेवड्यांवर संतुष्ट होणार. हिंदुस्थानांतल्या इंग्रजांविषयीं बोलावयासच नको. शिक्षणाचा अभाव, सहानुभूतीचा अभाव, सत्यनिष्ठेचा अभाव, अनेक कारणांमुळें हिंदुस्थानाविषयीं सत्य ज्ञान मिळविण्याच्या बाबतींत या गृहस्थांच्या ठिकाणीं नालायकी उत्पन्न होते. सत्याविषयीं यांची किती निष्ठा होती, हें इंग्रजांचे स्तुतिपाठक प्रो. सरकार यांनींच दाखविलें आहे. स्वार्थ साधतो म्हटलें कीं लागले शिवाजीची स्तुति करावयाला; स्वार्थ बिघडतो म्हटलें कीं, निंदेला उशीर नाहीं. म्हणून फ्रायरचीं माहितीचीं साधनें निरुपयोगी ठरतात. पुढचा प्रश्न, लेखकांत खरेपणा किती ? स्वार्थ जेथें साधत असेल तेथें वाटेल तितकें खोटें बोलण्याला, लिहिण्याला व करण्याला हजारांतून एकादा अपवाद वगळल्यास कोणताहि इंग्रज कचरत नाहीं. दुर्दैवानें फ्रायर हा या अपवादांत येत नाहीं. त्याला इतर माहितीच्या बाबतींत खोटें लिहिण्याची जरूर भासली नाहीं. तरी राजकारणाचा संबंध आल्याबरोबर त्यानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. तो हिंदु-

स्थानांत कंपनीचें काम करण्याकरितां आला होता. कंपनीला मुसलमानांकडून सवलती मिळत होत्या, व शिवाजीकडून उपद्रव होत होता. तेव्हां शिवाजीविषयीं आपलें मत वाईट करून घेणें व मुसलमानाविषयीं पक्षपात दाखविणें हें त्यानें आपलें कर्तव्य ठरविलें, यांत नवल नाहीं. शिवाजीचा पहिला उल्लेख त्यानें 'बडा बंडखोर' म्हणून केला आहे [२२५]. पुढील उल्लेख याला साजेसेच आहेत. 'शरिरांत ज्याप्रमाणें एकादा अवयव कुजून अवजड व्हावा, तसा शिवाजी दक्षिणेंत झाला आहे' [४०७]. 'दरोडेखोर यापलीकडे त्याला किंमत नाहीं' [४०८]. 'शिवाजीची जमीनमहसूल पद्धति इतकी जुलमाची होती कीं जिवंत राहण्याला जरूर तेवढेंच तो शेतकऱ्याजवळ राहूं देई' [३३४]. 'शिवाजीच्या जुलमी अमलाखालीं* बिचाऱ्यांना राहावें लागे, ही सर्व देशांतील लोकांवर मोठी आपत्ति कोसळली होती' [३६८]. 'शिवाजीच्या जुलमी अमलाखालीं सर्व रानटी चाली जारीनें चालू होत्या' [३७७]. असला खोटा मजकूर जेव्हां फ्रायर जाणुनबुजून लिहित नसतो, तेव्हां पूर्वग्रहदूषित म्हणून अजाणतेपणानें लिहीत असतो.

यावरून फ्रायरनें शिवाजीच्या संबंधानें दिलेल्या माहितीचा उपयोग करितांना सावधगिरी बाळगावयास पाहिजे, हें उघड होतें. कोर्टांतील खऱ्याखोट्याचें मिश्रण करणाऱ्या साक्षीदाराच्या जबानीची किंमत न्यायाधीश ज्या तत्त्वाप्रमाणें कसोशीनें करितो, त्याच तत्त्वाचा अवलंब आपण केला पाहिजे. त्यानें इंग्रजाविरुद्ध किंवा पाश्चात्यांविरुद्ध जो मजकूर लिहिला असेल, तो बिनतक्रार खरा मानावयाचा; इतर मजकुरांपैकीं जेवढ्याला दुसरीकडून स्वतंत्रपणें आधार मिळेल, तेवढा खरा मानावयाचा; ज्या मजकुरासाठीं फक्त फ्रायरवरच अवलंबून राहण्याची पाळी असेल, त्याची मूलतः शक्याशक्यता पाहून काय तो निर्णय करावयाचा.

या दृष्टीनें आतां शिवाजीच्या चरित्रांतील ज्या गोष्टी फ्रायरनें दिल्या आहेत, त्यांची आपण छाननी करूं:—(१) शिवाजीच्या वंशावळींत त्याचा आजा वंगूजीराजा होता, म्हणून फ्रायरनें एक ढोबळ चूक केली आहे. त्या चुकीला निष्काळजीपणाशिवाय दुसरें कारण संभवत नाहीं.

---

* शिवाजीच्या अमलाखालील कुणब्यांचे हाल पाहून इंग्रजांच्या अमलाखालील कोळी 'अहाहा, आम्ही किती सुखी आहोंत' म्हणून धन्यता मानीत असत ! ही गोष्ट फ्रायरला अर्थातच नमूद करून ठेवण्यास योग्य वाटली [३६२].

( २ ) अब्दुलखानाच्या वधाची फ्रायरनें दिलेली हकीकत त्याच्या पक्षपाताचें उत्तम प्रमाण होय. खानाच्या पक्षपात्यांनीं सांगितलेली हकीकत त्यानें अधाशीपणानें आत्मसात केली आहे. काफराशीं कोणत्याहि प्रकारचें नीतिबंधन पाळावयाची जरूर नाहीं, अशी ज्याची समजूत आहे व त्या समजुतीप्रमाणें वागण्यास जे तयार असतात, त्या मुसलमानांचा असा कैवार घेण्याचें फ्रायरला एरवीं कांहींच कारण दिसत नाहीं. अब्दुलखान म्हणजे केवढा साधा, प्रामाणिक मनुष्य; व शिवाजी म्हणजे लफंगेगिरीची मूर्ति. शिवाजीला ठार करण्याच्या बुद्धीनें खान आला नव्हता, असें म्हणणें म्हणजे लबाडीची परमावधि होय.* ( ३ ) फ्रायरच्या पन्हाळा घेण्यासंबंधाच्या माहितींत असंभवनीय असें कांहीं नाहीं. शिवाजीनें किल्ले घेतांना अनेक वेळां अशाच युक्त्यांचा अवलंब केला होता. ( ४ ) फ्रायर 'शिद्दी जोहाराचें डोकें उडालें असें म्हणतो, पण दुसरे आधार याला विरुद्ध आहेत. (५) शिवाजी आग्र्याला अवरंगजेबाला भेटावयास गेला होता, त्या प्रसंगाच्या वर्णनांतहि फ्रायरचा खोटेपणा उघड होतो. जो बापास बाप म्हणत नाहीं, व ज्यानें आपल्या सर्व भावांची अमानुषपणें कत्तल केली, तो अवरंगजेब शिवाजीशीं ममतेनें वागणार! अवरंगजेबाचीं दुष्कृत्यें फ्रायरला माहीत नसतील म्हणून त्यानें असें लिहिलें असेल, असा जर त्याच्या बचावासाठीं मुद्दा काढावा, तर तो स्वतःच त्यांचा उल्लेख करून बसलेला आहे. (६) शिवनेरी किल्ला घेण्याच्या शिवाजीच्या प्रयत्नांची हकीकत फ्रायरनें दिली आहे. व तेवढाच आधार देऊन प्रो. सरकार यांनीं ती आपल्या पुस्तकांत समाविष्ट केली आहे. मुसलमानांच्या दगलबाजीचा पंचवीस वर्षांहून जास्त अनुभव घेतल्यानंतर धूर्ततेबद्दल प्रसिद्ध असलेला शिवाजी इतका बावळटपणा करील, हें कितीसें संभवनीय आहे याचा विचार त्यांनीं केलेला दिसत नाहीं. सत्य हें कल्पितापेक्षां पुष्कळ वेळां जास्त विलक्षण असतें हें खरें आहे. प्रत्येक गोष्टींत शिवाजी अत्यंत सावधगिरी बाळगीत असतां तो बाख्या किल्लेदार त्याला अशा रीतीनें हातोहात फसवू शकला असेलहि कदाचित्! पण फ्रायरच्या आधाराहून जास्त विश्वसनीय आधार

* येथें खोटेपणांत फ्रायरनें आपल्या त्या वेळच्या इंग्रज बांधवांवर ताण केली आहे, व एकोणिसाव्या शतकांतील ग्रांट डफाची बरोबरी केली आहे. पण एकदां राजापूरच्या वखारींतील एका इंग्रजी पत्राच्या पुराव्यावर प्रो. सरकारांच्या कोर्टांत सुद्धां शिवाजी खुनाच्या आरोपांतून निर्दोषी म्हणून सुटला आहे!

या असंभवनीय गोष्टीवर विश्वास ठेवण्यापूर्वीं उपलब्ध झाले पाहिजेत. (७) कारवारकडील ज्या झटापटीचें वर्णन फ्रायरनें केलें आहे, ती झटापट तो कारवारांत असतांच झालेली आहे, व यांत कांहीं विशेष राजकारण नसल्यानें ती खरी असावयास हरकत नाहीं. ( ८ ) शेवटच्या स्वाऱ्यांची व रामनगर खालसा केल्याची हकीकत इतर आधारावरून बरोबर आहे असें दिसून येतें, परंतु त्यांत संभाजीचें नांव फ्रायरनें चुकीनें घुसडलें आहे.

इ. १६७५ पर्यंत शिवाजीच्या राज्याचा विस्तार केवढा झाला होता, हें फ्रायरच्या पुस्तकांत आपल्याला नमूद केलेलें आढळतें. "बाल्फोरी टेकडीपासून गंगावली Gongole नदीपर्यंत सुमारें ७५० मैल लांबीची कोंकणपट्टी त्याच्या ताब्यांत आहे. घाटाच्या खालच्या बाजूला फारसा मुलूख त्याच्या ताब्यांत नाहीं. डोंगर पूर्णपणें त्याच्या ताब्यांत आहेत, व विजापूरकर ते परत घेण्याची खटपट करीत नाहींत. सर्व बंदरें* हातचीं गेल्यामुळें त्यांचें अतिशय नुकसान होईल. अरबी घोड्यांवर त्यांचें घोडदळ अवलंबून आहे, व ते यापुढें यावयाचे म्हणजे तुतिकोरिनच्याहि खालीं असलेल्या पोर्टोनोव्होमधून " [४०७-८].

शिवाजीच्या राज्यव्यवस्थेचें फ्रायरनें केलेलें वर्णन अगदींच तुटपुंजें आहे, तरी त्यांतहि आपली त्यानें निंदा करावयाची हौस पुरवून घेतली आहे. " शिवाजी राज्यव्यवस्थेच्या बाबतींत मुसलमानांचें अनुकरण करितो. तो गांवाला व किल्ल्याला एकएक अधिकारी× नेमितो, व या सर्वांवर फिरतें सैन्य हाताखालीं असलेला सेनापति देखरेखीसाठीं असतो. सर्व मोठमोठ्या अधिकाराच्या व जबाबदारीच्या जागांवर फक्त ब्राह्मणांना किंवा पंडितांना ( एक हलकी जात ) तो नेमितो. [or their substitutes viz. Pundits (a mean

* विजापूरच्या सुलतानाचीं बंदरें याप्रमाणें:—कल्याण ( Gullean ), भिवंडी ( Bimly ) हीं पोर्तुगीजांनीं अडविलीं आहेत; राजापूर, दाभोळ, वेंगुर्लें, कारवार हीं शिवाजीनें घेतलीं आहेत; बाकीचीं मलबारच्या राजाच्या ताब्यांत आहेत, पोर्टोनोव्हो हें तेवढें विजापुरकराकडे राहिलें आहे " [४१६]. पणजी बंदर शिवाजीनें घेतल्याबद्दलचा उल्लेख ३८२ पानांवर आहे. तें विजापूरच्या सुलतानाचें मुख्य बळ होतें, व म्हणून तें हस्तगत झाल्याबरोबर कारवारच्या पलीकडील सपाट प्रदेश सहजच शिवाजीच्या हातीं आला, असें फ्रायरचें भाष्य आहे.

× गांवांच्या अधिकाऱ्याला सुभेदार व किल्ल्यावरील अधिकाऱ्याला हवालदार म्हणत.

cast) फौजदार, सुभेदार, हवालदार, मुलकी अंमलदार (Civil Governors), सेनापति वगैरे अधिकारीहि असतात. त्यांना सार्वजनिक हित किंवा प्रामाणिकपणा यांची ओळख नसते; त्यांना ठाऊक म्हणजे फक्त स्वार्थ. व्यापाऱ्यांना आपल्या मुलखांत व्यापार करावयास ते बोलावितात, व मग त्यांच्याकडून पैसे उकळतात, नाहीं तर जकात लादतात. आपल्या धन्यापेक्षां स्वत:साठींच ते जास्त पैसे मिळवितात; ढोंग मात्र राजाचें कर वसूल करण्याविषयीं तत्परतेचें. जेथें शिवाजीचें राज्य असेल तेथें व्यापार वाढावयाचा नाहीं" [२६७-८]. येथें फ्रायरनें कीती घोटाळा केला आहे. अधिकाऱ्यांची नावें व त्यांचीं कामें याचा त्याला नीट उलगडा झालेला दिसत नाहीं. पांडित ही जात कोणची व फ्रायरनें तिला हलकी जात कां म्हणावें? पैसे उकळणाऱ्या शिवाजीच्या अधिकाऱ्यांची खरड काढण्यांत फ्रायर रंगून गेला आहे. पण अशा निंदकांना ख्रिस्ताच्या वचनाची आठवण करून देणें अवश्य आहे. "आणि तुला आपल्या भावाच्या डोळ्यांतील कुसळ दिसतें, पण स्वतःच्या डोळ्यांतील मुसळ कसें दिसत नाहीं? भावाला कोणत्या तोंडानें म्हणशील 'माझ्या डोळ्यांत मुसळ आहे खरें, पण तुझ्या डोळ्यांतील कुसळ मला काढूं दे. अरे भोंदू मनुष्या, आधीं आपल्या डोळ्यांतून मुसळ काढून टाक म्हणजे भावाच्या डोळ्यांतील कुसळ काढून टाकण्याइतकें स्पष्ट तुझ्या डोळ्यांना दिसूं लागेल." आपल्या देशांत बेकनसारखे तत्त्वज्ञानी म्हणून मिरविणारे देखील न्यायदानाच्या कामांतहि लांच खात होते, ही गोष्ट फ्रायरनें दुसऱ्या देशांतील अधिकाऱ्यांची टवाळी करितांना दृष्टीआड करावयास नको होती.

शिवाजीच्या लष्कराचें वर्णन जास्त यथार्थ आहे. "शिवाजीचे शिपाई कणखर व शूर असून डोंगरांतील लढाईला अगदीं योग्य असत. त्याच्याजवळ ३०,००० घोडेस्वार [४१४] होते. शिवाजीचे लोक लढाइच्या कामाला मोंगलापेक्षां जास्त लायक होते. त्यांना जाडेंभरडें अन्न चाले, ते झपाट्यानें दौड करीत, ऐषआराम कसा तो त्यांस माहीत नव्हता. समोरासमोर युद्धाला तोंड लागलें म्हणजे मात्र मोंगल जास्त चांगला टिकाव धरीत. लोक मैदानावर लढाईला उभे रहात नसत. पण छापे घालण्यांत व लुटालूट करण्यांत ते पटाईत असत [ ४१५–६ ]. त्याच्या सैन्यांत बायकांची कटकट नसे. "हा रानटी सेनापति सिथिआचा वीर एटिअस याच्यासारखा आहे. अल्गुजाबर

एकजण काढीत असलेले गोड सूर ऐकून तो म्हणाला, ' यापेक्षां घोड्यांचें खिंकाळणें किंवा रणवाद्यांचा गोंगाट मला जास्त गोड वाटतो. " * [ ४१४ ]

शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या प्रसंगीं इंग्रजांचा वकील आला होता. त्यानें सादर केलेला अहवाल फ्रायरला मुंबईस पहावयास मिळाला होता, असें दिसतें. हेन्री आक्सिंडेन ( या इंग्रज वकिलाचें नांव फ्रायरनें कां दिलें नाहीं कोणास ठाऊक ! ) हा अहवाल फ्रायरनें जसाच्या तसा उतरला आहे. सिद्दी-बरोबर तह करावा, असा या वकिलानें चोंबडेपणानें केलेला उपदेश; उत्तर हिंदुस्थानांत व इराणांत मिळालेले हक्क व सवलती शिवाजीनें द्याव्या अशी मागणी; कंपनीचीं नाणीं राज्यांत चालावीं या अटीला शिवाजीनें दिलेला नकार, वादळानें किंवा इतर कारणांनीं किनाऱ्याला लागलेलीं जहाजें परत देण्याच्या अटींवर शिवाजीनें घासाघीस करून शेवटीं दिलेली मंजुरी व इतर अटींना बिनहरकत दिलेली मंजुरी; हिऱ्याच्या अंगठीचा नजराणा—इत्यादि कोणत्याहि बाबींत फ्रायर व आक्सिंडेन यांच्या म्हणण्यांत फरक नाहीं.

फ्रायरचा लेख व त्यासंबंधाचें आमचें विवेचन संपलें. आमच्या राष्ट्रांत जन्म पावलेल्या या थोरांतील थोर पुरुषाला ' दरोडेखोर ' ' लुटारू ' ' खुनी ' अशासारखीं विशेषणें दुसऱ्या कोणीं लाविलीं म्हणून त्याची आपल्याला लाज किंवा कमीपणा वाटण्याचे दिवस सुदैवानें निघून गेले आहेत. त्यांतूनहि इंग्लंडच्या युवराजांनीं त्याच्या स्मारकाची कोनशिला बसवून व ती बसवितांना त्याला गौरवून इंग्रज निंदकांचीं तोंडें बंद करून टाकिलीं आहेत. आतां शिवाजीला शिव्या देणें म्हणजे युवराजाचा उपमर्द करणेंच होईल. परंतु आमची दृष्टि याहूनहि जास्त निवळली पाहिजे. शिवाजीचा समकालीन असा जो इंग्लंडांतील प्रसिद्ध पुरुष, क्रॉमवेल तो मोठा धार्मिक वृत्तीचा म्हणून त्याचे गोडवे गाइले जातात. पण तो उपटसुंभ किती ढोंगी व निर्दय होता ! हेंच तर काय, पण शिवाजीनंतर शंभर वर्षांनीं उदयास आलेला विल्यम पिट—इंग्रजांनीं दुसरा एक सद्गुणांचा पुतळा ठरविलेला—याची काय स्थिति

* कै. राजवाड्यांनीं सयाजीरावांना केलेला उपदेश पुष्कळांना आठवले. 'तुंईतुंई पुंईपुंई करणाऱ्या वाद्यांची हकालपट्टी करून नगारे, भेण्या, रणशिंगें, कर्णे, इत्यादिकांचे कर्कश आवाज प्रजेच्या कानावर आदळत ठेवावें.'

+आहे ? "पिटची मुत्सद्देगिरी म्हणजे गुन्हेगारी होती।" त्यानें इंग्लंडची अब्रू पार घालवून टाकिली. एकहि नीच कृत्य करावयाचें त्यानें ठेविलें नाहीं. त्याच्या धोरणानें वागून इंग्लडनें खोटें बोलण्याचा गुन्हा केला. त्यानें खोट्या नोटा तयार करण्याचा गुन्हा केला, त्यानें मारेकरी धातले. अलौकिक व्यक्तींचें दोष केवळ उल्लेख करून सोडून द्यावयाचे असतात; उगाळीत बसण्यांत धन्यता मानणें हें क्षुद्र बुद्धीचें लक्षण होय.

अल्प दोष हे गुणसमुदायीं लोपुनियां जाती ।
तेजोनिधिचे डाग कुणाच्या दृष्टीतें पडती ?॥

---

# शिवकालीन ' सिंहस्थ '

शिवकालीन कागदांत सिंहस्थाच्या वर्षांचे उल्लेख ठिकठिकाणीं येतात. उ० ' शिव-कालीन-पत्र-सार-संग्रह ' ले. १६५, ५४१, ७९९. त्यांचा कालनिर्णय करितां येण्यासाठीं सिंहस्थ लागण्याचा अंदाजी महिना खालील यादींत दिला आहे. सिंहस्थाचा काल, सिंहराशीला गुरु आल्यापासून तो पुढच्या राशीस जाईपर्यंत, अंदाजें एक वर्षाचा असतो.

| शक | सन | शक | सन |
|---|---|---|---|
| १५४५ भाद्र. | १६२३ सप्टें. | १५९३ आषाढ | १६७१ जुलै |
| १५५७ अ. भाद्र. | १६३५ ऑगस्ट | १६०५ आषाढ | १६८३ जून |
| १५६९ श्रावण | १६४७ ऑगस्ट | १६१७ ज्येष्ठ | १६९५ म |
| १५८१ श्रावण | १६५९ जुलै | | |

---

+ व्हिक्टर ह्यूगो-' त्र्याण्णव ' २१८ ( वार्ड, लॉक आणि कंपनीची आवृत्ति. )

# शिवकालीन विदर्भ

( लेखक:—यशवंत खुशाल देशपांडे, यवतमाळ. )

**विदर्भ आणि देवगिरी**—श्री छत्रपति शिवाजी महाराज हे विदर्भाच्या समृद्ध खाणींतील एक देदीप्यमान रत्न होत. महाराष्ट्राच्या ऐन स्वराज्यकाळीं म्हणजे यादवरावाच्या राजावटींत, देवगिरी हें मराठेशाहीचें केन्द्र होतें आणि ही देवगिरी, महाराष्ट्राचें मूळ जो विदर्भ देश, त्या विदर्भदेशांतच अंतर्भूत होते. या देवगिरीसच, यादवराजवटीबरोबर मराठेशाहीचा अंत झाला आणि सुदैवेंकरून या देवगिरीच्या पंचक्रोशींत असलेल्या वेरूळच्या पाटील घराण्यांत, देवगिरीच्या यादववंशाच्या उपशाखेंतील घराण्याशीं लग्न-संबंध होऊन, अखिल महाराष्ट्रास स्वराज्य प्राप्त करून देणारी वीर्यशाली विभूति निर्माण झाली, हा केवढा अपूर्व योग !

**२ यादवकालीन विदर्भाचे विभाग**—रामदेवराव यादवांच्या कारकीर्दींत विदर्भाचे मुख्य चार भाग समजले जात; त्यापैकीं एक वराड ( वऱ्हाड ), दुसरा गंगातीर ( देवगिरी वगैरे भाग ), तिसरा भाग म्हणजे झाडीमंडळ ( हल्लींचा मराठी नागपूर प्रांत ) आणि चवथा विभाग * स्यूण देश (हल्लींचा खानदेश) हे होत. हा स्यूण देश नाशिकापासून उत्तरेस देवगिरीपर्यंत होता. या चाऱ्ही विभागांपैकीं वऱ्हाड प्रांत रामदेवराव यांच्या कारकीर्दींतच दिल्लीच्या मुसलमान सुलतानांच्या ताब्यांत गेला आणि गंगातीर व स्यूण देशांतील भाग, किंबहुना देवगिरीच्या यादवांच्या अमलांत असलेला सर्व महाराष्ट्र, यादवांच्या विनाशाबरोबरच, मुसलमान सुलतानांच्या ताब्यांत गेला. तेव्हांपासून वऱ्हाड ( इ. स. १८५३ पासून हा प्रांत केवळ राज्यव्यवस्थेकरितां इंग्रजांच्या ताब्यांत आला आहे) व गंगातीर हे दोन्ही भाग आज सहाशें वर्षें एकसारखे मुसलमानांच्या अमलाखालीं असले तथापि, ऐन मुसलमानी अमदानींत व त्यानंतरहि महाराष्ट्रांत मराठी राज्यसंस्थापनेची पूर्वतयारी म्हणून व नंतर मराठी राज्याच्या संवर्धनाकरितां म्हणून जे जे प्रयत्न झाले त्या सर्वांमध्यें विशेषतः महत्त्वाच्या शिवकालामध्यें विदर्भानें यथाशक्ति आपला भाग उचलला आहे असें म्हणावें लागतें. या प्रयत्नांत विदर्भाचा जो कांहीं संबंध आला त्याविषयींच पुढील पानांवर विवरण करण्याचें ठरविलें आहे.

**३ शिवकालीन मुसलमानांची राज्यव्यवस्था**—राज्यसत्ता मुसलमानांच्या हातीं गेल्यानंतर प्रथमचीं बरींच वर्षें ते दक्षिणकडील मुलखाचा उपयोग द्रव्यसंपादन करून उत्तरेस दिल्लीकडे नेण्यांत करीत असत; त्यामुळें दक्षिणमध्यें लूटमार व जवळजवळ अराजकच असे. याशिवाय प्रथमचे सुलतान जे खिलजी आणि

* भांडारकरकृत दि अर्ली हिस्टरी ऑफ डेक्कन पृ. ९ आवृत्ती १८९५

तघलख, त्यांच्या कारकीर्दींत मुसलमान राजसत्ताधिकाऱ्यांकडून हिंदुधर्मावर आघात होऊन मंदिरांचा नाश, मूर्तींचा भंग, हिंदूंचें मुसलमानीकरण अथवा हिंदूंची कत्तल इत्यादि अनन्वित प्रकारहि सुरू होते. दिल्ली ही दक्षिणेकडून फार दूर असल्यामुळें, इकडे पाठविलेल्या सुभेदारावर दिल्लीच्या सुलतानांचा असावा तितका वचक न राहिल्यामुळें दक्षिणेकडे अराजक माजलें आणि त्यांतच इकडे आलेल्या मुसलमानांतूनच हसन गंगु नांवाच्या इसमास गुलबुर्गा येथें स्वतंत्र राज्य दक्षिणेंत स्थापण्यास सवड मिळाली.

मुसलमानाचें दक्षिणेंत राज्य स्थापन झाल्यापासून, दिल्लीच्या मोंगल राज्यकर्त्यांचा विदर्भावर व विशेषतः वऱ्हाडावर अम्मल बसेपर्यंत सरसरी अडीचशें वर्षांचा काळ गेला. त्या काळाचें सिंहावलोकन करावयाचें आज आपणास प्रयोजन नाहीं. तथापि एक महत्त्वाची गोष्ट नमूद केली पाहिजे, ती ही कीं, मुसलमानांचे इतकें आघात महाराष्ट्रांतील हिंदुधर्मावर झाले आणि राजसत्ता नाहींशी होऊन महाराष्ट्रांतील हिंदूंनीं मुसलमानांची प्रजा ह्मणून, इतकीं वर्षें काढलीं, तथापि त्यांनीं आपलें वैशिष्ट्य कायम ठेविलें व अनुकूल काल येतांच आणि योग्य नेता निर्माण होतांच त्याच्या छत्राखालीं हिंदवी राज्य स्थापण्याचे कामीं सहकार्य करावयास ते तयार झाले.

**४ शिंदखेडचे जाधव**—यादवांचें राज्य नष्ट झाल्यावर रामदेवरायाचा मुलगा बिंबदेव यानें ठाणें येथें राज्य स्थापिल्याचा इतिहासांत उल्लेख आहे.[1] पण तसा माहूर येथें असलेला बल्लाळदेव याच्या संबंधीं अथवा शंकरदेव यास मूलबाळ होतें कीं काय आणि असल्यास त्याचें काय जालें यासंबंधानें कोठें दाखला मिळत नाहीं. तथापि बहामनी राज्याचे वेळीं गोविंददेव जाधव, ठाकूरजी जाधव इत्यादि नांवांचा उल्लेख येतो. जाधवांचें घराणें लुकजी जाधव यांच्यामुळें निजामशाहीच्या अमदानींत पुढें आलें. लुकजी जाधव यांचे वडील देवगिरीच्या आसपास लासनेर पैठण येथें उदयास आले; व लुकजींनीं वऱ्हाडांत असलेल्या शिंदखेड येथें देशमुखी मिळविली. जाधव हें उपनांव यादव या शब्दावरून निघालें आहे. या घराण्याचें भवितव्य देवगिरी अथवा मुसलमान काळीं ज्यास दौलताबाद नांव प्राप्त झालें, त्या स्थळाशीं निगडित झालेलें दिसून येतें. यादव राजांच्या राजवटींत मराठी राज्य नष्ट झालें, पण जाधव वंशांत जन्मास आलेल्या कन्येच्या पोटीं तीनशें वर्षांनीं पुन्हां मराठ्यांचें राज्य स्थापन करणारा थोर पुरुष निर्माण झाला. या योगायोगावरून जाधव घराणें हें पूर्वकालीन यादव घराण्याचीच शाखा असावी असें मानण्याकडे मनाचा कल होतो. पण हें ऐतिहासिक सत्य आहे ह्मणावयास आधार नाहीं. जाधवांची[2]

१ राजवाडे महिकावतीची बखर ( बिंबराजाची हकीकत ). २ या. मा. काळे जाधवांची बखर ( हस्तलिखित ).

बखरकारहि जाधवांचें मूळ यमुनाकाठ या करवली गांवच्या यदुवंशीं राजाशीं जोडतो. ह्या त्याच्या म्हणण्यासहि ऐतिहासिक पुरावा नाहीं.

**५ राज्यव्यवस्थेंत हिंदूंची आवश्यकता**-मुसलमानी संस्कृति हिंदु संस्कृतीपासून भिन्न आहे. दक्षिणेंत मुसलमान स्थायिक झाले, ते मराठी राज्य नष्ट करून स्थायिक झाले. पण एकदां स्थायिक झाल्यावर त्यांना, स्वार्थाकरितां कां होईना, हिंदु प्रजेला सुरक्षित ठेवणें भाग पडलें. राज्यव्यवस्थेकरितां[१] ग्रामसंस्था ग्रामाधिकारी, परगणे परगणाधिपति, देशमुख, देशपांडे यानांच हाताशीं धरून त्यांना आपला कारभार करावा लागला. लष्करांत मराठी व हिंदी शिपायांची भरती करावी लागली. कर्तबगार मराठी पुरुषास सरदाऱ्या देऊन लष्कर जमविण्याकरितां मनसबदाऱ्या व त्यांजबरोबर लष्करच्या खर्चाकरितां जहागिरीहि द्याव्या लागल्या, एवढेंच नव्हे, तर राज्यकारभारामध्यें मराठ्यांस आणि हिंदूंस मोठमोठ्या अधिकारांच्या जागा देऊन, प्रसंगविशेषीं दिवाणांच्याहि जोखमीच्या जागा त्यांना द्याव्या लागल्या.

**६ निजामशाहीच्या काळचे मराठे सरदार**—अहमदनगरच्या निजामशाहीच्या अमदानीमध्यें, अशा तऱ्हेनें उदयास आलेल्या मराठी घराण्यांमध्यें, वऱ्हाडांतील लुखजी जाधवांचें घराणें प्रमुख आहे. नागपूरकर भोसल्यांच्या घराण्याचा मूळ पुरुष परसोजी भोसले याच्या चुलत्यांना त्याच अमदानींत प्रसिद्ध उमरावती हें शहर आणि यवतमाळ जिल्ह्यांत हल्लीं राजाची भाम म्हणून प्रसिद्ध असलेलें गांव, हीं दोन गांवें जहागीर मिळाली. निजामशाहीच्या कारकीर्दीतच दिल्लीच्या अकबराचा दक्षिणेंत शिरकाव होऊन त्यानें वऱ्हाडवर आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याच संधींत[२] वाशीम जवळच्या एका खेड्याचा कुळकर्णी उद्धवराव रामजी हा सामान्य परिस्थितीचा मनुष्य, मुसलमान सरदाराबरोबर दिल्लीस गेला व आपल्या कर्तबगारीनें बादशहास खूष करून ५२ परगण्यांची देशमुखी कमवून त्यानें आपला उदय करून घेतला. [३]मालोजी व विठोजी भोसले हे देवगिरी उर्फ दौलताबाद जवळच असलेल्या प्रसिद्ध वेरूळ गांवचे वतनदार पाटील होते. इतर मराठी होतकरू तरुणांप्रमाणें यांनींहि कृषि आणि पाटीलकी यांसारखे शांत वृत्तीचे व्यवसाय सोडून, शिपाईगिरीचा लष्करी पेशा स्वीकारला आणि प्रथम बारगिराच्या कनिष्ठ जागेपासून सुरवात केली. वऱ्हाडांत शिंदखेड येथें लखुजी जाधव यांच्या आश्रयास येऊन राहिल्यापासूनच त्यांच्यां भाग्योदयास सुरवात झाली.

**७ जाधव आणि भोंसले यांचा विवाहसंबंध**-शिंदखेड येथें हल्लीं मोठमोठे पडके राजमहाल आहेत, ते अद्याप जाधवरावांच्या वैभवाची साक्ष देतात. लुखजी जाधवराव हे निजामशाहीचे प्रतिष्ठित सरदार होते. त्यांना २७ महाल व

---

१ काळे-वऱ्हाडचा इतिहास पा. ८७. २ अनंत कविकृत-भाकिरहस्य.( शारदाश्रम हस्तलिखित संग्रह ) ३ काळे-वऱ्हाडचा इतिहास, पान १६०.

५२चावड्यांचा अधिकार असे. 'राजा' हें पद त्यांना मिळालें असून बादशहाकडून खासगत खर्चाकरितां जहागिरी आणि फौजेच्या खर्चाकरितां महाल तोडून मिळाले होते. अशा वैभवानें संपन्न असल्यामुळें त्यांच्याकडे हिंदु चालीरीतीप्रमाणें अनेक समारंभ होत असत. ते रंगपंचमीचा समारंभ मोठ्या थाटानें करीत असत. शिंदखेडास रंगपंचमीचा महाल म्हणून अद्याप एक महाल दाखवितात. जाधवरावांचें शिंदखेड हें वतनाचें मुख्य राहाण्याचें ठिकाण असल्यामुळें शिवचरित्रांतील प्रसिद्ध रंगपंचमीची हकीकत येथेंच घडणें जास्त संभवनीय आहे. मालोजी यांस त्याच्या कर्तबगारीनें बादशाहाकडून ५ हजारांची मनसब, राजा हा किताब, शिवनेरी, चाकण हे किल्ले व पुणें आणि सुपे या परगण्याची जहागीर मिळाली. कांहीं वऱ्हाडांतीलहि परगणे मालोजीच्या जहागिरींत होते. मालोजीचा असा उदय झाल्यावर राजे लखुजी आणि राजे मालोजी यांच्या कन्यापुत्रांचा विवाह ठरला आणि हें महाराष्ट्राचा उदयकाल घडविणारें लग्न नवरीमुलगी शिंदखेडाहून आणून, खास देवगिरी-दौलताबाद येथें प्रत्यक्ष बादशाहाच्या समोर मोठ्या समारंभानें झालें. केवढा हा अपूर्व योग ! तीच देवगिरी—जेथील यादव घराण्याचें मराठी राज्य मुसलमान बादशाहांनीं बुडविलें, तेथेंच—त्याच यादव घराण्यांतील एका कन्येचा विवाह खास त्याच मुसलमानी धर्माच्या बादशाहाच्या साक्षीनें मोठ्या समारंभानें घडून येतो ! आणि याच विवाहाचें फल म्हणून मुसलमानांची सत्ता संपुष्टांत आणून व मराठी राज्य स्थापन करून महाराष्ट्राचा उदय करणारा वैभवशाली पुरुष निर्माण होतो ! महाराष्ट्राच्या सुखदुःखाचे अनेक प्रसंग या देवगिरीस घडले आहेत. प्रत्येक स्वातंत्र्यप्रिय महाराष्ट्रीयानें देवगिरीला राष्ट्रधर्माची अत्यंत पवित्र अशी काशीवाराणशीच मानावयास पाहिजे.

८ **सासरेजावयांचें वितुष्ट**–जाधव आणि भोसले या दोन घराण्यांच्या शरीरसंबंध होऊन उदयोन्मुख महाराष्ट्राचा उद्धार करणारा प्रतापशाली वीर निर्माण झाला खरा, तथापि शिवसंभवकालीं उभय घराण्यांचें मोठेसें सख्य नव्हतें. किंबहुना राजे लखुजी आणि शहाजी या सासरेजावयांनीं, निजामशाहीच्या राजकारणांत प्रमुखत्वानें भाग घेतल्यामुळें त्यांच्यामध्यें अनेक वेळां प्रतिस्पर्धी म्हणून रणांगणावर खडाजंगीचे सामनेहि झाले. उभयतांहि महत्त्वाकांक्षी वीर पुरुष असल्यामुळें, ह्यांनीं निरनिराळ्या प्रसंगीं कधीं निजामशाही बादशाहा, तर कधीं दिल्लीचे मोगल असें पक्षांतर केलें आहे. शिवजन्मापूर्वी[२] ( इ. १६२४ ) प्रसिद्ध भातोडीच्या लढाईमध्यें शहाजी निजामशाहीकडून आणि राजे लुखजी आणि राजे उद्धव रामजी ( उदाराम ) हे मोगलाकडून लढत होते. शिवसंभवकाल राजा शहाजीस अत्यंत आणीबाणीचा गेला. इकडे निजामशाहीचा बादशाहा मूर्तिजा याचे आईनें जाधवरावाशीं समेट केला. त्यामुळें त्यास निजामशाहीचा आश्रय सोडून

---

१ मराठी दप्तर रु. १ २ अहमदनगर गॅ. पृ. ३९४

विजापूरच्या आदिलशाहीकडे आश्रय घेणें भाग पडलें. शहाजाहान बादशहानें जेरा लखुजी जाधव यास, शहाजाद्यास सुद्धां न मिळणारी अशी, २४०००स्वार व १५००० पायदळांची मनसब दिली आणि त्यांच्या अनेक आप्तेष्टांना मोठमोठ्या जागा दिल्यामुळें जाधवरावांचें प्रस्थ बरेंच माजलें. जाधवरावांच्याच कृत्यामुळें राजे शहाजीस निजामशाही सोडणें भाग पडलें. जिजाबाई गरोदर असल्यामुळें तिला बरोबर नेणें शक्य नव्हतें. म्हणून राजा शहाजी यानें तिला आपला भरंवशाचा अंमलदार श्रीनिवासराव यांच्या स्वाधीन केलें. आपल्या पतीचें आणि वडिलांचें वितुष्ट आलेलें पाहून ती मानी स्त्री परत शिंदखेडास आपल्या माहेरीं न जातां आपल्या पतीच्या जहागिरीच्या गांवीं शिवनेरीस गेली; आणि तेथेंच ऐन गडबडीच्या आणि धामधुमीच्या काळीं प्रतापी श्रीशिवरायाचा जन्म झाला! शिवभारताप्रमाणें[1] संभाजीचें लग्न शिवनेरींत झालें, तेव्हां जिजामाता गरोदर होती म्हणून तिला तेथेंच ठेवून शहाजी दर्याखानावर गेला.

९ **जिजामातांचें पुण्यास प्रयाण**-शिवजन्मानंतर[2] राजा शहाजी यानें दौलताबाद सोडून विजापूर हें आपलें कार्यक्षेत्र ठरविलें; त्यांतच त्यानें विजापूरचा सरदार बाजी मोहिते याच्या बहिणीशीं दुसरें लग्न केल्यामुळें जिजाबाई आणि पुत्र शिवाजी यांचा त्याचा लळा कमी झाला. शिवाय जाधवराव व भोसले यांचें वैमनस्यहि पत्नीपुत्रासंबंधीं बेफिकीरी वाढविण्यास कारणीभूत झालें. जिजाबाई आपल्या मुलांना घेऊन कधीं आपल्या जहागिरीच्या गावीं तर कधीं शिंदखेडास रहात असे. अखेरीस ( इ. १६३६ ) च्या सुमारास जिजाबाई आपल्या मुलांस घेऊन पुण्यास आपल्या जहागिरीच्या गांवीं आली; आणि तेंच बालशिवाजीच्या कार्यारंभाचें क्षेत्र झालें. शिवभारतकाराप्रमाणें[3] शहाजीचें जिजामाता व बालशिवाजी यांवर फार प्रेम होतें व त्यांच्याच आज्ञेनें राजमाता शिवाजीसह पुण्यास गेली; त्या रवानगींत नावडतपणाचें कारण मुळींच नव्हतें. जिजाबाईबरोबर तिची आई म्हाळसाबाई आपला नातु सुजनसिंह उर्फ संताजी यास बरोबर घेऊन गेली. याशिवाय जिजाबाईमुळेंच नारो त्रिंबक हणमंते, गोमाजी नाईक पानसंबळ वगैरे मंडळी वऱ्हाडांतून पुण्याकडे गेली. तसेंच, चिखली तालुक्यांतील करवंड येथील देशमूख इंगळे पुढें तंजावरपर्यंत गेले. या वऱ्हाडी मंडळींनीं शिवकालांत सुद्धां महाराष्ट्राच्या राजकारणांत भाग घेतला; आणि त्यांचा मराठी राज्यसंस्थापनेस आणि राज्यसंघटनेस फार उपयोग झाला, याची इतिहास साक्ष देत आहे.

१० **विदर्भातील परिस्थितीचें समालोचन**-जिजामाता पुण्यास जहागिरीवर गेली तो काळ दौलताबादेस फार घडामोडीचा झाला ( स. १६३३ ).

---

१ शि. भा. अ. ८ श्लोक १५-१८. २ चिटणीस बखर पा. २२. ३ शिवभारत -द. वि. आपटे यांची प्रस्तावना पा. ११२-११३.

निजामशाहीचा पूर्ण विध्वंस होऊन दौलताबादचा प्रांत मोंगलांच्या ताब्यांत आला होता. शहाजहान बादशहा (इ. स. १६३६) स्वतः दौलताबादेस आला. आणि दौलताबाद हें दक्षिणेच्या सुभ्याचें मुख्य ठिकाण करून केवळ १८ वर्षांच्या अशा औरंजेबास त्यानें दक्षिणेचा सुभेदार बनविलें. या दक्षिणेकडील मोंगल राज्याचें वऱ्हाड, खानदेश, तेलंगण आणि दौलताबाद असे चार भाग केले होते व प्रथम दौलताबाद व नंतर औरंगजेबानें खडकी गावाजवळ नवें शहर वसविलें. तें औरंगाबाद या चार विभागांचें मुख्य ठिकाण झालें.

वऱ्हाड आणि गंगातीर मिळून बनलेला विदर्भ सुपीक तर खराच. पण स.१३४७ ते १६००पर्यंतच्या सरासरी अडीचशें वर्षांच्या काळांत झालेल्या राज्यक्रांत्या, लढाया यामुळें तो अगदीं जर्जर झाला. खिलजी, तघलख, बहामनी, इमादशाही व निजामशाही असे राजवंश चलच्चित्राप्रमाणें एकामागून एक निघून गेले. खिलजी व तघलख यांचा प्रजेला पिळून काढण्याशिवाय विदर्भाशीं दुसरा कांहींहि संबंध नव्हता. बहामनी, इमादशाही व निजामशाही यांनीं स्थानिक राज्यें स्थापिलीं परंतु या राजवटींत अंतःकलह, लढाया यांमुळें राजांना स्वास्थ्य नव्हतें; मग प्रजेच्या कल्याणाकडे पाहतो कोण? बरेचसे परगणे व महाल सैन्याच्या योगक्षेमाकरितां सरदारांस वाटून दिले असत. कुळांकडून नांगरांच्या संख्येच्या मानानें सारा घेत असत. जमिनींची मोजणी केली नसून, वसूल करावयाच्या रकमेची आकारणीहि ठराविक नसे, त्यामुळें कुळांकडून नियमित रकम वसूल केली जात नसे; व वसूल झालेली रकम पूर्णपणें सरकारांत पटत नसे. त्यामुळें वसूल करणाऱ्या कामगारास पैशाची अफरातफर करावयास बराच वाव मिळे. त्यांतच वारंवार लढायांचे प्रसंग घडत असल्यामुळें शत्रुपक्षाकडील सैन्याकडून आणि प्रसंगविशेषीं राज्यकर्त्यांच्या लष्कराकडून, शत्रूच्या सैन्यास घांसदाणा व अन्नसामुग्री मिळूं नये म्हणून व कधीं कधीं स्वतःच्या सैन्याच्या उपयोगाकरितां म्हणून संग्रहीत धान्याची लूट होत असे; व उभ्या पिकांचीं शेतेंच्या शेतें चारून टाकीत असत. यामुळें शेतकरी शेती करावयाचें टाकून परागंदा होत आणि गांवेंच्या गांवें बेचिराख होत. अशी परिस्थिती असल्यामुळें राज्यकर्त्यांस म्हणावा तसा या प्रांतापासून फायदा होत नसे!

११ **लखुजी जाधव व उद्धवराव**-प्रथम अकबराचा पुत्र मुराद यानें सन १५९५ मध्यें चांदबिबीजवळून वऱ्हाड मिळविला व बाळापुराजवळ, शहापूर नांवाचें शहर वसवून तेथें तो राजवाडा बांधून राहिला. येथेंच तो अतिमद्यप्राशनामुळें मरण पावला. प्रसिद्ध अबुलफझलहि वऱ्हाडांत आला होता व अकबरहि सन १५९९ मध्यें येऊन गेला. त्यानें वऱ्हाडचें १३ सरकार केले राजा तोडरमलच्या पद्धतीप्रमाणें वऱ्हाडांतहि मोजणी वगैरे करण्याचा प्रयत्न त्या सुमारास आला. पण तें कार्य शहाजहानाच्या कारकीर्दीत मुर्शिद कुलीखान या अधिकाऱ्यानें पूर्णतेस नेलें. अकबरानें वाशीमजवळील उद्धवराव या होतकरू व कर्तबगार, ब्राह्मण कुल-

१ यदुनाथ सरकार-औरंगेजब भाग पा. ४१. २ सर. औरंग. भा. पा. १७६

कर्ण्यास ५२ माहालांची देशमुखी व ५००० ची मनसब देऊन वाढविलें. या सरदारानें व त्याच्या वंशांतील अनेक स्त्रीपुरुषांनीं मोंगल बादशाहीला फार मदत केली. अकबर परत दिल्लीस गेल्यावर त्याचा दुसरा पुत्र दानिअल हा बऱ्हाणपूर येथें राहूं लागला.

(शहाजहान) हा वऱ्हाडचा सुभेदार होऊन आला. त्यानें वऱ्हाडची सुव्यवस्था करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा बराच काळ मलिकंबराशीं लढण्यांत गेला. उद्धवराव या कर्तबगार ब्राह्मण सरदाराची तर त्यास मदत झालीच. पण निजामशाहींतील प्रसिद्ध मराठा सरदार लुखजी[2] जाधवराव यांसहि आपणाकडे वळविण्याचें श्रेय त्यास मिळालें. उभयता सरदार भातोडीच्या लढाईत ( १६२४ ) मोंगलातर्फे लढत होते. शहाजहान यानें ( १६२१-२२ ) जहांगीराविरुद्ध बंड उभारलें तेव्हां हे उभय सरदार शहाजहान यास अनुकूल होते. उद्धवराव यानें तर शहाजहान यास आपल्या माहूरच्या किल्ल्यांत आश्रय दिला. तेथें शहाजहान आपली बायको प्रसिद्ध मुमताज[3] महाल, पुत्र दारा, सुजा व औरंगजेब यांसह कांहीं दिवस राहिला होता. या उभय सरदारांवर शहाजहानचा फार विश्वास होता. लखुजी जाधवराव यांस तर शहाजाद्यांसहि न मिळणारी २४०० ची मनसब व १५००० घोडेस्वारांचा अधिकार मिळाला होता हें वर आलेंच आहे. उद्धवराव ( १६२६ ) वारल्यावर शहाजहानबादशहानें त्याचा पुत्र जगजीवनराव यास उद्धवराव याची मनसब, जहागीर वगैरे देऊन 'राजे उदाराम' हा वंशपरंपरा किताब दिला. जगजीवनराव हाहि कर्तबगार निघाला. याचा वऱ्हाडचे राजकारणांत शहाजहान यास फार उपयोग झाला.

**१२ आबादानी वाढविण्याचे प्रयत्नः**—शहाजहान (१६३६) दक्षिणेंत आला तेव्हां औरंगजेब त्याच्या बरोबर होता. त्याचें केवळ १८ वर्षांचें वय असतांनाच त्यास शहाजहाननें दक्षिणचा सुभेदार केलें. दक्षिणेकडील सुभ्याचा अधिकार औरंगजेबाकडे प्रथम इ. १६३८ ते १६४४ पर्यंत व नंतर इ. स. १६५३ ते १६५८ पर्यंत असा दोनदां आला. यांपैकीं औरंगजेबाची दुसरी सुभेदारी दक्षिणेंतील मोंगली मुलखांच्या विशेषतः वऱ्हाडच्या आबादानीच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. त्यापूर्वींहि मोगल अमलाखालीं वऱ्हाडांतील प्रजेची स्थिति पूर्वींच्या मुसलमानी अमलापेक्षां जास्त सुधारली. मुर्शिद्‌कुलीखानाचा धारा म्हणून बराच काळपर्यंत प्रसिद्ध असलेली जमीनधाऱ्याची पद्धति तेथें चालू झाल्यामुळें शेतकऱ्यांची स्थिति सुधारून त्यांना स्थायिकता आली व सरकारी उत्पन्नहि पुष्कळ वाढलें. औरंगजेबानें अमीन वगैरे लायक अधिकारी या कामाकरितां नेमिले.

**१३ शिवाजीची मोंगलांशीं पहिली सलामी—** औरंगजेब बादशाहा

---

१ अनंतकविकृत–भक्तरहस्य (शारदाश्रम हस्तलिखीत) २ या. मा. काळे--जाधवांचा बखर ३ बेनीप्रसाद -जहांगीर पा. ३१७

होण्यापूर्वींच आणि तो दक्षिणेच्या सुभेदारीवर असतांनाच (स. १६५६) शिवाजीनें मोंगलांना आपल्या कर्तबगारीची चुणूक दाखविली. औरंगजेबाचें सैन्य विजापूरच्या बाजूस गुंतलें अशी संधी साधून, जुन्नर येथील खजिना त्यानें लुटला आणि अहमदनगरच्या किल्ल्यापर्यंत मोगली मुलखांत लूटमार केली. परंतु विजापुरकराशीं मोंगलांचा समेट झालेला पहातांच शिवाजीनें पुन्हां नमतें घेतलें. कृष्णाजी भास्कर याला औरंगजेबाकडे पाठवून झालेल्या प्रकाराबद्दल त्यानें दिलगिरी प्रदर्शित केली आणि ५०० स्वार औरंगजेबाच्या मदतीस पाठविण्याचें कबूल केलें. राज्याच्या वारशाबद्दल चढाओढ सुरू झाल्यामुळें औरंगजेबास वरकरणीतरी ही सूचना मान्य करून हें प्रकरण या वेळीं मिटतें घ्यावें लागलें.

**१४ मोंगलांची शिवाजीवर चढाई, रायबागन—** औरंगजेब राज्य मिळविण्याकरितां उत्तरेकडे गेला ( १६५८ ) तेव्हांपासून दक्षिणेंतील राजकारण मोंगलाकडील सुभेदारांच्या हातांत राहिलें व औरंगजेब हा स्वतः दिल्लीस राहिल्यामुळें शिवाजीस राज्यसंवर्धनास अनुकूल परिस्थिति निर्माण झाली. या सर्व राजकारणांत वऱ्हाडांतील मोंगलांचे हिंदु सरदार शिवाजीविरुद्ध असत. शाहिस्तेखान यास शिवाजीवर पाठविलें तेव्हां त्याच्या मदतीस जे सरदार देण्यांत आले होते त्यांमध्यें राजे उदाराम यांच्या घराण्यांतील कर्तबगार बाई जगजीवनराव यांची पत्नी ही होती. या बाईस तिच्या शूरत्वावरून औरंगजेबानें 'रायबागन' म्हणजे शूर व्याघ्री हा किताब दिला होता. करतलबखान, रायबागन आणि अमरसिंग हे तीन सरदार आपापलें लष्कर घेऊन शिवाजीवर कल्याण, पनवेल ओलांडून पलीकडे गेले होते.[१] ही बाई देशस्थ ब्राह्मण असून इचें माहेर हैदराबाद येथें होतें. इचे वंशज वऱ्हाडांत व माहूर येथें राजे उदाराम या नांवानें प्रसिद्ध आहेत. शिवाजीनें राजा जयसिंग याचे मार्फत मोंगलाशीं पुरंदर येथें तह केला त्या वेळेस ( सन १६६५ ) शिवाजीचा पुत्र संभाजी याच्या नांवानें मोंगलाकडून ५००० स्वारांची मनसब मिळाली व त्या मनसबीच्या खर्चाकरितां वऱ्हाडांतील बाळापूर व आंवढें या दोन परगण्यांची जहागीर शिवाजीस मिळाली व हें लष्कर बादशहाच्या तैनातीस असावें असें ठरलें.

पुरंदरच्या तहानंतर शिवाजीला अहमदनगर व जुन्नर या दोन प्रांतांच्या हक्काबद्दल औरंगजेबाकडून पुन्हां वऱ्हाडांत नवीन जहागीर मिळाली; व प्रतापरावाच्या हाताखालीं, वरपांगी बादशहाच्या नोकरीकरितां, परंतु खास राजकीय हेतुमुळें वऱ्हाडच्या सरहद्दीवर शिवाजीनें कायमचें लष्कर ठेवून दिलें. जहागिरीच्या वसुलाच्या निमित्तानें शिवाजीचे सरदार वारंवार वऱ्हाडांत येत व लुटालूट करीत आणि गांवोगांवच्या पाटीलपटवाऱ्याकडून व देशमुखदेशपांड्याकडून चौथाई व सरदेशमुखी देण्याबद्दल करार लिहून घेत व रक्कम मिळाली म्हणजे

१ यदुनाथ सरकार–शिवाजी पा. ६५–८० २ वंशजांकडून मिळालेली माहिती ( लेखकाची सून रायबागनच्या वंशांतील असून तिची आठवी पिढी येते ).

पावत्या देत. अर्थात् ज्यांच्या जवळून रक्कम मिळाली त्यांना पुढें त्रास देत नसत. शिवाजी[1] दिल्लीस गेला तेव्हां त्याच्या खर्चाकरितां सरकारी ( मोंगली ) खजिन्यांतून १ लाख रुपये दिले होते; परंतु शिवाजी दिल्लीहून अटकेंतून सुटून आल्यावर ते रुपये वसूल करण्याच्या निमित्तानें औरंगजेबानें शिवाजीच्या वऱ्हाडांतील जहागिरी जप्त केल्या. त्यामुळें पुरंदरचा झालेला तह मोडण्यास शिवाजीस अनायासें निमित्त झालें ( सन १६७० ). शिवाजीनें सुरत लुटल्यावर औरंगजेबानें मोहोबतखान व दाऊदखान यांस ८-१० हजार सैन्य देऊन शिवाजीवर पाठविलें. त्यांच्या मदतीस रायबागन इलाहि ५००० लष्कर देऊन पाठविलें. पुढें प्रतापरावानें खानदेश व वऱ्हाड येथें बरीच लूट केली.

मोंगल अमलाखालीं वऱ्हाडांतील प्रजेस बरेंच स्वास्थ्य मिळाल्यामुळें या ५० वर्षांत वऱ्हाडामध्यें बरीच सुबत्ता झाली होती. एकट्या कारंजा येथेंच प्रतापराव कैक दिवस लूट करीत होता. तेथूनच त्यानें ४००० बैल व घोडे भरून रोकड, जवाहीर, सोनें, रुपें, व कापड वगैरे माल नेला.श्रीमंत सावकारांना धरून मोठमोठ्या रकमा घेऊन सोडून दिलें. वऱ्हाडचा सुभेदार खानजमान त्यावेळीं एलिचपूरला होता; तो या लष्करावर चालून येण्यापूर्वींच मराठ्यांचें घोडदळ पार नाहींसें झालें. प्रतापराव गुजर मेल्यानंतर हंबीरराव मोहिते हा शिवाजीचा सेनापति झाला. त्यानेंहि वऱ्हाडांत शिरून बरीच खंडणी वसूल केली.

**१५ शिवाजीचे विदर्भातील सहाय्यक**— जिजामातेबरोबर विदर्भातून जी मंडळी पुण्याकडे गेली, त्यांपैकीं सुजनसिंह ऊर्फ संताजी जाधव याचा पुत्र संभाजी हा बाजी देशपांडे यांच्याबरोबर पावनखिंडीमध्यें मोंगल सैन्यास अडविण्याच्या वेळीं युद्धांत होता. गोमाजी नाईक पानसंबळ याच्या मुलाकडे धनाजी जाधवाचें सेनापति पद होतें. खुद्द व्यंकोजी राजे याची बायको चिखली ( वऱ्हाड ) तालुक्यांतील करवंड येथील इंगळे देशमूख यांच्या घराण्यातील होती व अद्यापहि करवंडकर देशमुख तंजावराकडे राहतात व त्यांचें वतन वऱ्हाडांत आहे. जाधवांपैकीं रुस्तुमराव जाधव हे दिल्लीस राहात असत. त्यांच्या मुलीशीं पुढें औरंगजेबानें शाहुमहाराजांचा दिल्लीस विवाह लाविला होता. शाहूमहाराज सुटून आले तेव्हां भामचे परसोजी भोसले हेच वऱ्हाडांतून प्रथम त्यांच्या मदतीस पुढें आले.

**१७ रघुनाथ नारायण हणमंते आणि कर्णाटकची स्वारी**-नारो त्रिंबक हणमंते आणि त्याचे चिरंजीव रघुनाथ नारायण आणि जनार्दन नारायण यांची स्वराज्याच्या काळीं शिवाजीस फार मदत झाली. नारो त्रिंबक शाहाजीबरोबर कर्नाटकांत व तंजावरकडे गेला. तंजावरकडील शाहाजीच्या जहागि-

१ यदुनाथ सरकार–शिवाजी पा. २०६.

रीची व्यवस्था या हणमंत्यांकडे असे; व शहाजच्या निधनानंतर व्यंकोजीच्या हातीं कारभार आला. तेव्हां रघुनाथ नारायण हाच मुख्य कारभारी होता. परंतु पुढें व्यंकोजीचें व रघुनाथरावाचें वितुष्ट आल्यामुळें त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व पुढें तो महाराष्ट्रांत यावयास निघाला. मार्गांत तो हैदराबाद येथें आला व तेथें कुतुबशाहीचा प्रधान प्रसिद्ध मादण्णा याचा त्यानें स्नेह संपादन केला. याच्याच मध्यस्थीनें कुतुबशहाचा व शिवाजीचा स्नेहसंबंध घडून आला. हैदराबादेहून रघुनाथपंत इकडे आला व शिवाजीस भेटला. शिवाजीनें त्यांचा फार आदर केला. व तंजावरकडील संपत्ति, सुबत्ता इत्यादिकांबद्दल रघुनाथपंत यांजकडून माहिती मिळाल्यामुळें आपल्या वडिलांच्या तंजावरकडील इस्टेटीमधील वाटा मिळविण्याची कल्पना शिवाजीस रघुनाथपंताकडून मिळाली व हणमंत्यांना तंजावरची पूर्ण माहिती असल्यामुळें यांच्याच सहाय्यानें तिकडील मोहीम पार पाडण्याचें शिवाजीनें ठरविलें ( इ. स. १६७६ ). यापुढील हकीकत इतिहासज्ञांस विदित आहेच. या स्वारींत रघुनाथ नारायण यांच्या मध्यस्थीनें शिवाजी व व्यंकोजी यांचा सलूख झाला. शिवाजीनें म्हैसूरचा कांहीं भाग व कर्णाटकांतील किल्ले आपले ताब्यांत ठेवून बाकीचा सर्व मुलूख व्यंकोजीस दिला. शिवाजीनें पुढें रघुनाथपंत यास व्यंकोजीचा कारभारी म्हणून ठेविलें. पण या उभयतांचे पूर्वीपासून बिघडलें होतेंच. तथापि केवळ शिवाजीसारख्या थोर व्यक्तीच्या वजनानेंच उभयतांचा समेट झाला.

**१७ मोगल बादशहातींतील हिन्दूंची परिस्थिति**—श्री शिवाजीमहाराजांनीं मराठी राज्याची स्थापना केली ती विदर्भाच्या बाहेर दक्षिण महाराष्ट्रांत केली. विदर्भ, ज्यास उत्तर महाराष्ट्र म्हणतां येईल तो, शिवजन्मकाळीं आणि नंतर दिल्लीच्या मोंगलांच्या ताब्यांत होता. मोंगलाकडेच हा भाग आल्यानंतर प्रांताची आबादानी वाढविण्याचे पद्धतशीर प्रयत्न करण्यांत आले हें वर सांगितलेंच आहे. शिवाजीचा सेनापति प्रतापराव गुजर यानें कारंजा व वऱ्हाडांतील इतर शहरें लुटलीं त्या वेळीं जी अतोनात संपत्ति नेली, ती या सुबत्तेचेंच निदर्शक होय. मोंगल बादशहाच्या अमदानींत प्रजेमध्यें आर्थिक दृष्ट्या स्वास्थ्य नांदत होतें ही गोष्ट खरी असली तथापि विदर्भातील हिंदी प्रजा धार्मिक दृष्ट्या सुखी होती असें म्हणतां येणार नाहीं. मोंगलांच्या पूर्वीच्या खिलजी, बहामनी इत्यादि राज्यकर्त्यांच्या अमदानींत हिंदूंचा किती अमानुष छळ झाला, हें वर आलेंच आहे. अकबर, जहांगीर, शहाजहान आणि औरंगजेब या चार मोंगलबादशहांच्या कारकीर्दीतहि कमीअधिक प्रमाणानें हिंदूंची गळचेपीच झाली. हिंदु आणि मुसलमान या संस्कृति भिन्न असल्यामुळें त्यांचें एकीकरण होणें केव्हांहि शक्य नव्हतें. त्यांतूनहि हिंदुधर्म संकरानुकूल असल्यामुळें त्यांत इतरांना शिरकाव व्हावयास वाव नसे;

१ या. मा. काळे-वऱ्हाडचा इतिहास पा. ३२८

तितकाच मुसलमानी धर्म परापहरणप्रिय असल्यामुळें त्यांचे आघात हिंदुधर्मास सोसावे लागले. धर्मांध मुसलमान राज्यकर्त्यांनींहि यांत भाग घेतल्यामुळें हिंदूंस ते आघात असह्य झाले. अकबराचा मार्ग म्हणजे, जेथें साखरेनें काम होतें तेथें विषाचा उपयोग कशाला, असा असल्यामुळें जिझीया अथवा डोईपट्टी सारखी कर बसविण्याची त्याला कल्पनाहि सुचली नाहीं. जहांगिराच्या कारकिर्दींत, विशेषतः प्रथमार्धांत, विदर्भामध्यें जवळ जवळ अराजक होतें. पण शहाजहान सुभेदार झाल्यावर ती स्थिति बदलली. त्याच्याहि कारकीर्दींत हिंदुधर्मास म्हणावा तसा त्रास पोचला नाहीं. तथापि औरंगजेबाच्या कारकीर्दींत मात्र हिंदुधर्मावर सर्व बाजूंनीं असह्य आघात झाले.

**१८ महाराष्ट्राचें धार्मिक एकीकरण**—विदर्भांत सुद्धां औरंगजेबाच्या धर्मान्धतेची आंच जाणवूं लागली होती. रीतपूर, तळेगांव, दशासर, देवगिरी वगैरे ठिकाणचीं हिंदूंचीं देवळें व मूर्ति फोडल्या जाऊन तेथें मशिदी झाल्या; त्या अद्या-पहि वरील कृत्याची साक्ष देत आहेत. बाळापूर येथील देशपांडे व दारव्हा येथील राणे देशमूख, औरंगजेबानें दाखविलेल्या वतनाच्या अभिषास भुळून कां होईना, इस्लामी धर्मास बळी पडले ! मोंगलांचा सर्वांत प्रबल असा औरंगजेब बादशहा याप्रमाणें हिंदुधर्मावर आघात करून त्यास मातीमोल करण्याची सीमा करीत होता; त्याच वेळीं महाराष्ट्राचें एकीकरण करून त्यास नवचैतन्य देणारी शक्ति प्रबळ होत चालली होती ! एकनाथ, नामदेव इत्यादिकांनीं स्थापन केलेल्या नाथ सांप्रदाय व वैष्णव सांप्रदाय या पथांतील अनेक संतमहंतांनीं प्रतिकूल परिस्थितींत सुद्धां हिंदुधर्मास जिवंत ठेवण्याचें कार्य केलें. भागवतधर्माचें केन्द्र जें पंढरपूर शहर, तेथें ऐन मुसलमानी अमदानींत महाराष्ट्रांतील कोनाकोपऱ्यांतील संत, महंत, वार-करी निदान वर्षांतून एकदां तरी यात्रेनिमित्त भेटत असत; आणि येतांना व परत जातांना धार्मिक ऐक्याचें लोण अनायासेंच चोहोंकडे पोहचवीत असत ! श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या महाराष्ट्रधर्माची शिकवण त्यांच्या हयातींतच सर्व महाराष्ट्रभर पसरली होती. विदर्भांत औरंगजेबाचें राज्य असूनहि तेथें सम-र्थांच्या हयातींतच समर्थांच्या खास शिष्यांनीं मठ स्थापन केले होते. समर्थांच्या अशा वऱ्हाडी शिष्यांची एक यादी कारंजा येथील कल्याण स्वामींच्या शाखेंतील मठांत सांपडली आहे. कारंजा[3] येथील बाळकराम, रोकडाराम यांचा मठ, एलिच-पूर येथील भोळारामांचा मठ, चंद्रपूर येथील देवदासांचा मठ, अंजनगांव[4] सुरजी येथील मल्हार गोसाव्यांचा मठ, हे या गोष्टीची साक्ष देत आहेत. या मठातून तत्कालीन दासबोधांच्या प्रति अद्यापहि पहावयास मिळतात. या सर्व मंडळींचा उपयोग महाराष्ट्राच्या धार्मिक एकीकरणास फार झाला. त्यांतच मुसलमानांच्या

१ यदुनाथसरकार-औरंग० भा. ३ पृ. २६४. २ रानडे-मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष पा.३. ३ अनंत कवि-भक्तरहस्य. ४ उद्धवसुत-रामदासचरित्र (मुंबई प्रत) पा. ५७४-७५

धार्मिक अत्याचारास आळा घालणारा महाराष्ट्राचा उद्धारक मराठी राज्य स्थापन करण्याची खटपट करीत आहे ही गोष्ट या धार्मिक दळणवळणामुळें चोहोंकडे पसरली जात होती, व प्रतिकूल परिस्थितींत कार्य करणाऱ्या वीर पुरुषाबद्दल सर्व महाराष्ट्रांत आदर वाढत होता ही गोष्ट साहजिकच आहे.

**१९ शिवाजीशीं विदर्भाचा जिव्हाळ्याचा संबंध**---श्री शिवाजी महाराजांच्या मराठी राज्यसंस्थापनेच्या कार्यास विदर्भातील हिंदूंची सहानुभूति असणें स्वाभाविकच आहे. शिवाजीमहाराजांचे अनेक नातलग, चुलत आजे, मामे वगैरे मोठमोठ्या अधिकाराच्या जागेवर होते. तसेंच खास पितृकुळांतील चुलते, भाऊ वगैरे मंडळीहि दौलताबादेच्या आसमंताद्भागीं विद्यमान होती. शिवाजीचा जम बसतांच अनेक नातलग मोंगलांची नोकरी सोडून त्यास मिळाले.परसोजी भोसल्याचे चुलते, तेलंगराव[2] इंगळे वगैरे अनेक मराठे सरदारांच्या जहागिरी वऱ्हाडांत होत्या. खास औरंगजेबाच्या हुकमानें शिवाजीमहाराजांस संभाजीच्या मनसबदारीकरितां बाळापूर वगैरे ठिकाणच्या वऱ्हाडांत जहागिरी होत्या आणि त्यानिमित्य शिवाजी महाराजांचे सरदार वसुलीकरितां वरचेवर येत असत; त्यामुळें मराठीराज्य स्थापन करणाऱ्या थोर पुरुषाबद्दल आदर आणि विश्वास विदर्भातील प्रजेंत उत्पन्न होणें साहजीकच आहे. औरंगजेबाचें लष्कर आणि सुभेदार वऱ्हाडांत असतांनासुद्धां शिवाजीच्या सरदारांना वऱ्हाडांतील पाटील व देशमूख देशपांडे यांच्याकडून चौथाईचा वसूल मिळूं लागला आणि चौथाई देण्याबद्दल करारनामेहि लेखी मिळूं लागले. तसेंच शिवाजीचे सरदारहि मिळालेल्या उत्पन्नाबद्दल, पाटील, देशमूख व देशपांडे यांना राजरोसपणें पावत्या देऊं लागले व ज्यांनीं अशा पावत्या दाखविल्या त्यांच्यावर शिवाजीच्या सरदारांचा जुलूम होत नसे. हा सर्व प्रकार मराठी राज्याच्या स्थापनेस आणि संवर्धनास पोषकच होता. श्रीशिवछत्रपतींच्या रायगड येथील राज्यारोहण प्रसंगीं (इ.स.१६७४) वऱ्हाडांतील[3] कारंजा येथील ब्राह्मण हजर होते व त्यांना, लुटीच्या वेळीं निष्कारण प्राणहानि झाली असल्यास त्या पापाच्या क्षालनार्थ, भूयसी दक्षिणाहि मिळाल्याचें एक हिंदीलेखक लिहितो. ही गोष्ट खरी नसेल असें धरून चाललें तरी, विदर्भ-कन्येच्या पोटीं जन्मास आलेल्या एका विदर्भ-पुत्रानें गोब्राम्हणप्रतिपालनाचें व सद्धर्मरक्षणाचें ब्रीद धारण करून मराठी राज्याची स्थापना केली व छत्रपति हें बिरुद धारण करून रायगडावर तो सिंहासनारूढ झाला ही गोष्ट विदर्भीयांसच नव्हे तर सर्व महाराष्ट्रीयांस अभिमानास्पद झाली असली पाहिजे यांत संशय नाहीं.

---

१ यदुनाथसरकार-शिवाजी पा.२०७. २ शारदाश्रम-पापळ परगण्याचा स.१६७० मधील हिशेब. ३ सरस्वती ( हिंदी ) भाग २१ खंड २ पा. २८८.

२० **उपसंहार**---वरील लेख लिहितांना अनेक पुस्तकांचा आणि शारदाश्रमांत जमविलेल्या अनेक कागदपत्रांचा उपयोग केला आहे. कोठून माहिती घेतली याबद्दल पानाखालीं टीपा दिल्या आहेत; तथापि सर यदुनाथ सरकार यांचा शिवाजी ( जुनी आवृत्ति ) आणि औरंगजेबाचें चरित्र भाग ५ या इंग्रजी पुस्तकांचा व श्री. यादव माधव काळे यांचा वऱ्हाडचा इतिहास या पुस्तकाचा प्रामुख्यानें उपयोग केला आहे; याबद्दल या थोर व प्रसिद्ध इतिहासकारांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत आहे. शेवटीं पडत्या महाराष्ट्राचा उद्धार करणाऱ्या प्रभावशाली श्रीशिवाजी महाराजांच्या पवित्र चरणास वंदन करून, ही शिवकालीन विदर्भाची कैफियत पुरी करतों. इति शम् ।

---

# शिवाजी राजा कीं बादशहा ?



( लेखक–**वासुदेव आत्माराम देशप्रभू**–पेडणें गोवा )

**सारांश**:—सदर निबंधांत, सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत जगप्रसिद्ध झालेल्या शिवाजीवर एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत खुनी, चोर, दरोडेखोर, अशा तऱ्हेचे आरोप ( अज्ञानानें किंवा जाणून बुजून केलेले ) बाल–विद्यार्थ्यांच्या गळीं उतरविण्याचे होणारे गर्ह्य प्रयत्नांबद्दल नापसंती प्रदर्शित करून आतां ती लाट संशोधकीय, राजकीय किंवा अन्य कारणांनीं फिरल्याबद्दल समाधान व्यक्त केलें आहे. आणि नंतर शिवाजीला राजा, छत्रपती, किंवा बादशहा यांपैकीं कोणतें उपपद अधिक उचित आहे याची जनतेच्या दृष्टीनें छाननी केली आहे. 'ना विष्णुः पृथिवीपतिः' असें मानणाऱ्या आम्हां आर्य लोकांकडून प्रजा–रंजनतत्पर व्यक्तीला राजा ही पदवी स्वयंस्फूर्तीनेंच देण्यांत येत असे. पण छत्रपति ही अभिनव व अनन्यसाधारण पदवी 'राजा' पेक्षां श्रेष्ठ असून ' बादशहा ' पेक्षां कनिष्ठ तर नाहींच. पण वाच्यार्थानें व लक्ष्यार्थ्यांनेंहि तीहून ज्यास्त विशाल व व्यापक आहे....एकाद्या मर्यादित भूप्रदेशांतील एकाच संस्कृतीच्या लोकांचा स्वयंनिर्मित किंवा लोकप्रतिष्ठित असा जो अधिपति त्याला सामान्यतः राजा म्हणण्यास हरकत नाहीं, व अशा एक किंवा अनेक समान किंवा भिन्न संस्कृतीच्या लोकाधिपति–समूहावर जो आपलें सांस्कृतिक व राजकीय वर्चस्व स्थापितो तो बादशहा होय......अन्य बादशहांशीं महाराजांची तुलना करून पहाण्यास ' तुलनेच्या दृष्टीनें सर्व बाजूंनीं साजेल असा दुसरा पुरुषच सांपडणें कठीण '...तथापि राज्यविस्तार, सैन्यबळ, अष्टप्रधान-विशिष्ट–राज्यपद्धति वगैरे गोष्टी, तसेंच ' विजापूर गोवळकोंडे येथील बादशहांना

नुसता शहच नव्हे तर त्या शहांची शाही जिरवून त्यांना इतर मांडलिकांप्रमाणें खंडणी देण्यास भाग पाडणें, इतकेंच नव्हे, तर थेट मोंगल बादशहापासून देखील चौथाई, सरदेशमुखी वसूल करण्याचा बादशाही हक्क प्रस्थापित करणें वगैरे गोष्टी लक्षांत घेतां......महाराजांना बादशहा म्हणणें क्रमप्राप्त होतें'.....तुलना करतांना इतरांच्या चुका होतात त्या टाळण्याकरितां, 'तुलना सर्वांगीण असावी व ती तत्कालीन समजुतीनुसार असावी. तत्पूर्वींच्या किंवा तदनंतरच्या काळांतील कसोट्यांचें माप त्या कामीं लावणें योग्य होणार नाहीं' असा दंडक सुचवून लेखकांनीं आपले मुद्दे क्रमवार पुढें मांडले आहेत. महाराजांच्या हातून निर्भेळ हिंदुपद बादशाही स्थापन न होतां ती पुढें झाली असें जे ध्वनित करतात त्यांच्याबद्दलहि लेखकानें नापसंती प्रदर्शित करून, 'हिंदुपद पादशाहीच्या ध्रुवावर महाराजांचें लक्ष अढळ होतें, अशी ग्वाही दिली आहे व महाराजांचे चरित्रांतील मुख्य गोष्टी आपल्या मुद्याच्या समर्थनार्थ क्रमानें मांडल्या आहेत. व आक्षेपकांनीं त्या साकल्यानें लक्षांत घेऊन त्यांच्यांतील एकसूत्री धोरण व ध्येय काय होतें तें ठरवावें असें सुचविलें आहे.

महाराजांना शूद्र ठरविण्याचे प्रयत्न बऱ्याच जणांनीं मोठ्या प्रमाणावर केले होते. महाराजांनीं गागाभट्टांना आणवून आपलें क्षत्रियत्व उघड रीतीनें तावून सुलाखवून आपल्या समकालीन राजे वगैरे लोकांकडूनहि कबूल करविलें. व शत्रूंला देखील आपलें छत्रपतित्व किंवा बादशाहीपण कबूल करावयास लावलें.

दिग्विजयाच्या पौराणिक कल्पनेचा पुनरुद्धार करून त्या दिग्विजयानें आपल्या बादशाहीपणाला बळकटी व पूर्णता आणिली. त्याच कल्पनेची परिपुष्टि स्वतःचा स्वतंत्र शक स्थापून 'शककर्ता' या नामाभिधानानें सार्थ केली. अष्टप्रधानादि पद्धति, राजव्यवहार–कोशादि प्रयत्न वगैरे कृत्यांनीं हा बादशाहीपणाचा खुंटा विशेष बळकट केला. विजापूर गोवळकोंडें इत्यादि बादशहांना आपल्या तंत्रांत आणून मांडलिकाप्रमाणें त्यांच्याकडून खंडणी वसूल केली. प्रत्यक्ष मोंगल साम्राज्यांतून व मोंगल बादशहाकडून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा आपला बादशाही हक्क कबूल करविला. इतकेंच नव्हे तर, राज्याभिषेकसमयीं इंग्रजांनीं "कंपनीचें गलबत फूटून जीं माणसें अगर जो माल महाराजांच्या हातीं लागेल तीं सर्व त्यांनीं इंग्रजांना परत करावीं." असें जें कलम घातलें होतें तें महाराजांनीं साफ नाकारलें. मोंगल बादशहासीं तह वगैरे होतांना असलें कलम घालण्याचें धाष्टर्य इंग्रजादि कोणाहि पाश्चात्यांकडून झालें नसतें व नाहीं. परंतु महाराज दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणारे नव्हते. त्यांनीं "गलबत फुटून कंपनीचे जे लोक किनाऱ्याला लागतील त्यांचें संरक्षण करण्याचें मान्य केलें. परंतु माल परत करणें हें त्यांच्या सार्वभौमत्वाच्या हक्काला बाधक आहे म्हणून एकदम नाकबूल केलें."

अशा कृत्यांनीं आपलें बादशाहीपण दिगंती देखील पूर्णपणें प्रस्थापित केल्यानंतर महाराजांनीं आणखी जास्त काय करावयास पाहिजे होतें ? तें या आक्षेपकांनीं स्पष्ट सांगावें अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे.

# श्रीरामदासांची राजकारणांतील कामगिरी

## ( लेखक—जनार्दन सखाराम करंदीकर पुणें )

### १. श्रीसमर्थांचें बालपण व शिक्षण

गोदातीरीं जांब गांवीं जामदग्नि गोत्री ठोसर यांच्या घराण्यांत नारायणाचा म्हणजे समर्थ रामदास यांचा जन्म शके १५३०च्या चैत्र महिन्यांत रामनवमीस रामजन्माच्या वेळींच झाला ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. त्यांचें बारा वर्षांपर्यंतचें बालपण जन्मस्थानीं म्हणजे जांबगांवींच गेलें. तेथें तेवढ्या अवधींत त्यांचें शिक्षण किती झालें याविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं. पण त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें कुळकर्णीपण चालविण्यापुरतें तें झालें असावें. समर्थांचें उपनयन शके १५३५मध्यें झालें. त्यानंतर दोनच वर्षांनीं त्यांनीं आपल्या वडील बंधूंस आपल्याला अनुग्रह देण्याविषयीं विनंति केली. श्रेष्ठांनीं त्या वेळीं 'आतांच गडबड करूं नको' असें सांगितलें. पण तें समर्थांस पटलें नाहीं व त्यांनीं रुसून जाऊन मारुतीच्या देवळांत उपासना आरंभिली. त्या वेळीं त्यांस श्रीरामचंद्रानें अनुग्रह देऊन 'रामदास' असें नांव ठेविलें, आणि 'कृष्णातीरीं जाऊन जगदुद्धार करावा, सिसोदियाच्या वंशीं सांबवरेंकरून व देवीच्या वरेंकरून शिवनामा उत्पन्न होणार आहे. त्यास उपासना सांगून धर्मस्थापना करवावी' अशी आज्ञा केली अशी आख्यायिका आहे. हा अनुग्रह शके १५३८च्या श्रावण शु. ९ स जांब येथें झाला. यावरून वयाच्या ९ व्या वर्षींच समर्थांना केवढा अधिकार प्राप्त झाला होता तें दिसून येईल.

समर्थांच्या वडिलांचे घरीं बारा गांवांचें कुलकर्णीपण होतें आणि वडिलांचा अंत समर्थ आठ वर्षांचे असतानाच झाला. त्या वेळीं श्रेष्ठांचें वयहि अवघें १० वर्षांचें होतें. पण वडिलांच्या पश्चात् त्यांनीं घरचें कुलकर्णीपण चालविलें. यावरून त्या वेळीं अल्पवयांतच व्यवहारापुरतें शिक्षण होत असे असें दिसतें. तथापि वडील निवर्तल्यामुळें आणि वडील बंधूंच्या गळ्यांत संसार पडल्यामुळें त्या वेळेपासून पुढें समर्थांच्या शिक्षणाकडे कोणीं फारसें लक्ष दिलें नाहीं असें दिसतें. तरी पण त्या वेळचें गृहशिक्षणच इतकें व्यापक असे कीं, त्यांना पुढील आत्मशिक्षणाची पूर्व तयारी या काळांत पूर्ण करतां आली असें म्हणण्यास हरकत नाहीं. लिहिणें, वाचणें, व्यावहारिक गणित आणि संस्कृत काव्याची कांहीं ओळख एवढें शिक्षण त्यांचें त्या वेळीं झालें असावें. शिक्षणाखेरीज बाकी सगळा वेळ खेळणें, हिंडणें, फिरणें, पोहणें यांत जात असल्यामुळें शरीरप्रकृति

सुदृढ बनली होती. वयाच्या ६७ व्या वर्षी त्यांनीं हेळवाकपासून चाफळपर्यंतचा पल्ला घोड्यावरून गांठला, यावरून त्यांना घोड्यावर बसण्याचा सरावहि बाळपणापासून असावा असें अनुमान निघतें.

बाळपणचीं बारा वर्षे संपल्यावर विवाहाच्या वेळीं ‘ सावधान ’ शब्द कानीं पडतांच रामदास तेथून निसटून गोदातटाकीं टाकळीस गेले. तेथें त्यांनीं पुरश्चरण व रामनामाच्या त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप चालविला. या बारा वर्षांत तपश्चर्ये-बरोबरच त्यांनीं आपला अभ्यासहि चालविला असावा. त्यांच्या सर्व उपदेशांत अभ्यासावर कटाक्ष विशेष आहे. अभ्यासाचें महत्त्व व अभ्यासाची पद्धति यांविषयीं त्यांनीं जें जें सांगितलें तें तें स्वानुभवानें सांगितलें असावें. अर्थातच या बारा वर्षांत त्यांचा अभ्यास पुष्कळच झाला असला पाहिजे.

दासबोध द. ११, समास ३, यांत ते म्हणतात—

॥ प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठांतर करावें ॥
॥ पुढें भोजन झालियावरी । कांहीं वाची चर्चा करी ॥
॥ एकांतीं जाऊन विवरी । नाना ग्रंथ ॥

दासबोध दशक १२, समास ९, यांत व इतरत्र समर्थ म्हणतात—

॥ प्रातःकाळीं उठावें । ‘ प्रातःस्मरामि ’ करावें ॥
॥ नित्यनेमें स्मरावें । पाठांतर ॥
॥ मागील उजळणी पुढें पाठ । नेम धरावा निकट ॥
॥ विद्याभ्यास सोडूं नये । कांहीं केल्या ॥ दा. २।२।८

॥ जनामध्यें जो जाणता । त्यास आहे मान्यता ॥
॥ कोणी एक विद्या असतां । महत्व पावे ॥ दा. ९।४।१८

॥ कांहीं धर्मचर्चा पुराण । हरिकथा निरूपण ॥
॥ वाया जाऊं नेदी क्षण । दोहींकडे ॥
॥ अपार असावें पाठांतर । सन्निधाचि असावा विचार ॥ दा. ११।५।१५

॥ जो एकांतास तत्पर । आधीं करी पाठांतर ॥
॥ अथवा शोधी अर्थांतर । ग्रंथगर्भीचें ॥
॥ आधीं शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ।
॥ गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ दा. ११।६।१०

॥ अहो या शहाणपणाकारणें । बहुतांचे कष्ट करणें ॥
॥ परंतु शहाणपण शिकणें । हें उत्तमोत्तम ॥ दा. १५।३।२५

॥ पाठ उदंडचि असावे । सर्व काळ उजळीत जावे ॥
॥ सांगितले गोष्टीचें असावें । स्मरण अंतरीं ॥
॥ अखंड एकांत सेवावा । ग्रंथमात्र धांडोळावा ॥
॥ प्रचीत येईल तो घ्यावा । अर्थ मनीं ॥ दा. १८।३।२०
॥ शब्दरत्नें परीक्षावीं । प्रत्ययाचीं पाहोन घ्यावीं ॥
॥ येर तीं अवघीं सांडावीं । एकिकडे ॥ दा. १८।५।३

अशा प्रकारचीं अनेक वचनें त्यांच्याच ग्रंथांतून काढून देतां येतील. यावरून पंचवटीस राहून तपश्चर्या करित असतांना त्यांनीं स्वतः आपला अभ्यास चालू ठेविला असावा असें अनुमान निघतें. हा सगळाच अभ्यास ग्रंथद्वारां किंवा गुरुमुखानें झाला असेल असें नाहीं. पंचवटीसारख्या क्षेत्रांत नित्य कीर्तन, पुराण, प्रवचन, चालूच असावयाचें. त्यामुळें केवळ श्रवणभक्तीनेंहि पुष्कळ ज्ञानप्राप्ति समर्थांना झाली असेल. परंतु कीर्तनकार किंवा पुराणिक यांची ठराविक सांप्रदायिक ज्ञानाची पुंजी समर्थांना केव्हांहि अपुरीच वाटणार. यास्तव त्यांनीं ग्रंथ संपादन करून स्वतः एकान्तांत त्यांचें मनन केलें असावें व त्यांतून 'शब्दरत्नें परीक्षावीं । प्रत्ययाचीं पाहोनि घ्यावीं ॥' या त्यांच्या उपदेशाप्रमाणें जें ज्ञान त्यांना पटलें त्याचाच त्यांनीं संग्रह केला असावा.

दासबोधांत आधाराकरितां म्हणून ठिकठिकाणीं सुमारें ४० संस्कृत श्लोक त्यांनीं दिले आहेत व त्यांतील कांहीं श्लोकांचें विवरणहि त्यांनीं त्या त्या श्लोकांपुढें केलें आहे. त्यावरून त्यांचा त्या ग्रंथांशीं चांगला परिचय होता असें दिसतें. याशिवाय इतर कवितांतून ठिकठिकाणीं आधाराकरितां म्हणून संस्कृत वचनांचा त्यांनीं उपयोग केला आहे. त्यांत नुसत्या गीतेंतील १८।२० स्थळें आढळून येतात. यावरून गीतेच्या अर्थांशीं त्यांचा चांगलाच परिचय होता असें दिसतें. आणि त्यांतल्यात्यांत विशेष हें कीं, गीतेचा अर्थ त्यांनीं कर्मयोगपर लाविला आहे. त्यावरून केवळ हरिदास पुराणिकांच्या कथापुराणांतून त्यांनीं हें ज्ञान संपादन केलेलें नसून स्वतः मननपूर्वक अभ्यास करून त्यांनीं हा ग्रंथपरिचय करून घेतला असावा. यांत त्यांची दृष्टी शब्दा-पेक्षां अर्थाकडे अधिक असल्यानें व बहुतेक सर्व अध्ययन गुरुमुखाशिवाय झालें असल्यानें त्यांचें संस्कृतचें ज्ञान पढिक विद्यार्थ्यांच्या किंवा शास्त्रीपंडितांच्या कसोटीला लागण्यासारखें नसेल, तथापि रसोद्ग्राहि पद्धतीनें त्यांचें अध्ययन पुष्कळच झालें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि ज्या अर्थीं रामायणांतील सुंदरकांड व युद्धकांड यांचें रूपांतर त्यांनीं आपल्या काव्यांत केलें आहे, त्यावरूनहि त्यांच्या अभ्यासाचा व्याप लक्षांत येतो.

पंचवटीस असतांना समर्थांनीं तपश्चर्येबरोबरच अध्ययन किती केलें असावें याचा हा विचार झाला. आतां त्याच तपश्चर्येच्या काळांत त्यांनीं ग्रंथलेखनासहि सुरवात केली असावी असें दिसतें. जुना दासबोध, करुणाष्टकें, लघुरामकृष्णचरित्रें आणि अनेक पदें व किरकोळ काव्यें त्यांनीं या वेळीं लिहिलीं असावींत असें त्या त्या ग्रंथांतील अंतस्थ प्रमाणांवरून अनुमान काढितां येतें. त्या सर्वांचीच येथें चर्चा करणें शक्य व आवश्यकहि नाहीं. असो. याच वेळीं शके १५५३ त शहाजीचा मुकाम नाशीक त्र्यंबक येथें होता. तेव्हां शहाजीची समर्थांची येथें पहिली भेट झाली असावी असा कै. वासुदेवशास्त्री खरे यांच्या निबंधांत उल्लेख आहे व तो संभवनीय दिसतो.

अशा प्रकारें हें अध्ययन आणि बारा वर्षांचें पुरश्चरण संपवून ज्ञानबल व तपोबल-संपन्न असे श्रीसमर्थ भरतखंडाच्या तीर्थाटणाचा संकल्प करून टाकळीहून उत्तरेकडे निघाले.

## २. समर्थांचें तीर्थाटन

हिंडतां पारखी लोकां। कार्यकर्ता जिवीं धरी ॥
वोळखी कराव्या दाटा। एके ठायीं स्थिरों नये ॥ स्फु. प्र. २

हा प्रवास करीत असतांना धर्मरक्षणाची त्यांना काळजी लागून राहिली होती आणि तसा धर्मसंरक्षक राजा कोणी आढळतो कीं काय हें त्यांना पहावयाचें होतें. प्रवास करतां करतां भेटतील ते लहानथोर पारखून आणि त्यांत एकादा 'गाजी' आढळल्यास त्याच्या हातून धर्मरक्षणाचें कार्य करवावें हाच हेतु या वेळेपासून त्यांनीं मनांत धरला होता.

हें तीर्थाटण करीत असतांना त्यांनीं जनतेला कोणत्या प्रकारचा उपदेश केला होता आणि परकीय सत्तेनें गांजलेल्या आणि सर्व प्रकारें दैन्यावस्थेंत सांपडलेल्या लोकांस ते कसा धीर देत असत, हेंहि नमूद करण्यासारखें आहे. देशावर कोसळलेलें भयंकर अरिष्ट पाहून श्रीरामाजवळ मोठ्या कळवळ्यानें त्यांनीं आपलें गाऱ्हाणें विदित केलें. त्यांत ते म्हणतात—

हुजुर दम निघेना। अंतरीं कोंड नाना ॥
तिळभरी स्थळ कोठें। पाहतांहि दिसेना ॥
बहुतांचि सुकुमारा। स्वस्थ नाहीं शरीरा ॥
निशिदिनी जनचिंता। लागलीसे उदारा ॥
सकळ जन सुखावे। तो कसा काळ फावे ॥
भजन जन उकावे। सर्व आनंद पावे ॥

अशा प्रकारें लोककल्याणाची रात्रंदिवस चिंता वाहून श्रीरामचंद्रास ही आपत्ति दूर करण्याकरितां प्रार्थना करीत असतां जनतेचा धीर सुटूं नये म्हणून लोकांना ते प्रोत्साहनपर असाच उपदेश करीत. त्याचा मासला पहा—

धीर धरा धीर धरा । हडबडूं गडबडूं नका ॥
काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटिचें ॥
धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ॥
अधीर माणसें खोटीं । काम कांहीं कळेचिना ॥
सभाग्य रावणादिक । बहू कठीण काळ कां ॥
महीवरी परोपरी । उदंड हे भरोवरी ॥
भरे सवेचि मागुतें । उगेंचि होतसे रितें ॥
भरोंच लागता भरे । भरे कदापि नावरे ॥
सवेंचि वोसरे सरे । सरोचि तें कदा नुरे ॥

याप्रमाणें वारंवार रावणाचा दाखला देऊन म्लेंच्छांचें अचाट वाटणारें सामर्थ्य असेंच ओहोटीला लागेल व शेवटीं समूळ नाहींसें होईल असें सांगून ते जनतेला धीर देत. त्यांतच भक्तांच्या संकटाच्या वेळीं देव त्यांना तारण्याकरितां अवतार घेतो, या गीतावचनाचीहि ते पुनः पुनः आठवण करून देत; आणि हा उपदेश करण्याच्या पद्धतींत देखील त्यांच्या मनाचा खंबीरपणा व दृढ विश्वास दिसून येतो. देवानें भक्तांना दिलेलें आश्वासन ते कशा ओजस्वी वाणीनें वर्णन करितात तें पाहा :—

मज गांजिलें तें साहे । परी भक्तांचें न साहे ॥
माझ्या भक्ता शीण व्हावा । मग मजसी त्यासी दावा ॥
मज अवतार घेणें । माझे भक्ताचे कारणें ॥
निजदासासी पाळावें । दुर्जनासी निर्दळावें ॥
तुम्हां संकटाचे वेळे । काय झाकितों मी डोळे ॥
देव म्हणे दास जनीं । चिंता नें धरावी मनीं ॥

अशा प्रकारचा स्फूर्तिदायक व दिव्य संदेश ऐकून कोणत्या संकटग्रस्ताचें मन आशापूर्ण बनणार नाहीं ? पण समर्थ हे केवळ नशिबावर व दैवी चमत्कारावर हवाला देऊन बसणारे आळशी भक्त नव्हते. जो स्वतः प्रयत्न करतो त्यालाच देव साहाय्य करतो, हें तत्त्व त्यांच्या मनांत पूर्णपणें बाणलेलें होतें. म्हणून निराश झालेल्या जनतेला धीर देण्याकरितां त्यांनीं ईश्वर भक्तांच्या रक्षणासाठीं व दुष्टांच्या विनाशासाठीं अवतार घेतो, असें सांगितलें तरी आपला प्रयत्न आपण शक्त्यनुसार चालविलाच पाहिजे, असें ते सर्वांना निक्षून आग्रहपूर्वक सांगत असत.

करील प्रयत्न जीतुका । तयास लाभ तीतुका ॥
करील व्याप तो भला । बहूत भाग्य लाधला ॥
नसेल व्याप तो हळू । पडेल रे पळे पळू ॥
अरत्र हो परत्र हो । विचित्र काळसूत्र हो ॥
अखंड सावधानता । सभाग्य तो नव्हे रिता ॥

अशी सावधानतेची सूचना ते सदा सर्वदा देत असत. रामदासस्वामींची महंतांना जी शिकवण आहे, तींत सावधानतेविषयीं त्यांचा केवढा कटाक्ष आहे हें पाहिलें म्हणजे त्यांच्या दूरदर्शीपणाची खरी कल्पना येते.

समर्थांनीं आपल्या प्रवासांत प्रयाग, अयोध्या, मथुरा, द्वारका, ओंकार-मांधाता, हरिद्वार, बद्रिकेदार, अवंती, गंगासागर, जगन्नाथपुरी, रामटेक, सुरत, सोरटी–सोमनाथ, परळी–वैजनाथ, घृष्णेश्वर, इत्यादि ठिकाणीं मठांची स्थापना केली. यावरून धर्मप्रसार करणें, रामोपासना वाढविणें आणि ठिकठिकाणीं आपल्या शिष्यांची स्थापना करून आपल्या मताची छाप सर्वत्र पाडणें अशा प्रकारच्या संघटना-कार्यास त्यांनीं या वेळेपासूनच प्रारंभ केला असें दिसतें.

उत्तरहिंदुस्थानची यात्रा संपवून समर्थ नर्मदेच्या दक्षिणेस आले आणि दक्षिण हिंदुस्थानांतहि ठिकठिकाणीं त्यांनीं मठस्थापना केली. त्यांत गोकर्ण, तंजावर, श्रीरंग-पट्टण, पंढरपूर, डोमगांव, शिरगांव, कण्हेरी, दादेगांव, पाली, भालगांव, टांकळी, इंदूर बोधन, शिरोळ, सावंतवाडी, चाफळ, सज्जनगड, नीलंगें, बेदर, दंडाराजपुरी, औदुंबर, देवगड, गोवें, मच्छलीपट्टण, कांची, श्रीशैल्य, भीमाशंकर, रामेश्वर, अनंतशयन, मल्याळ, तिसगांव इत्यादि ठिकाणचे मठ अद्यापपावेतों प्रसिद्ध आहेत. दक्षिणेंतली ही मठस्थापना अमुकच अवधींत झाली असें सांगतां येत नाहीं. उत्तर-हिंदुस्थानांत जसे समर्थ एकदांच गेले होते, तसा कांहीं दक्षिणेंतला प्रकार नाहीं. निदान तीन वेळां तरी ते रामेश्वरपर्यंत जाऊन आले होते. आणि उत्तर हिंदुस्थानांत अवरंगजेबानें प्रळय मांडला व काशीविश्वेश्वराचें देवालय मोडलें तसा प्रकार दक्षिणेंत न झाल्यानें इकडची मठस्थापना समर्थांच्या आयुर्दायाच्या अखेरपर्यंत चालूच होती असें म्हणतां येईल.

समर्थांचें दक्षिण हिंदुस्थानांत तीर्थाटण चालू असतां योगायोग असा आला कीं, शहाजीराजांची स्वारीहि दक्षिण हिंदुस्थानांत बंगलोर वगैरे भागांतच होती. शहाजी राजे प्रथम शके १५५८ त कर्नाटकांत गेले. तेथून ते १५६१ त विजापुरास परत आले. त्या वेळीं त्यांनीं कऱ्हाडची देशमुखी रणदुल्लाखानाच्या मध्यस्थीनें हस्तगत

केली. पुढें शहाजीराजे लवकरच परत बंगलूरास गेले व त्या वेळीं त्यांनीं जातांना शिवाजीसहि बरोबर नेलें होतें. शके १५६४ पर्यंत शिवाजी शहाजीराजांजवळ कर्नाटकांतच होता आणि याच वेळीं समर्थहि कर्नाटकांतच तीर्थयात्रा करीत होते. यावरून बंगलोरास समर्थ व शहाजी यांची भेट झाली असण्याचा संभव आहे. नाशिकला शहाजीचा मुक्काम असतांना तेथेंच जर शहाजी व समर्थ यांची भेट प्रथम झाली असेल तर कर्नाटकांत या वेळीं त्यांची पुनः भेट होणें अधिक संभवनीय आहे. यदा-कदाचित् नाशिकपंचवटीस या उभयतांची भेट झाली नव्हती असें मानलें तरी देखील बंगलोरास त्यांची भेट होणें अगदीं स्वाभाविक आहे. कारण, एकाच प्रांतांतले दोघे सुप्रसिद्ध पुढारी परप्रांतांत असतांना एकमेकांविषयीं अधिक अगत्य दाख-वितात. शहाजीसारखा महाराष्ट्रांत नांवाजलेला सरदार बंगलोरास अधिकारावर येऊन राहिला असतां समर्थांसारखे दक्ष व चिकित्सक महंत त्यांची भेट घेतल्या-शिवाय राहिले असतील हें संभवनीय नाहीं.

> सृष्टीमध्यें बहुत लोक । परिभ्रमणें कळे कौतुक ॥
> नानाप्रकारीचे विवेक । आढळों लागती ॥
> एखादा आढळे गाजी । सकळ लोक अखंड राजी ।
> चुकोन उदंड आढळते । भारी मनुष्य दृष्टीस पडतें ।
> महंतार्चे लक्षणसें वाटतें । अकस्मात ॥

अशा प्रकारें परिभ्रमणांत एखादा गाजी, एखादा वजनदार, एखादा मला व व्यापक पुढारी आढळावा हाच ज्यांचा मुख्य हेतु त्या समर्थांनीं बंगलोरांत असतांना शहाजीची भेट घेतली नसेल असें मानणें असमंजसपणाचें ठरेल.

समर्थांची व शहाजीची भेट बंगलोर प्रांतीं झाली असावी व तेथेंच समर्थांनीं पुढील कार्याचें धोरण ठरविलें असावें असें अनुमान करण्याला समर्थांचें मसूरला शहाजीच्या देशमुखीच्या गांवीं, येऊन राहणें हें एक गमक आहेच. पण त्याशिवाय याला समर्थांच्या आत्मचरित्रांतहि एक सांकेतिक आधार मिळतो. आपल्या कारस्थानांची कोठेंच वाच्यता न व्हावी अशी दक्षता समर्थांनीं आरंभापासून घेतली होती व ती त्यांच्या हयातीच्या अखेरपर्यंत चालली होती. त्यांच्या शिष्यांपैकीं कोणींहि हा 'मंत्रभेद' केला नाहीं. समर्थांच्या पश्चात् त्यांचें चरित्र लिहिणारे ' समर्थप्रताप 'कार गिरिधर यांनीं एकच उल्लेख व तोहि अर्धवट सांकेतिक भाषेंत केला आहे; तो ' आकारपूर्वक यवनासी मारविलें ' एवढाच होय. पण तेवढ्या एका अर्धसांकेतिक उल्लेखावरून जसा त्या वेळचा सगळा इतिहास पुढें उभा राहतो, त्याचप्रमाणें समर्थांनीं स्वतः

रामवरदायिनी मातेपुढें जें आत्मचरित्र स्वमुखानें निवेदन केलें, त्यांतीलहि एक दोन ओझरत्या व सांकेतिक उल्लेखांवरून त्यांच्या चरित्रावर बराच प्रकाश पडतो. समर्थांच्या कवितेंतील स्फुटप्रकरण ६७ यांत स्वतः श्रीसमर्थ म्हणतात—

अंतरीं कल्पना केली । एकांतीं बोलिलों बहु ।।
रक्षिता देव देवांचा । त्याचा उच्छाव इच्छिला ॥ स्फु. ६७–४५

यांत मसूरला येऊन राहण्यापूर्वी रामचंद्राचा उत्सव सर्वत्र करावा अशी अंतर्यामीं इच्छा केल्याचें समर्थ स्वतः सांगतात. व त्याचबरोबर 'एकांतीं बोलिलों बहु' असेंहि त्यांचेंच विधान आहे. हें एकान्तांतलें राजकारण कोणाशीं झालें ? 'एकान्तीं बोलिलों' म्हणजे आत्मगत भाषण केलें, स्वतःशींच बोललों, असा अर्थ आजपर्यंत करण्यांत येत आहे. परंतु 'अंतरीं कल्पना केली' यांत स्वतःच्या मनाशीं विचार केला हा अर्थ आलाच. नंतर पुनः 'एकान्तीं बोलिलों बहु' असें सांगण्यांत स्वारस्य काय ? हें बोलणें मसुरास येऊन राहण्यापूर्वी बंगलोर प्रांतीं शहाजीशीं झालें असावें आणि तेथेंच कृष्णातीरीं शहाजीच्या देशमुखीच्या गांवीं समर्थांनीं रहावें असा विचार ठरला असावा. यावांचून यावर अन्य कल्पनाच बसत नाहीं. बरें, या सर्व गोष्टी गुप्तपणें झाल्या याविषयींहि स्वतः समर्थांचीच त्याच प्रकरणाच्या शेवटीं साक्ष आहे. कारण ते म्हणतात—

"मातेसी काय चोरावें । सर्वही ठाउकें तिला ।"

यावरून हें कारस्थान इतर सर्वांपासून चोरून ठेवलें होतें असेंच नाहीं का सिद्ध होत ? देवी अंतर्यामींचें जाणणारी, तेव्हां तिच्यापासून मात्र ही गोष्ट चोरतां येत नाहीं, म्हणून तिच्या स्तोत्रांत ती अर्धवट सांकेतिक भाषेंत कबूल केली; पण इतरांना तर तिचा थांगच लागूं दिला नाहीं. असाच याचा अर्थ होत नाहीं काय ? सारांश, तीर्थाटण करितांना दक्षिणेंत बंगलोर प्रांतीं शहाजीची व समर्थांची भेट झाली, बाल शिवाजीसहि समर्थांनीं तेथें पाहिलें, त्याच वेळीं समर्थांनीं कृष्णातीरास येऊन राहावें याविषयीं एकान्तात पुष्कळ वाटाघाट होऊन विचार ठरला व त्या विचारास अनुसरून तीर्थाटण समाप्त होतांच समर्थ मसूरला येऊन राहिले आणि या धार्मिक उत्सवाच्या बरोबरच राजकारणहि चालवयाचें असल्यानें उत्सवास येणाऱ्या मंडळीस उपसर्ग पोचूं नये या हेतूनें समर्थांनीं तेथील अधिकाऱ्यांकडून शपथा घेवविल्या.

अशा रीतीनें समर्थ हे गोदातटाक व पंचवटी क्षेत्र सोडून कृष्णातटाकीं चाफळास कांहीं हेतु मनांत धरून येऊन राहिले खरें. पण पंचवटीच्या रामाच्या दर्शनास आपण अंतरलों ही हुरहुर त्यांच्या मनास एकसारखी लागून राहिली होती. ती त्यांनींच पंचवटींतील रामभक्तांना पाठविलेल्या एका पत्रावरून स्पष्ट होते. त्या पत्रांत ते लिहतात:—

तुम्ही निकट देवापाशीं । आणि मी पडलों दूरी देशीं ।। कृपाळूपणें रघुनाथासीं । माझी करुणा भाकावी ।। प्रत्यहीं माझा नमस्कार । देवासी करावा निरंतर ।। मज कारणें शरीर । इतुकें कष्टवावें ।। बाळ वृद्ध नरनारी । सकळ भक्त कुमारकुमारी ।। समस्तांसी नमस्कारीं । कृष्णातीरवासी ।।

या पत्रावरून पंचवटीपासून दूर राहिल्यामुळें समर्थांच्या मनाला लागलेली तळमळ व्यक्त होते; आणि असा प्रश्न मनांत उभा राहतो कीं, पंचवटीच्या रामाचा वियोग त्यांना जर इतका असह्य वाटत होता तर आपल्यासाठीं रामाला नमस्कार करण्याचें काम दुसऱ्यांना सांगण्यापेक्षां ते स्वतःच उठून पंचवटीला जाऊन कां राहिले नाहींत ? चाफळास त्यांची अशी काय मिरास पुरली होती ? अद्यापि येथें कांहीं इनाम मिळालें नव्हतें किंवा वर्षासनहि कोणीं देऊं केलें नव्हतें. असें असतां चाफळ, मसूर, कऱ्हाड या प्रांतांतच राहण्याचा त्यांचा आग्रह कां ? याचें स्वाभाविक उत्तर हेंच कीं, शिवाजीला साहाय्य होऊन, त्याजवर अनुग्रह करून जगदुद्धार करण्याच्या कार्याचा पाया घालण्याला हें स्थान सर्व प्रकारें सोईचें होतें. या वेळीं मसूरगांवाची देशमुखी आदिलशाहीकडून शहाजीराजास मिळालेली होती. स्वतः शहाजी या वेळीं कर्नाटकांत असून शिवाजीराजानें मावळप्रांतांत शहाजीच्या जहागिरीचा आश्रय घेऊन धामधूम सुरू केली होती. विजापूर आणि पुणें यांच्या दरम्यान कऱ्हाड हें मुसलमानांचें प्रबळ ठाणें असून मसूर गांव कऱ्हाडाहून कांहीं अंतरावर पुण्याच्या वाटेला होतें. शहाजीच्या देशमुखीचा कारभार पाहण्यासाठीं म्हणून शिवाजीमहाराजहि मसुरास वरचेवर येण्याचा संभव होता. अशा नाक्याच्या ठिकाणीं समर्थांनीं आपल्या पुढील कार्याची मुहूर्तमेढ रोवली. मसुरास येऊन राहिल्यानंतर पहिल्याच चैत्र महिन्यांत त्यांनीं तेथें रामनवमीचा उत्सव सुरू केला. त्यानंतर आसपासच्या सगळ्या भूभागाचें निरीक्षण केल्यावर चाफळ हें गांव समर्थांना मसूरगांवापेक्षां सर्व दृष्टींनीं अधिक सोईचें वाटलें, म्हणून तिसऱ्या वर्षापासून त्यांनीं उत्सवाचें स्थलांतर चाफळास करून तेथें कायमची मुहूर्तमेढ रोवली.

### ३. मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।।

कऱ्हाड प्रांतांत येऊन राहिल्यापासून समर्थांनीं महाराष्ट्रांत शिष्यशाखा वाढविणें आणि मारुतीची स्थापना करणें या व्यवसायास प्रारंभ केला. समर्थांनीं स्वतः स्थापन केलेल्या मारुतींचीं ११ प्रसिद्ध स्थानें आहेत. ते ११ मारुती पुढीलप्रमाणें:— चाफळ, शिंगणवाडी, माजगांव, उंब्रज, मसूर, शहापूर, बाहेगांव, शिराळें, पारगांव, मनपाडळें व बोरगांव. हीं सर्व स्थानें पन्हाळा ते वांई यांच्या दरम्यान येतात.

या ठिकाणीं शिवाजीनें स्वराज्यस्थापना करण्यापूर्वी अदिलशाहीचा अंमल होता; आणि मुसलमानांच्या सगळ्या हालचाली या ठिकाणांहून कळण्यासारख्या होत्या. विशेषतः चरेगांवनजीकचा चंद्रगिरीचा माथा हा या कामीं विशेष सोईचा होता. अशा महत्वाच्या ठिकाणीं आपल्या शिष्यांची योजना करून समर्थांनीं आपल्या संघटनेस प्रारंभ केला. ११ मारुतींची ही स्थापना शके १५६७ ते १५७२ या ५ वर्षांत झाली. शिवाजीमहाराजांचा स्वराज्यस्थापनेचा प्रारंभ आणि समर्थांच्या मारुतीच्या स्थापनेचा आणि रामनवमीच्या उत्सवाचा प्रारंभ हा अगदीं समकालीन आहे, हा योगायोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

समर्थांनीं पहिल्या रामनवमीचा उत्सव शके १५६७त मसूर गांवीं केला. त्यानंतर एक वर्षानें शिवाजीनें तोरणा किल्ला घेतला व राजगड किल्ला बांधला. इकडे समर्थांनीं आदिलशाही दरबारांतील अधिकारी मुरार जगदेव, बाजी घोरपडे, काशिपंत, वगैरेंना वश करून उंबरज, चरेगांव, माजगांव, मसूर, शहापूर, शिंगणवाडी वगैरे गांवीं बरीच जमीन इनाम मिळविली. यापूर्वीच पहिल्याच उत्सवाच्या सुरुवातीला समर्थांनीं आपल्या उत्सवाच्या कार्याला मुसलमानी अधिकाऱ्यांकडून कोणत्याहि प्रकारचा उपसर्ग पोंचूं नये, अशा प्रकारचें आश्वासनपत्र मिळवून ठेविलें होतें. हा उत्सव केवळ धार्मिक आहे म्हणून त्या उत्सवांत आम्ही कोणत्याहि प्रकारें अडथळा करणार नाहीं, उलट शक्य तितकी मदतच करूं, असें आदिलशाहीची नोकरी करणाऱ्या हिंदु अधिकाऱ्यांनीं शपथपूर्वक आश्वासन दिलें. अशा प्रकारें आगाऊ पक्का बंदोबस्त करून समर्थांनीं उत्सवास आरंभ केला.

मसूरला तीन वर्षें उत्सव झाल्यानंतर शके १५७० मध्यें चाफळचें देऊळ बांधण्यांत आलें आणि तेथें रामचंद्राच्या मूर्तीची स्थापना होऊन रामनवमीचा उत्सव चाफळास होऊं लागला. शके १५९४ मधील एक उत्सव मात्र पन्हाळ्यानजीक पारगांवीं झाला. तेवढा एक अपवाद सोडून १५७१ पासून आतांपर्यंत चाफळासच उत्सव होत आहे. शके १५९४ च्या उत्सवाचे वेळीं श्रीसमर्थ व दिवाकर गोसावी हे पन्हाळ्यानजीक पारगांवीं कांहीं कारस्थानांत गुंतल्यामुळे चाफळच्या मूर्ती पारगांवला नेऊन तेथें उत्सव करण्यांत आला. यावरून समर्थ हे राजकारण अधिक मानीत होते, कां केवळ देवाचा उत्सव अधिक मानीत होते, हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईलच. राजकारण सोडून देऊन उत्सवाकरितां चाफळास येण्याच्या ऐवजीं उत्सवाचेंच स्थलांतर करण्यांत आलें हें लक्षांत घेण्यासारखें आहे. विशेषतः

१५९४ च्या वैशाख महिन्यांत शिवाजी व रामदास यांची पहिलीच भेट झाली, तत्पूर्वी त्यांची भेट केव्हांहि झालीच नव्हती असें म्हणणारांनीं या पहिल्याच भेटीच्या पूर्वी समर्थ पारगांवला उत्सवाच्या वेळीं कां गेले होते आणि त्यांनीं उत्सवाकरितां चाफळास थांबून येण्याच्या ऐवजीं चाफळच्या रामाच्याच मूर्तीचें स्थलांतर कां केलें याचा उलगडा करावा. शिवाजीची या वेळची ही भेट ' पहिलीच ' होती खरी ! पन्हाळा परत घेण्याच्या कारस्थानांतली ती पहिली होती ! केशव गोसावी यांना ती भेट पहिलीच होती; दिवाकर गोसावी यांना कांहीं ही भेट पहिली नव्हती. दिवाकर गोसावी हे शिवाजीशीं राजदरबारीं बोलणें करणारे कारभारी. त्यांनीं कांहीं शिवाजीची भेट पहिलीच आहे असें लिहिलेलें नाहीं. ते नुसतेंच लिहितात कीं, ' राजेश्री शिवराजे भोंसले हे समर्थांचे भेटीस येणार.' त्यावर केशव गोसावी स्वतःचें भाष्य लिहितात कीं, ' शिवाजीची ही पहिलीच भेट आहे ! ' केशव गोसाव्यास सगळीं कारस्थानें अवगत नसल्यानें त्यानें ही भेट पहिलीच मानिली तरी दिवाकर गोसावी किंवा स्वतः समर्थ यांना ती भेट पहिलीच होती असा त्यावरून अर्थ निष्पन्न होत नाहीं.

### ४. शहाजीची सुटका व चंद्रराव मोरे प्रकरण

शिवाजीनें स्वराज्यस्थापनेस प्रारंभ केल्यानंतर शहाजीची कैद हेंच त्याजवर पहिलें मोठें संकट ओढवलें. वडिलांना अशी अटक झाल्यामुळें शिवाजीचें राजकारण अडून राहिलें. विजापूरकरांविरुद्ध बंडाळी चालू ठेविल्यास वडिलांच्या जीवितास धोका पोहोंचेल या भीतीनें शिवाजीस हात आंखडावा लागला; आणि शहाजीच्या सुटके-विषयीं प्रयत्न करणें भाग पडलें. या वेळीं शिवाजीनें शहाजहानाकडे संधान बांधून दिल्लीच्या बादशहाकडून आदिलशाही दरबारास शहाजीची सुटका करण्याविषयीं हुकूम येईल अशी तजवीज केली. तथापि विजापूरचे सगळे अधिकारी शहाजीच्या सुटकेच्या विरुद्ध असते तर केवळ शहाजहानाच्या पत्रामुळें शहाजीची सुटका होऊं शकली नसती. पण, विजापूर दरबारांतले ध्यानतराव वगैरे अधिकारी समर्थांचे शिष्य असल्यामुळें त्यांच्या मध्यस्थीमुळें शहाजीची सुटका लवकरच झाली. तरी पण या सुटकेकरितां शिवाजीला इकडे सिंहगड व तिकडे संभाजीला बंगलोर यांसारखे अत्यंत बंदोबस्ताचे व महत्त्वाचे किल्ले द्यावे लागले. शिवाय आदिलशाहीविरुद्ध कोणतेंहि कारस्थान करण्याला एक प्रकारें मोठा अडथळा येऊन बसला. शहाजी आदिलशाहीच्या कैदेंत असतांना आणि इकडे कोणतेंहि राजकारण करण्याला अडचण उपस्थित होऊन राहिली असतांना शिवाजीला

समर्थांसारख्या सत्पुरुषाच्या भेटीची आवश्यकता वाटावी व उत्सुकता उत्पन्न व्हावी हें अगदीं स्वाभाविक आहे. आणि म्हणून याच वेळीं म्हणजे शके १५७१ च्या वैशाख महिन्यांत शिवाजीनें समर्थांची भेट घेतली असावी. आणि या भेटीनंतर दीड महिन्याच्या आंत शहाजीची आदिलशाहीच्या अटकेंतुन सुटका होऊन तो कर्नाटकांत आपल्या जहागिरीकडे निघून गेला; असें सांप्रदायिक कागदपत्रांवरून सिद्ध आहे व तें चुकीचें मानण्याला तद्विरुद्ध कोणताहि बळकट पुरावा पुढें आलेला नाहीं.

अशा रीतीनें शहाजीच्या जिवावर आलेला प्रसंग टळला खरा, पण त्या-करितां शिवाजीला पुष्कळच घस सोसावी लागली. सिंहगडासारखा दुर्भेद्य किल्ला विजापूरकरांना द्यावा लागला. हें तर शल्य त्याच्या मनांत डांचत होतेंच; पण त्यापेक्षां आपल्या कारस्थानाच्या सर्व नाड्या आंखडल्या गेल्या, याचें त्याला अधिक वैषम्य वाटत होतें. आपण कांहींतरी नवीन कारस्थान उभारल्यास पुन्हां शहाजीवर संकट ओढवेल कीं काय या शंकेमुळें ५।६ वर्षें त्याची अगदीं कुचंबणा झाली. आणि शेवटीं वैतागानें त्यानें शके १५७७त आपल्या राज्याचे दानपत्राची चिठी सम-र्थांच्या भिक्षेच्या झोळींत टाकली. हें दान प्रेमाचें किंवा भक्तीचें नसून रुसव्याचें आहे हें समर्थांच्या लक्षांत आलें. त्यावरून समर्थांनीं शिवाजीस जो बोध केला तो ' साव-धानता प्रकरण ' म्हणून प्रसिद्ध आहे.

धुरेनें धीर सोडूं नये। मुख्य प्रसंग चुकों नये ।
उद्योग रहित कामा नये । पशू जैसें ।
एकांतीं चाळणा करावी । धारणा उदंड धरावी ।
नाना विचारणा करावी । अरि–मित्रांची ।।
उपाधीस कंटाळला । विचाराचा आळस आला ।
म्हणजे जाणावा चेवला । बुद्धीपासोनी ॥
पाहिलेंच पाहावें । केलेंचि करावें
शोधिलेंची शोधावें । राजकारण ॥
इशारतीचे बोलतां नये । बोलायाचे लिहूं नये ।।
लिहावयाचें सांगू नये । जबानीनें ॥

अशा प्रकारचा हा उपदेश केवळ भक्तिमार्गी व राजकारणाचा संपर्कहि नसलेल्या साधुपुरुषांच्या तोंडून कधींहि निघाला नसता. असो.

समर्थांनीं शिवरायाला पूर्वी केलेलेंच राजकारण पुन्हां करावयास सांगितलें खरें; पण शहाजीराजांची त्यास पुनः आडकाठी येण्याचा संभव होता. याकरितां एकवार

समक्ष शहाजीची भेट घ्यावी म्हणून स्वतः समर्थ परळीहून रामेश्वराच्या यात्रेच्या निमित्तानें बंगलुराकडे शके १५७७ च्या ज्येष्ठअखेरीस निघाले. त्याच वर्षाच्या कार्तिकमासांत समर्थांची व शहाजीची भेट झाली असावी असें निश्चित अनुमान काढतां येतें. कारण, त्या महिन्यांत समर्थांनीं व्यंकोजीराजे यांना अनुग्रह दिला असें वाकेनशी टिपणांत म्हटलें आहे. आणि असा अनुग्रह शहाजीच्या आग्रहावरूनच समर्थांनीं दिला असावा हें उघड आहे.

शहाजी व समर्थ यांची बंगलुरास भेट झाल्यानंतर अडीच महिन्यांच्या आंत शिवाजीनें चंद्रराव मोऱ्यावर स्वारी केली आणि शके १५७८ चे वैशाखांत शिवाजीनें रायरी घेतली. इतका कार्यभाग इकडे आटोपल्यानंतर थोड्याच दिवसांनीं समर्थ रामेश्वरची यात्रा आटोपून परत आले. त्या वेळीं शिवाजी त्यांस तोरगळपर्यंत सामोरा गेला होता. शके १५७८ च्या श्रावणांत समर्थांची स्वारी चाफळ, पाटण, व हेळवाक या भागांत होती. या ठिकाणीं अशी एक शंका उपस्थित होते कीं, शके १५७६ च्या एका पत्रावरून समर्थ ग्रंथलेखनाकरितां शिवथरच्या घळींत एकांत वासांत जाऊन राहिले आणि १० वर्षेपर्यंत त्यांनीं हें ग्रंथलेखन चालवावयाचें असा आपला मनोदय कळविला होता. पण, समर्थांच्या ७२ वर्षांच्या कारकीर्दींत असें एकहि वर्ष गेलें नाहीं कीं ज्या वर्षीं समर्थांनीं कोठेंहि संचार केला नाहीं. मग १० वर्षें एकाच स्थळीं राहणें कितपत संभवनीय आहे याचा वाचकांनींच विचार करावा. वस्तुस्थिति अशी दिसते कीं, चाफळच्या उत्सवाचा भार दिवाकर गोसावी यांजवर सोंपवून समर्थांना त्यांतून मोकळें व्हावयाचें होतें; व त्याकरितां ही ग्रंथलेखनाची सबब पुढें करण्यांत आली असावी. या १० वर्षांच्या काळांत त्यांचा संचार अनेक ठिकाणीं झाला असल्याचें सिद्ध झालें आहे व त्याप्रमाणेंच ते बंगलुरास जाऊन शहाजीस भेटून शिवाजीचा मार्ग मोकळा करून घेऊन आले असल्यास नवल नाहीं. अशा रीतीनें समर्थांनीं शिवाजीचा रुसवा दूर केला आणि चंद्रराव मोऱ्याच्या प्रकरणापासून शिवाजीचें राजकारण पुनः नेटानें सुरू झालें.

### ५. अफजलखानवधप्रसंग व समर्थांचा उपदेश

विजापूरचा सरदार अफजलखान शिवाजीवर चालून आला असतां शिवाजीनें त्याला नेस्तनाबूद करून त्याच्या सैन्याचा पार धुव्वा उडविला. या अफजलप्रसंगीं समर्थांनीं शिवाजीस जो उपदेश केला तो दासबोधांत दशक १८।६ यांत कायमचा समाविष्ट झाला आहे. हा उपदेश शिवाजीलाच उद्देशून आहे याविषयीं कोणासहि

शंका नाहीं. परंतु आजपर्यंतची समजूत अशी कीं, अफजलखानाचा वध करून नंतर शिवाजी समर्थांच्या भेटीस आला असतां समर्थांनीं शिवाजीस हा उपदेश केला. पण तो समास लक्षपूर्वक वाचून पाहिल्यास त्यांतील उपदेश कार्य सिद्धीस नेऊन विजय संपादन करून भेटीस आलेल्या वीराला तो सांगितलेला नसून, एखादें जिवावरचें साहस करावयास निघालेल्या भक्तास केलेल्या उपदेशासारखा तो दिसतो. यावरून तो उपदेश अफजलवधाच्या आधींच केलेला असावा असें अनुमान निघतें.

या दृष्टीनें त्या उपदेशाकडे पाहिल्यास त्यांतून बराच गूढार्थ निघतो. त्या समासाचा आरंभच पहा.

नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर शृंगारणें ।
विवेकें विचारें राजकारणें । अंतर शृंगारिजे ॥
शरीर सुंदर सतेज । वस्त्रें भूषणें केलें सज्ज ॥
अंतरीं नसतां चातुर्य बीज । कदापि शोभा न पवे ॥

या समासाला नांव ' उत्तमपुरुषनिरूपण ' असें दिलें आहे. आणि यांत उत्तम पुरुषाचीं लक्षणें वर्णिलीं आहेत असें आपण समजतों. पण नाना वस्त्रांनीं व नाना भूषणांनीं शरीर शृंगारणें हें कांहीं उत्तम पुरुषाचें लक्षण असें कोणींहि समजत नाहीं. व समर्थ तर समजतच नसत. कारण, याच दासबोधांतील द. ११ स. १० यांत त्यांनीं

" वेष भूषण तें दूषण । कीर्ति भूषण तें भूषण "

असें स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां तेच समर्थ शिवाजीसारख्या चतुर राजकारणी पुरुषाला नाना वस्त्रांनीं व नाना भूषणांनीं शरीर शृंगारावें असला उपदेश कसा करतील ? अर्थात्च यांत कांहीं तरी गूढार्थ असला पाहिजे आणि अफजलखानाच्या वधाच्या आधीं समर्थांनीं शिवाजीस सांकेतिक भाषेनें हा उपदेश केला आहे हें ध्यानांत ठेविल्यास या समासाचा अर्थ उकलण्यास अडचण पडत नाहीं. या समासाचा शिवाजीला उद्देशून योजिलेला अर्थ पुढीलप्रमाणें असावा.

' भेटीस जातांना आपल्या संरक्षणासाठीं तुम्हीं वस्त्रें आणि क्षत्रियाला उचित अशीं नाना भूषणें ( हत्यारें ) धारण करावीं. अंतःकरणांत विवेक व विचार जागृत ठेवावे. पोषाखाची व शस्त्राची बाह्य शोभा बुद्धिचातुर्याखेरीज फुकट आहे. ज्याला चातुर्य नसेल त्याचा हेतु सिद्धीस जाणार नाहीं. अफजलखान हा फटकळ, हेकेखोर, कठोर बोलणारा आणि नेहमीं आपल्याच तोऱ्यांत असणारा असा आहे. तो भेटीच्या वेळीं न्याय किंवा नीति पाहाणार नाहीं. त्याच्याशीं तुम्हीं राजकारणाची वाटाघाट करून

तडजोड करूं म्हणाल. पण, त्याचा वाद कधीं संपणार नाहीं. असलीं माणसें नेहमींच दुष्ट व बेइमानी असतात. त्यांच्या बोलण्यांत बोलणें नसतें. असलीं माणसें पापी राक्षसच समजावीं. या प्रसंगासारखा प्रसंग नेहमींच येतो असें नाहीं; आणि आपण मनांत एखादा नियम पाळावयाचा बेत केला असला तर तो नेम सिद्धीस जाईलच असें नाहीं. कारण नेम पाळावयास जावें तर राजकारण बिघडेल. ' अति सर्वत्र वर्जयेत् ' असें शास्त्रकारांनीं सांगितलेंच आहे. याकरितां विवेकी पुरुषानें कोणताहि आग्रह न धरतां प्रसंगीं योग्य दिसेल त्याप्रमाणें वर्तन करावें. दोघेहि आपापला हट्ट धरून बसले तर मग सगळेंच बोलणें खुंटेल. म्हणून दोघांपैकीं कोणीतरी एकानें हट्ट सोडला पाहिजे. पण आपली बाजू सोडून नमतें घेण्याचा प्रसंग तुम्हांवर येणार नाहीं. कारण ईश्वर तुमचा पाठिराखा आहे आणि मुख्यतः तुळजाभवानीला तुमची काळजी आहे. तथापि जें कार्य करावयाचें तें विचारपूर्वक करावें. भेटीच्या वेळीं अखंड सावधानता ठेवावी, अशी सूचना करण्याची जरुरीच नाहीं. कारण, तुम्ही तसे दक्ष आहांच. पण या गोष्टीचा कसा तरी एकदां शेवट लावलाच पाहिजे. त्यावांचून सुटका नाहीं. भेटीच्या वेळीं आपल्याजवळ जिवास जीव देणारे आणि ज्यांच्या मनाची चलबिचल होणार नाहीं असे पुष्कळ लोक जवळपास ठेवावे. या दुष्ट म्लेंछांचें हें बंड फार दिवस माजून राहिलें आहे. त्याकरतां त्यांच्याशीं वागतांना अखंड सावधानता ठेवली पाहिजे. सर्व कर्ता करविता ईश्वरच आहे. आणि त्या ईश्वरानें ज्याला आपला म्हणविलें त्या पुरुषाच्या हातून कसा पराक्रम होईल हें इतरांना समजणें कठीण. '

असा या समासाच्या पूर्वार्धाचा मतलब आहे. १४ व्या ओवीपासून शेवट-पर्यंतचा उत्तरार्ध सामान्य उपदेशाचा असून तो सर्वांस उपयोगी पडण्यासारखा आहे. म्हणूनच त्याचा दासबोधांत समावेश करण्यांत आला. परंतु 'नाना वस्त्रें नाना भूषणें' येथपासून तों ' सकळकर्ता तो ईश्वरू । तेणें केला अंगिकारू ' या १३ व्या ओवी-पर्यंतचा उपदेश सामान्य स्वरूपाचा नसून त्यांत अफजलखानाचा कसा तरी निकाल लावून टाकण्याबद्दल शक्य तितक्या स्पष्ट शब्दांत उपदेश केलेला आहे.

दहा वर्षांपूर्वीं कर्नाटकांत असतांना याच अफजलखानानें शिरें येथील नाय-काला भेटीस म्हणून बोलावून विश्वासघातानें ठार केलें होतें. ही हकीकत शके १५७७त दुसऱ्यांदा कर्नाटकांत गेल्या वेळीं समर्थांनीं ऐकली असावी आणि म्हणूनच या दुष्ट विश्वासघातकी सरदाराच्या वचनावर विश्वास ठेवून बेसावध राहणें धोक्याचें आहे असा स्पष्ट इशारा समर्थांनीं शिवाजीस दिला असावा.

समर्थांच्या चरित्रग्रंथांत राजकारणी उलाढालींचा विशेष उल्लेख आलेला नाहीं. कारण समर्थांचीं कारस्थानें गुप्तपणें चालत व कोणाहि शिष्यानें त्यांची परिस्फुटता करूं नये अशी त्यांची कडक शिस्त होती. असें असूनदेखील समर्थप्रताप ग्रंथांत " आकारपूर्वक यवनास मारविलें । मग उमें केलें चाफळ क्षेत्र " या ओवींत अफजलखानाच्या शेवट समर्थांनीं करविला असें म्हटलें आहे. अफजलखानाच्या सबंध नांवाचा निर्देश न करतां त्याच्या आद्याक्षरावरून 'आकारपूर्वक' या शब्दानें त्याचें नांव सुचविलें आहे. अशी सांकेतिक नांवें लिहिण्याची इतिहासकालांत पद्धती होती.

दासबोध द. १८ समास ६ यांतला वर उल्लेखिलेला उपदेश अफजलप्रसंगालाच अनुलक्षून आहे हें सर्वजण मान्य करितात. परंतु अफजलखानाचा वध झाल्यानंतर शिवाजी समर्थांना भेटावयास आला, त्या वेळीं समर्थांनीं हा उपदेश केला असें बहुतेकांचें मत आहे. तथापि हा समास लक्षपूर्वक वाचून पाहिल्यास अफजलखानाचा फडशा पाडून विजयी होऊन भेटीकरितां आलेल्या वीराला हा उपदेश केला असेल असें म्हणवत नाहीं. कारण, त्यांत संकटाच्या वेळीं सावधपणानें वागण्याविषयीं इषारा आहे, आणि ईश्वर व तुळजाभवानी तुमचें रक्षण करील असा आशीर्वाद आहे. आणि इषारा किंवा आशीर्वाद देणें हें कोणीहि मनुष्य कार्य करावयास निघाला असतां त्या वेळीं जसा अनुरूप दिसतो तसा कार्य संपवून यश संपादन करून आलेल्याला देण्यांत औचित्य नसतें. परीक्षा पास होऊन आलेल्याला काळजीपूर्वक अभ्यास कर असा इषारा देणें किंवा ईश्वराच्या कृपेनें तूं पास होशील असा आशीर्वाद देणें हें अप्रयोजकपणाचें ठरेल. त्याचप्रमाणें या समासांतील पहिल्या १६ ओव्यांची भाषा पाहिली असतां विजयी होऊन आलेल्या वीरास तसला उपदेश करणें अप्रयोजक ठरेल; म्हणून हा उपदेश समर्थांनीं शिवाजीस अफजलप्रसंग घडण्यापूर्वींच केला असें म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें.

वरील परिच्छेदांत ठरविल्याप्रमाणें समर्थांनीं शिवाजीला अफजलच्या भेटीच्या पूर्वीं कांहीं सल्ला दिला इतकी गोष्ट सिद्ध झाल्यावर शिवाजीच्या व समर्थांच्या भेटीच्या काळासंबंधींचा वाद आपोआपच मिटतो. कारण, अफजलप्रसंगापूर्वींच जर इतका संबंध जडला होता, तर त्या उभयतांची भेट तत्पूर्वीं ५।१० वर्षें आधीं झाली असली पाहिजे हें उघड आहे. शके १५८० त शिवाजीमहाराजांनीं समर्थ कोण व कुठले असा प्रश्न केला असल्याचा पुरावा पुढें आला आहे. पण ती चौकशी केवळ त्या

शिष्याची खात्री पटवून घेण्याकरतांच असावी हें कोणीहि व्यवहारचतुर पुरुष सांगू शकेल. तसें नसतें तर केवळ एका शिष्यानें एका साधूचें नांव सांगितलें एवढ्यावरून शिवाजीनें या उत्सवाला २०० होनांचें कायमचें वर्षासन करून दिलें नसतें.

ज्या एका पत्रांत शके १५९४ चैत्र व. १ या मितीला 'राजे यांची पहिलीच भेट आहे' असा उल्लेख आहे त्याहि पत्राचा उल्लेख मागेंच केला आहे. या पत्रानें फार तर केशव गोसाव्यांस समर्थ व शिवाजी यांच्यामधील राजकारणांचा व भेटींचा सुगावा नसावा एवढेंच सिद्ध होईल. पण त्यावरून स्वतः दिवाकर गोसाव्यांनीं लिहिलेलें वाकेनिसी टिपण चुकीचें आहे असें सिद्ध होत नाहीं.

## ६. आग्र्याच्या अटकेंतून स्वदेशीं आगमन

अफजलखानाच्या वधानंतर शिवाजीच्या राजकारणांत समर्थांचा प्रत्यक्ष संबंध येण्याचा प्रसंग म्हणजे आग्र्याच्या अटकेंतून सुटून सुखरूपपणें स्वदेशाला परत येणें हा होय. यापूर्वींच्या इतर प्रसंगांत बखरीमधून थोडाबहुत तरी संबंध दर्शविणारा असा उल्लेख आढळतो. परंतु आग्र्याहून कैदेंतून सुटून रायगडला परत येईपर्यंतच्या प्रवासांत समर्थांचा किंवा त्यांच्या शिष्यांचा संबंध असल्याचा प्रत्यक्ष उल्लेख कोठेंहि आढळत नाहीं. तथापि या प्रवासांत समर्थांनीं स्थापिलेल्या मठांचा आणि समर्थांच्या शिष्यप्रशिष्यांचा बराच उपयोग झाला असला पाहिजे, असें निश्चित मानण्यास जागा आहे.

आग्र्याला जाऊन अवरंगजेबाच्या दरबारांत त्याची भेट घेण्याला निघण्यापूर्वी समर्थांचाहि सल्ला शिवाजीनें घेतला होता एवढा उल्लेख बखरींतून आढळतो. त्यापुढील सर्व कल्पना तर्कावर रचलेल्या असणार हें उघड आहे. , पण तसा तर्क करण्याला आधारहि तसाच सबळ आहे. आग्र्याला जातांना शिवाजीबरोबर जी मंडळी निघाली त्यांत उत्तर हिंदुस्थानची, विशेषतः बंगाल, बहार, ओरिसा व तेलंगण या प्रांतांची माहिती असलेले इसम शिवाजीच्या नोकरांत विरळाच आढळणार ! अशा स्थितींत एवढा २००० मैलांचा प्रवास ४ महिन्यांत आटोपून शिवाजी बिनबोभाट सुखरूपपणें परत येतो, यावरूनच त्याला कोणीतरी चांगले वाटाडे मिळाले असले पाहिजेत, आणि ज्यांचा सर्वत्र संचार आहे असे वाटाडे समर्थ-शिष्यांशिवाय त्यांस तेव्हां दुसरे कोण आढळणार ? आणि शिवाजी व त्याच्या बरोबरीची मंडळी ज्या ज्या प्रांतांतून वेष पालटून लपत छपत आली त्या त्या प्रांतांत त्यांना योग्य मार्गदर्शक असे वाटाडे आकस्मिक कसे मिळणार ? अर्थात्च आग्र्याच्या अटकेंतून

सुटतांनाच पुढील प्रवासाच्या सुरक्षिततेची कांहींतरी योजना झाली असली पाहिजे. आणि ज्या ठिकाणीं समर्थांचे मठ पूर्वींच स्थापिलेले होते तेथें त्या मठांमार्फत व जेथें मठ नसेल तेथें मुद्दाम एखादा शिष्य पाठवून त्याच्यामार्फत ही योजना करण्यांत आली असावी हें अगदीं स्वाभाविक आहे.

आग्र्यांतून निसटून शिवाजी प्रथमच मथुरेस आला. तेथें मोरोपंत पिंगळे यांचे मेहुणे राहात असल्यामुळें तेथें शिवाजीस आयताच आसरा मिळाला. पण हे मेहुणे पूर्वींपासूनच तेथें राहात होते कीं, आयत्या वेळीं ते तेथें जाऊन राहिले हें समजण्याला मार्ग नाहीं. मथुरा, अंतर्वेदी, काशी, प्रयाग, अयोध्या, वगैरे ठिकाणीं समर्थांचे मठ पूर्वींपासूनच होते. तथापि समर्थांचे जे मठ सुप्रसिद्ध असतील त्या ठिकाणीं अवरंगजेबाची चौकशी हटकून होणार यास्तव कांहीं ठिकाणीं नवेच शिष्य पाठविणें जरुरीचें भासलें असावें. यासंबंधाचे तीन चार उल्लेख समर्थप्रताप ग्रंथांत आढळतात. विश्वनाथ नामाच्या शिष्याला उत्तर पंथास समर्थांनीं मुद्दाम पाठविलें असा उल्लेख समर्थप्रताप ग्रंथांत आहे. त्याचप्रमाणें शिवराम नांवाचा एक शिष्य गुप्त सल्लामसलतींतला माहितगार व विश्वासू असा होता. त्यास जगदुद्धारणाच्या प्रसंगानें तेलंगणांत पाठविलें असाहि एक उल्लेख आहे. तेलंगणांतच असा कोणता जगदुद्धाराचा प्रसंग अडून राहिला असावा कीं, जो समर्थांच्या शिष्यांशिवाय इतर कोणाच्या हातून पार पडला नसता ? त्याचप्रमाणें विश्वासराय नांवाच्या एका शिष्यास आकाशवाणीनें वाराणसीला जाण्याची आज्ञा केली म्हणून तो वाराणसीला गेला असाहि उल्लेख समर्थप्रताप ग्रंथांत आहे. ही आकाशवाणी म्हणजे समर्थांचा गुप्त हुकूम असाच त्याचा अर्थ नसेल काय ? यादव व माधव हे दोन शिष्य प्रयागाहून नेहमीं समर्थांच्या स्नानाकरितां गंगेच्या कावडी आणीत असत व चक्रपाणी नांवाचा शिष्य कधींच एके ठिकाणीं न राहतां सर्वत्र संचार करीत असे. त्याचाहि या कामीं उपयोग होणें स्वाभाविक आहे. अशा रीतीनें कोणी आत्मस्फूर्तीनें तर कोणी समर्थांची आज्ञा म्हणून या वेळीं शिवाजीच्या उपयोगीं पडले असतील यांत कांहीं विशेष कौतुक करण्यासारखें आहे असें नाहीं. तथापि राजकारणावर सतत लक्ष असल्याविना आणि त्यांतहि अमुकच एक गोष्ट घडावी व त्याकरितां आपल्या हातून होईल तितकी मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे, असली प्रवृत्तिमार्गाची वृत्ती सतत मनांत जागृत असल्याविना एवढ्या गोष्टी देखील हातून घडत नाहींत. म्हणूनच या कामगिरीचा येथें उल्लेख केला आहे व त्यावरून शिवबाच्या हालचालींकडे समर्थांचें सतत लक्ष असे तें दिसून येतें.

शिवाजीमहाराज आग्र्याहून परत आल्यानंतर त्यांच्या जिवावर कोणताहि असला धोक्याचा प्रसंग आला नाहीं आणि त्यामुळें समर्थांच्या राजकारणविषयक खटाटोपाचा उल्लेखहि विशेष कोठें येत नाहीं. राज्याभिषेकाकरितां गागाभट्टांस पाचारण करण्यांत आलें व त्यांनीं शिवाजीस वेदोक्तमंत्रानें अभिषेक करविला. या गागाभट्टाचा समर्थांशीं कांहीं संबंध असावा पण त्याचा तसा स्पष्ट उल्लेख कोठेंहि नाहीं. सबब तो भाग आपण सोडून देऊं. पण शिवाजीस राज्याभिषेक झाल्यानंतर समर्थांनीं नवस फेडण्याकरितां अन्नदान केलें ही गोष्ट समर्थ व शिवाजी यांच्या निकट संबंधाची द्योतक आहे. शिवाजीच्या मृत्यूची वार्ता ऐकल्यानंतर समर्थांसारख्या ब्रह्मज्ञानी महंतांचीहि जी केविलवाणी अवस्था झाल्याचें समर्थप्रताप ग्रंथांत वर्णिलें आहे, त्यावरूनहि समर्थ व शिवाजी यांचा परस्परांशीं संबंध कोणत्या स्वरूपाचा असावा याचें अनुमान करितां येतें. शिवाजीच्या मृत्यूनंतर कांहीं कारणामुळें संभाजीचें चित्त भडकून जाऊन त्यानें जो नारसिंहावतार धारण केला त्या वेळीं त्याला योग्य उपदेश करून ताळ्यावर आणण्याची कामगिरीहि समर्थांनींच केली आणि त्यांचा हा उपदेश सर्वप्रसिद्धच आहे. समर्थांच्या आयुष्यांतील हेंच शेवटचें राजकारण होय.

## ७. समर्थांचा राजकारणविषयक उपदेश

शिवाजीच्या राजकारणांत समर्थांचा प्रत्यक्ष संबंध कोणकोणत्या प्रसंगीं आला तें आपण येथवर पाहिलेंच आहे. आतां ज्याचा प्रत्यक्ष एखाद्या विशिष्ट प्रसंगाशीं संबंध नाहीं, पण ज्याचा भक्तिमार्गाशींहि साक्षात् संबंध नाहीं असा समर्थांचा उपदेश कोणत्या स्वरूपाचा आहे तें पाहूं.

हरिभक्तपरायण पांगारकर यांनीं समर्थांच्या काव्यांतले निवडक वेंचे काढून समर्थ-संजीवनी पुस्तक तयार केलें आहे. त्यांत भक्तिपर, वैराग्यपर असे भाग वेगळे असून केवळ राजकारणाचा उपदेश करणारे असे वेंचे निराळे दिले आहेत. त्याशिवाय विविध विषयांवरील जे वेंचे त्यांनीं दिले आहेत त्यांतहि बऱ्याच ठिकाणीं राजकारणाचा संबंध येतो. त्यावरून समर्थांच्या उपदेशांत राजकारणाचा संबंध किती येत असे तें दिसून येतें.

समर्थांच्या ग्रंथांतून राजकारणाशीं संबंध असलेले असे जे वेंचे पांगारकरांनीं काढले आहेत ते अशाच स्वरूपाचे आहेत कीं, त्यांचा राजकारणाशीं संबंध आहे कीं नाहीं, अशी शंका देखील कोणाहि समंजस वाचकास येऊं शकणार नाहीं. अशा या गाळींव राजकारणी उपदेशांतील कांहीं मासला पहा.

शिवाजीमहाराजांच्या भेटीच्या पूर्वीं समर्थांनीं त्यांच्या भेटीची इच्छा दर्शविणारें जें पत्र लिहिलें त्यांत आरंभींच 'निश्चयाचा महामेरू। बहुत जनांसी आधारू। अशें म्हणून

कित्येक दुष्ट संहारिले । कित्येकास धाक सुटले ।
कित्येकांस आश्रय झाले । शिवकल्याण राजा ॥

अशी शिवरायाची स्तुति केली आहे आणि शिवाजीच्या पराक्रमाचा प्रोत्साहनपर गुणगौरव केला आहे. केवळ भक्तिमार्गी संताला, शिवाजीनें किती दुष्टांचा संहार केला, याची उठाठेव कशास हवी होती ? याचक याचना करण्याकरितां यजमानाकडे गेला असतां त्याची वाटेल ती स्तुति करितो, तशांतलाच हा प्रकार असावा, असें म्हणावें तर स्वतः करितां कांहींहि न मागतां धर्मस्थापनेची कीर्ती संभाळली पाहिजे अशी सूचना देऊन शिवाजीच्या कीर्तीचीच समर्थांनीं अधिक काळजी दर्शविली आहे. शिवाजीनें राजकारण अंगाबाहेर टाकल्यास त्याच्या कीर्तीचा लोप होईल अशी धास्ती वाटल्यामुळें समर्थांनीं मुद्दाम इषारत देऊन सांगितलें आहे कीं, राजकारणाचा उदंड कार्यभाग अडून राहिला आहे, तें पाहून असमाधान वाटत आहे, एवढ्याकरितांच हें पत्र लिहिण्यांत येत आहे; यांत मीं जर अतिप्रसंग केला असेल तर मला क्षमा करावी.

यापुढें एका प्रकरणांत राजधर्माचा उपदेश केला असून त्यांत केवळ राजकीय गोष्टींचाच ऊहापोह आहे.

अमर्याद फितवेखोर । यांचा करावा संहार ।
शोधिला पाहिजे विचार । यथातथ्य ॥

हा उपदेश करण्याचा भक्तिमार्गी संताला अधिकार तरी काय व जरूरी तरी काय आणि हा उपदेश शिवाजीच्या राज्याची स्थिरस्थावरता झाल्यावर केला का कार्यारंभींच केला ? तसेंच

धुरेनें युद्धासि जाणें । अशी नव्हेत कीं राजकारणें ।
धुराच करोनि सोडणें । कित्येकलोक ॥
उदंड मुंडे असावीं । सर्वहि एक न करावीं ॥
वेगळालीं कामें घ्यावीं । सावधपणें ॥
तुरंग शस्त्र आणि स्वार । पहिला पहावा विचार ॥
निवडूं जातां थोरथोर । शत्रु पळतीं ॥

यांत घोडे, शस्त्रसामग्री व स्वार यांची संपादणी सर्वांचें आधीं करा, म्हणजे मग मोठमोठाल्या शत्रूंचा देखील थरकांप होईल असा हा उपदेश शिवाजीच्या कारकीर्दीच्या आरंभीं सुसंगत दिसतो का राज्याभिषेकाच्या वेळीं शोभतो ?

क्षात्रधर्माच्या उपदेशांतील पुढील निवडक वेचे पहा.

नजर करारी राखणें । कार्य पाहुनि खतल करणें ॥
तेणें रणशूरांचीं अंतःकरणें । चकित होतीं ॥

देवद्रोही तितुके कुत्ते । मारोनि घालावे परते ॥
देवदास पावती फत्ते । यदर्थी संशय नाहीं ।।
विवेक विचार सावधपणें । दीर्घ प्रयत्न केलाचि करणें ॥
तुळजावराचेनि गुणें । रामें रावण मारिला ॥
अहो हे तुळजाभवानी । प्रसिद्ध रामवरदायिनी ॥
रामदास ध्यातो मनीं । यन्निमत्त ॥

ह्यांत रामानें रावण मारिला याची आठवण करून देण्यांत कोणता हेतु असावा बरें ! आणि अशा रामवरदायिनीचें समर्थ जें ध्यान करीत तें कोणत्या हेतूनें करीत असत बरें ? रामानें रावण मारिला त्याचप्रमाणें शिवाजीचे हातू नहि धर्मद्रोही दैत्यांचा वध व्हावा याच निमित्तानें मी रामवरादायिनीचें ध्यान करितों असें स्वत: समर्थ सांगतात. असें ध्यान ते काय आपल्या वयाच्या ६४ वे वर्षी करूं लागले ! शिवाजीचें राज्य निष्कंटक झाल्यानंतर अशी आराधना आवश्यक व सयुक्तिक तरी दिसते काय ?

पण याच्याहिपेक्षां अधिक स्पष्ट असें वचन पाहिजे असल्यास पुढील ओव्या पहा.

मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥
येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥
मरण हांक तो चुकेना । देह वाचवितां वाचेना ।।
विवेकीं होऊनि समजाना । काय करावें ॥
भले कुळवंत म्हणावे । तेही वेगीं हजीर व्हावे ।।
हजीर न होतां कष्टावें । लागेल पुढें ॥

यांत तर सर्व मराठ्यांनीं आपलें संघटन करून शत्रूवर तुटून पडावें, मरणाची भीति धरूं नये, कारण मरण कोणासच चुकत नाहीं आणि जे खरे कुळवंत क्षात्रिय असतील त्यांनीं क्षात्रधर्म दाखविण्याची हीच वेळ आहे आणि यावेळीं जर तुम्ही माघार घ्याल, क्षात्रधर्माप्रमाणें लढण्याला पुढें येणार नाहीं, तर मग पुढें तुम्हास त्याचें प्रायश्चित भोगावें लागेल. असा जो हा उपदेश आहे तो काय शिवाजीच्या सैन्यांत लक्षावधी पायदळ, सहस्रावधि घोडदळ जमल्यानंतरचा आहे; या ओव्यांचें महत्व महायुद्धाचे वेळीं इंग्रजसरकारच्या देखील लक्षांत आलें व सरकारनें प्रोत्साहन-पर असा हा उपदेश सर्वत्र प्रसिद्ध केला आणि त्याच्या जोरावर हजारों मराठे रण-भूमीवर पाठविण्याला तयार केले ! हल्लींच्या मृतावस्थेंत देखील जर या ओव्यांत इतकें सामर्थ्य भरलें आहे, तर शिवाजीच्या वेळच्या जिवंत समाजावर प्रत्यक्ष सम-

र्थांच्या किंवा त्यांच्या शेंकडों शिष्यांच्या तोंडून हा दिव्य उपदेश ऐकून केवढा परिणाम झाला असेल बरें ? आणि तुम्ही जर या वेळीं युद्धाला न याल तर मागाहून तुम्हाला भलतेच कष्ट सोसावे लागतील असली इशारत शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या प्रारंभीं शोभते का राज्याभिषेकाच्या वेळीं शोभते ? आणि ज्या शिवाजीची प्रत्यक्ष भेट एकदांहि झाली नसेल अशल्या शिवाजीकरितां समर्थांनीं इतका हा अट्टाहास चालविला असेल अशी कल्पना करणें हास्यास्पद नाहीं काय ?

राजधर्माचा व क्षात्रधर्माचा जसा उपदेश समर्थांनीं केला आहे, तसाच सेवकधर्माचाहि उपदेश त्यांनीं केला आहे. पण, राजधर्माच्या किंवा क्षत्रियधर्माच्या उपदेशांत ज्याप्रमाणें विशिष्ट व्यक्तीचा अथवा विशिष्ट प्रसंगाचा संबंध दिसून येतो तसा सेवकधर्मांत दिसून येत नाहीं; याचें कारण एवढेंच कीं, सेवकांना उपदेश कोणीहि केव्हांहि केला तरी त्याचें सामान्य स्वरूप एकच प्रकारचें असणार.

राजकारणविषयक उपदेशांत ' **आनंदवनभुवन** ' प्रकरण इतकें बहारीचें आहे कीं, समर्थांनीं तेवढें एकच प्रकरण लिहलें असतें तरी त्यांचा राजकारणाशीं असलेला निकट संबंध तेवढ्यानें देखील सिद्ध झाला असता. पण ज्यांना त्यांतलें रहस्यच कळलें नाहीं त्यांना आनंदवनभुवन तरी काय करूं शकेल ? या प्रकरणांत समर्थांच्या आयुष्यक्रमाची इतिकर्तव्यता संपल्याचें वर्णन आहे. आनंदवनभुवनांत आपण कोणत्या हेतूनें येऊन राहिलों आणि तो हेतु आतां कसा पूर्ण झाला आहे याचें त्यांनीं फारच बहारीचें वर्णन केलें आहे. समर्थ म्हणतात ' मी येथें येऊन राहण्याला खुषी नव्हतों, पण देवानें युक्त्याप्रयुक्त्या करून मला येथें पाठवून दिलें; तथापि एवढें खरें कीं, आनंदवनभुवनांत येऊन राहिल्यावर जें जें घडून येईल असें मला स्वप्नांत दाखविण्यांत आलें होतें तें तें तसेंच घडून आलें.

एथून वाढला धर्म । रमा धर्मसमागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभूवनीं ॥
बुडाला अवरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला ।
मोडलीं मांडलीं क्षेत्रें । आनंदवनभूवनीं ॥
उदंड जाहलें पाणी । स्नान संध्या करावया ।
जपतप अनुष्ठानें । आनंदवनभूवनीं ॥
बंड पाषांड उडालें । शुद्ध अध्यात्म वाढलें ।
रामकर्ता रामभोक्ता । आनंदवनभूवनीं ॥
उदंड ठेविलीं नामें । आपस्तुतीच मांडिली ।
ऐसें हें बोलणें नाहीं । आनंदवनभूवनीं ॥

या वर्णनावरून समर्थांना कोणती कामगिरी करावयाची होती व ती पूर्ण झाल्यामुळें त्यांना आपण कृतकार्य झालों असें कसें वाटूं लागलें होतें, हें निर्विवाद सिद्ध होत आहे.

अशा रीतीनें आनंदवनभुवनांतील पूर्वी म्लेंच्छांनीं उध्वस्त केलेलीं क्षेत्रें पुन्हा डौलानें उभारलेलीं पाहून समर्थांना धन्यता वाटली, आपल्या जिवाचें सार्थक झालेंसें वाटलें आणि निर्वेधपणें स्नानसंध्या व तपपुरःश्चरण करीत बसण्याला हरकत नाहीं असे आनंदाचे उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडले. याचा अर्थ समर्थांनीं आपल्या सर्व आयुष्यांत स्नान, संध्या व पुरश्चरण यांखेरीज अन्य कांहीं केलें नाहीं असाच ज्यांना समजावयाचा असेल त्यांनीं खुशाल समजावा !

रामदासांच्या इतर कवितांतून जसा राजकारणाचा बोध आढळतो त्याहून अधिक दासबोधांत आढळतो. मात्र या दोहोंत फरक एवढाच कीं, इतर प्रकरणें मुद्दाम विशिष्ट प्रसंगानेंच लिहिलेलीं असल्यामुळें त्यांत जसा विशिष्ट व्यक्तीस अनुसरून केलेला बोध आढळतो, तसें दासबोधांतील उपदेशाचें स्वरूप नसून त्या उपदेशाला सर्वसामान्य उपदेशाचें स्वरूप देण्यांत आलें आहे. उदाहरणार्थ—शिवाजीला अफजलप्रसंगीं केलेल्या उपदेशाचीच थोडीशी छाटाछाट करून आणि त्यांतील विशेषनामाच्या जागीं सामान्यनामें घालून व सामान्य उपदेशाच्या कांहीं ओव्या शेवटीं जोडून उत्तम-पुरुष-लक्षण नांवाचा एक समास बनविला आहे. असाच प्रकार ११ व्या दशकांतील शिकवणनिरूपण, राजकारण, महंतलक्षण व निस्पृहवर्तणूक, १९ वे दशकांतील राजकारण, उपाधीलक्षण, यत्ननिरूपण, १८ व्या दशकांतील निस्पृहशिकवण, करंटपरीक्षा, १५ व्या दशकांतील चातुर्यलक्षण, निस्पृहव्यापलक्षण इत्यादि ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतो.

## ८. समर्थांच्या राजकारणी उपदेशाची दिशा

समर्थांचा सर्वसामान्य उपदेश पाहिला तर तो अत्यंत व्यावहारिक असाच आढळून येतो. पुरुषार्थ-प्राप्ति हें हिंदुधर्माचें सर्वमान्य ध्येय असल्यानें ज्याला व्यापक उपदेश करावयाचा आहे, त्याला धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांतून प्रत्येक पुरुषार्थाचें विवेचन करावें लागतें. त्याप्रमाणें समर्थांच्या ग्रंथांतहि मोक्षप्राप्तीच्या साधनाचा ऊहापोह व तत्संबंधींचा सगळा वेदांत भरलेलाच आहे. कोणीहि हिंदुधर्मांतील साधुपुरुष हा वेदांत आपल्या सांप्रदायिक ग्रंथांतून टाळूं शकत नाहीं; तेव्हां समर्थांच्या ग्रंथांत वेदांताचें प्रतिपादन आलेलें पाहून व त्याकडे बोट दाखवून समर्थहि इतर साधुसंतांप्रमाणेंच वेदांताचा उपदेश करणारे निवृत्तिवादी साधु होते असें म्हणण्यांत

कांहीं हांशील नाहीं. वेदांताला सोडून हिंदुधर्मांतला कोणताहि सनातन सांप्रदाय टिकूंच शकत नाहीं. त्याचप्रमाणें मोक्षसाधनाचे मार्ग म्हणून ज्ञान, कर्म व उपासना या तिहींचाहि समावेश प्रत्येक साधूस आपल्या उपदेशांत करावाच लागतो. त्यांतूनहि कर्मयोगाचा उपदेश वगळल्यास चालेल, पण ज्ञान आणि भक्ति यांविषयींचा उपदेश वगळून चालवयाचेंच नाहीं. अशी त्या वेळची स्थिति होती. भगवंतांनीं अर्जुनास कर्मयोगाचा उपदेश करण्याकरितां राजर्षींनीं सांगितलेला पुरातन योग सांगितला पण त्यांत देखील संन्यासमार्ग व भक्तिमार्ग त्यांना टाळतां आला नाहीं; मग ज्ञानदेवापासून तुकारामापर्यंत ज्या महाराष्ट्रांत भक्तिमार्गाचा कडेलोट होऊन गेला होता, त्या महाराष्ट्रांत आपल्या सांप्रदायाची उभारणी करतांना समर्थांना तरी भक्तिमार्गाचा उपदेश कसा टाळतां आला असता ? त्यांतूनहि खरा कर्मयोग हा इतर मार्गांप्रमाणें एकांगी नसून तो ज्ञानप्रधान व भक्तियुक्त असा असल्यामुळें कर्मयोगाचा उपदेशक ज्ञान व भक्ति यांना टाळा देऊंच शकत नाहीं. म्हणूनच समर्थांनींहि आपल्या सांप्रदायाचें लक्षण सांगतांना ' मुख्य हरिकथा निरूपण ' असें लक्षण सांगितलें. पण त्याबरोबरच ' दुसरें तें राजकारण ' हेंहि लक्षण त्यांनींच ठासून सांगून ठेविलें.

रामदासांच्या ग्रंथांत व त्यांच्या उपदेशांत भक्तिमार्गाचा समावेश कां झाला व त्यांच्या भक्तिमार्गाचें स्वरूप कोणतें याचा येथवर विचार झाला. आतां त्यांनीं तत्कालीन परिस्थितीस अनुसरून प्रत्यक्ष राजकारणाचा उपदेश कोणत्या स्वरूपाचा केला तें पाहूं. राज्यक्रांतीसारख्या घडामोडीच्या वेळीं किंवा राजक्रांतीच्या पूर्वतयारीच्या वेळीं मतपरिवर्तनाला विशेष महत्त्व येतें. मतपरिवर्तन हेंच राज्यक्रांतीचें बीज आहे. समाज तोच असतो, त्यांतील व्यक्तीचें बुद्धिसामर्थ्य व शरीरसामर्थ्यहि पूर्वीसारखेंच असतें. असें असून जी गोष्ट त्या समाजाच्या हातून पूर्वी होऊं शकली नसती ती विशिष्टमतपरिवर्तनानंतर होऊं शकते. अर्थातच समाजाचा दृष्टिकोन बदलला कीं, त्याच्या कृतींत व सामर्थ्यांत कल्पनातीत अंतर पडतें. यास्तव कोणत्याहि क्रांतीच्या वेळीं समाजाच्या विचारसरणीला वळण लावण्याचें कार्य समाजाचे पुढारी करीत असतात. अशा रीतीनें समाजाचा दृष्टीकोन बदलणें व त्या समाजास आत्मप्रत्ययपूर्वक आत्मस्वरूपाची जाणीव करून देणें हें राजकारणाचें एक प्रमुख अंग आहे. पराक्रमी पुरुषाच्या पराक्रमामुळें जनतेला आत्मसामर्थ्याची जाणीव येऊं शकते खरी; पण अशी जाणीव होण्याला कालावधि फार लागतो आणि मग त्या जाणिवेला महत्त्वहि राहिलेलें नसतें. परंतु पराक्रमी पुरुषाचा अद्‌भूत पराक्रम दृष्टीस पडण्यापूर्वींच त्याच्याविषयीं समाजांत आदरबुद्धि उत्पन्न करून त्याला साहाय्यकर्ते मिळवून देणें हें राजक्रांतीच्या प्रारंभीं तरी बरेंच कठीण काम

असतें. पण समर्थांसारख्यासत्पुरुषांच्या व त्यांच्या तालमींत तयार झालेल्या महंतांच्या हातून हें कार्य इतरांच्या पेक्षां सहज लीलेनें होऊं शकतें आणि हें कार्य समर्थांनीं व त्यांच्य महंतांनीं योग्य वेळीं केलें.

समाजांत मतपरिवर्तन करणें हें सगळ्या राजकार्यांचें बीज आहे. आधीं कल्पना आणि मग कृति. कल्पना आणि कृति यांच्या दरम्यान शक्याशक्यतेचा विचारहि करावा लागतो. पण जेथें मुळांत कल्पनाच नाहीं किंवा विपरीत कल्पना दृढमूल होऊन बसली आहे तेथें नव्या कल्पनेचें बीजारोपण करणेंच दुर्घट होऊन बसतें. मुसलमान हेच देशाचे कायदेशीर राजे, ईश्वर त्यांना साह्य असल्यामुळें त्यांची सत्ता येथें प्रस्थापित झालेली आहे आणि त्यांच्या अचाट सामर्थ्यापुढें आपली धडपड व्यर्थ होय, कलियुगाचा हा कालमहिमाच असल्यानें आपल्या हातून राज्यस्थापना होऊं शकणार नाहीं, आपण मुसलमानांचे ताबेदार असल्यामुळें त्यांच्या विरुद्ध हात उचलणें हें राजनिष्ठेविरुद्ध घोर पातक होय, आपणांस मुसलमानी बादशहांकडून इनाम मिळालें असल्यामुळें बादशहाविरुद्ध कारस्थान करणें म्हणजे बेइमानीपणा होय इत्यादि घातुक कल्पना त्यावेळीं समाजांत इतक्या बद्धमूल झाल्या होत्या कीं, त्यांचें समूळ उच्चाटन करून त्यांच्या जागीं देशाभिमानाला व धर्माभिमानाला समुचित अशा स्फूर्तिदायक कल्पनांची प्रतिष्ठापना करणें जवळजवळ अशक्य वाटत होतें. आणि म्हणूनच बहुतेकांची प्रवृत्ति प्राप्तपरिस्थितींत समाधान मानून व त्यांतल्या त्यांत धर्माचें जेवढें संरक्षण करितां येईल तेवढें करून काळ कंठावयाचा अशीच असे. समर्थांच्या वाङ्मयांतच याविरुद्ध विचारसरणी प्रथमच दिसून येते. धर्म बुडत चालला आणि देशाची धुळधाण होत चालली; या दोहोंचें रक्षण करणें हें ब्राह्मण व क्षत्रिय यांचें आद्य कर्तव्य होय व तें कर्तव्य करणारास समर्थ रामचंद्रप्रभु आणि रामवरदायिनी तुळजामाता यांचें साहाय्य झाल्याशिवाय राहणार नाहीं. किंबहुना त्यांची तशी आज्ञाच आहे व ती पार पाडण्याकरितां आपण चळवळ केली पाहिजे, असा उपदेश समर्थांनीं केला. त्यांत शहाजीचा पुत्र शिवाजी यानें चालविलेलें राजकारण पाहून हाच ईश्वरी अवतार आहे आणि याच्या हातून धर्मसंरक्षण आणि हिंदवी स्वराज्याची स्थापना होईल. यास्तव अशा या शिवाजीस साहाय्य करा असेंहि त्यांनीं सेवकधर्माच्या उपदेशाच्या द्वारें जनतेस सांगितलें. आपण या देशांतील मूळ रहिवाशी, अर्थात् मालक, आणि म्लेंच्छ हे बिगरहक्कानें येथें येऊन तलवारीच्या जोरावर राज्य करीत आहेत म्हणून त्यांचें राज्य हें खऱ्या धर्माविरुद्ध व न्यायाविरुद्ध बंडच होय आणि या दुर्जन म्लेंच्छांचें बहुत दिवसांचें माजलेलें बंड मोडून काढण्यांत आपण ईश्वरी कार्य करीत आहों, ही कल्पना त्यांनीं प्रसृत

केल्यामुळें बंडखोरीची, बेइमानपणाची, निमकहरामपणाची वाटणारी मलतीच भीति दूर होऊन महाराष्ट्रीय जनतेला आपला कर्तव्यमार्ग स्पष्ट दिसूं लागला. समर्थांच्या राजकारणाची मुख्य व प्रारंभींची दिशा ही या प्रकारची होती; आणि ही कल्पना समाजांत प्रसृत होऊन मूळ धरूं लागल्यावर तिच्या अनुषंगानें इतर कल्पना पुढें आल्या व त्यांनीं शिवाजीच्या राजकारणांत प्रत्यक्ष साहाय्यहि केलें.

### ९. रामदासी सांप्रदायाचें वैशिष्ट्य कां टिकलें नाहीं ?

समर्थांचा राजकारणाशीं कांहीं संबंध नव्हता असें ठरविण्याची अशक्यता स्वतःच्याच मनास पटूं लागल्यामुळें दुराग्रहानें पछाडिलेल्या कित्येक आक्षेपकांनीं समर्थांचें वैशिष्ट्य नष्ट करण्याकरितां दुसरेंच एक अजब तर्कट लढविलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, रामदासी सांप्रदाय हा जर राजकारणाकरितां स्थापन झाला होता तर त्या सांप्रदायांत समर्थांच्या पश्चात् तें कोठेंच आढळत नाहीं ? समर्थांच्या शिष्यांची व प्रशिष्यांची परंपरा पाहिली असतां तींत कोठेंहि राजकारणाचा सुगावा लागत नाहीं आणि म्हणून स्वतः समर्थांनींहि कांहींच राजकारण केलें नाहीं ! आक्षेपकांची ही तर्कपद्धती व हें इतिहासाचें अज्ञान हास्यास्पद आहे. कोणत्या-हि व्यक्तीचें मोठेपण त्याच्या सांप्रदायांतील व्यक्तींच्या बऱ्यावाईट वर्तणुकीवरून ठरविणें अनुचित होय. शिवाजीच्या पश्चात् त्याच्या वंशजांनीं सगळें राज्य घालविलें म्हणून शिवाजीनें राज्यस्थापना केलीच नाहीं असें ठरेल काय ? जेथें एखादें विशिष्ट कार्य परंपरेनें यावच्चंद्रदिवाकरौ चालावें अशा स्वरूपाचें असतें तेथें त्या सांप्रदायाचा इतिहास शोधण्यांत थोडें तरी स्वारस्य असतें पण जेथें प्रासंगिक प्रातकार्यांच्या सिद्धीसाठीं एखादी अचाट कामगिरी करावयाची असते तेथें त्या काम-गिरीच्या सिद्धीबरोबरच कार्यप्रवर्तक हेतूचाहि नाश होतो. समर्थांची कामगिरी एका दृष्टीनें अशाच स्वरूपाची होती. म्लेंच्छांची सत्ता झुगारून देऊन हिंदवी स्वराज्याची स्थापना करणें आणि धर्मकारणांत मुसलमानाच्या जुलमांतून हिंदुधर्माची सुटका करून वर्णाश्रमधर्माचा पुनरुद्धार करणें अशा दुहेरी हेतूनें समर्थांनीं आपला सांप्रदाय स्थापिला व वाढविला. पण यांतील पहिलें कार्य शिवाजीच्या राज्याभिषेकानें सिद्धीस गेलें. अर्थातच त्या नंतर समर्थांना प्रत्यक्ष राजकारणांत लक्ष घालण्याचें तादृश कारणच राहिलें नाहीं. शिवाजीचा उदय होण्यापूर्वी महाराष्ट्रांत जें नैराश्य पसरलें होतें तें दूर करून मराठ्यांच्या मनांत महत्वाकांक्षा उद्दीपित करणें आणि शिवाजीसारख्या अव-तारी पुरुषास सर्वांनीं साहाय्य केल्यास स्वधर्म व स्वराज्य यांची स्थापना होऊं शकेल असा विश्वास जनतेंत निर्माण करणें व या हेतूला पोषक असा धर्माभिमान व देशा-

भिमान महाराष्ट्रीयांत जागृत करणें हें समर्थांचें कार्य होतें. तें कार्य सिद्ध झाल्यानें त्यांचें राजकारण संपलें.

समर्थांच्या सांप्रदायांतहि राजकारणाला अग्रपूजेचा मान नसून हरिकथा निरूपणाला पहिला मान होता व राजकारण हें पारीस्थितिप्राप्त असें मुद्दाम आपल्या शिरावर घेतलेलें कर्तव्य होतें. त्या कर्तव्याची पूर्तता होतांच 'मुख्य हरिकथा निरूपण' तेवढें शिल्लक राहावें, आणि 'दुसरें तें राजकारण' बंद पडावें हें स्वाभाविक व उचित होय.

## एकंदर निबंधाचा निष्कर्ष

१. समर्थांना त्यांच्या वयाच्या ८ वे वर्षीं रामचंद्राचा अनुग्रह झाला. त्या वेळेपासून त्यांना आपल्या धर्माची, देशाची व समाजाची काळजी वाटूं लागली व धर्मरक्षणासाठीं प्रयत्न करण्याची त्यांना स्फूर्ती झाली.

२. वयाला १२ वर्षें पूर्ण होण्यापूर्वींच समर्थांनीं संसारांत गुरफटून न राहतां आजन्म बालब्रह्मचारी राहून धर्मरक्षण करण्याचा निश्चय केला व तप:सामर्थ्य संपादण्याकरितां टाकळीस जाऊन त्यांनीं पुरश्चरणास सुरुवात केली.

३. हें पुरश्चरण चालू असतांनाच राहिलेल्या वेळांत त्यांनीं आपलें अध्ययन व ग्रंथावलोकन चालू ठेवलें.

४. पुरश्चरणाचें नववें वर्ष पूर्ण होऊन सुमारें १० कोटि मंत्रजप झाल्यावर शिवाजीमहाराजांचा शिवनेरीस अवतार झाला.

५. शके १५५३ मध्यें शहाजीची स्वारी नाशीक व त्रिंबक या प्रांतांत होती. त्या वेळीं समर्थ यांची शहाजीशीं भेट झाली असण्याचा संभव आहे. कारण त्या वेळीं समर्थांच्या तप:प्रभावाची ख्याती सर्वत्र पसरली होती.

६. शके १५५४ पासून समर्थांनीं तीर्थाटनास सुरुवात केली व त्याच वेळीं त्यांनीं सर्व ठिकाणची देशस्थिती अवलोकन केली.

७. उत्तर हिंदुस्थानांतलें तीर्थाटन आटोपून शके १५६३ चे सुमारास समर्थ दक्षिण हिंदुस्थानांत तीर्थाटन करीत होते. त्या वेळीं शहाजीहि दक्षिणेंत बंगलोर प्रांतांत होता. त्या वेळीं समर्थ व शहाजी यांची पुन्हां भेट झाली असावी, आणि या भेटींतच समर्थांनी कृष्णातीरीं मसूरनजीक राहून रामोपासनेचा सांप्रदाय स्थापण्याचें ठरविलें असावें.

८. शके १५६७त मसुरास पहिला रामनवमीचा उत्सव झाला. शके १५७० पासूनचे उत्सव चाफळास होऊं लागले.

९. शके १५६७ पासून १५७१ पर्यंतच्या ४ वर्षांत समर्थांनीं वाई ते कोल्हापूर या भागांत ११ मारुतींची स्थापना केली. विजापूरच्या दरबारांत व इतरत्रहि अनेक शिष्य केले, व सर्वत्र आपली छाप पाडिली.

१०. शके १५७१ त शहाजीराजे यांस अटक झाल्यानंतर समर्थांनीं शिवाजीस भेटीविषयीं पत्र लिहिलें आणि शके १५७१ वै. शु. ९ गुरुवार रोजीं शिवाजीस अनुग्रह दिला.

११. शके १५७६ त किंवा कदाचित् तत्पूर्वींहि समर्थ हेळवाकच्या घळींत जाऊन राहिले व १० वर्षेपर्यंत ग्रंथलेखन करणार आहों असें त्यांनीं जाहीर केलें!

१२. शके १५७७ च्या वै. शु. २ स शिवाजीनें समर्थांच्या झोळींत राज्याची सनद टाकली. त्यानंतर समर्थ दक्षिणेंत तंजावरकडे गेले, व तेथें व्यंकोजीराजे यांस त्यांनीं अनुग्रह दिला. त्या वेळीं पुन्हां शहाजी व समर्थ यांची भेट झाली असावी. या भेटीनंतर थोड्याच दिवसांत शिवाजीनें चंद्रराव मोऱ्याचें कारस्थान करून त्याचा कांटा काढून टाकिला.

१३. शके १५८१ मध्यें अफजलप्रसंगीं शिवाजीस केलेला उपदेश दासबोधांत द. १८ स. ६ यांत नमूद आहे.

१४. शके १५८१ पासून चाफळच्या उत्सवास दरसाल २०० होन शिवाजी महाराजांकडून मिळूं लागले.

१५. शके १५८८ मध्यें शिवाजीराजे आग्र्यास अटकेंत पडले असतां तेथून गुप्त वेषानें सुटून येतांना उत्तर हिंदुस्थानांतील आणि ओरिसा, तेलंगण वगैरे प्रांतांतील समर्थांच्या मठांचा व शिष्यांचा त्यांना चांगला उपयोग झाला असावा.

१६. शके १५९४ च्या चैत्र वद्यांत पन्हाळगडानजीक पारगांवास समर्थांची व शिवाजीची पुन्हां भेट झाली व शिवाजीस परमार्थ-प्राप्ती झाली. याच वर्षाच्या अखेरीस मराठ्यांनीं पन्हाळगड किल्ला परत घेतला.

१६. शके १५९६ मध्यें समर्थांनीं गागाभट्टाकरवीं शिवाजीस राज्याभिषेक करविला, आणि त्या नंतर थोडेच दिवसांनीं ते हेळवाकची घळी कायमची सोडून चाफळ व परळी इकडे राहावयास आले.

१८. शके १६०२ मध्यें शिवाजीच्या अवतारसमाप्तीनंतर समर्थांनीं संभाजीस राजकारणाचा उपदेश केला, आणि पुढें लवकरच समर्थांनीं स्वतःची अवतारसमाप्ती केली.

---

# छत्रपति शिवाजीमहाराज का जन्मदिन

## ( लेखक—गौरीशंकर हीराचंद ओझा—अजमेर )

जैसे यूरोप में दो हजार या उसे भी अधिक वर्ष पूर्व होनेवाले प्रसिद्ध पुरुषों के जन्मदिन निश्चित मिलते हैं, वैसे हमारे यहाँ के तीन सौ वर्ष पूर्व होनेवाले बडे बडे राजाओं, प्रसिद्ध वीरपुरुषों, विद्वानों तथा धनाढयों आदि के भी जन्मदिन निश्चित रूपसे नहीं मिलते, जिसका कारण यह है कि, हमारे यहाँ इतिहास लिखने की परिपाटी जैसी चाहिये वैसी नहीं थी। इसी से हमारे यहाँ के महापुरुषों के जन्मदिन ठीक ठीक निश्चय करना बहुत कठिन काम हो गया है। हिन्दू जातिके गौरव के स्तंभ, अद्वितीय वीर एवं हिन्दु .धर्म्म के रक्षक प्रतापी छत्रपति शिवाजीमहाराज का शुद्ध जन्मदिन अभी तक संशय-युक्तही है। मुसल्मानों के इस देश में आने के पश्चात् हमारे यहाँ भी इतिहास लिखने का यत्न कुछ कुछ किया गया हो ऐसा अनुमान होता है। ऐसे ऐतिहासिक ग्रन्थों को महाराष्ट्र में 'बखर' और राजपुताना आदि में 'ख्यात' कहते हैं। शिवाजीमहाराज के संबन्ध रखनेवाली अनेक बखरें मिली हैं और उनमें जन्मदिन के विषयमें जो कुछ लिखा है वह परस्पर नहीं मिलता।

( १-२ )—सबसे पहली बखर अनंत कृष्णाजी सभासद ने शक-संवत् १६१६ ( वि० सं० १७५१ ) के आसपास लिखी, जिसको चित्रगुप्त नामक लेखक ने पीछे से परिवर्द्धित किया। इन दोनों में तो शिवाजी के जन्म के संवत्, मास, पक्ष, तिथि आदि का कुछ भी उल्लेख नहीं है।

( ३ )—प्रोफेसर फॉरेस्ट की प्रकाशित रायरीवाली बखर के प्रारंभ में शिवाजी का जन्म शक सं० १५४८ ( वि० सं० १६८३ ) में होना बतलाया है; परंतु उसी के अन्त में शक-संवत् १५४९ (वि० सं० १६८४) के बैशाख में जन्म होना भी लिखा है। प्रसिद्ध इतिहास-संशोधक स्वर्गवासी श्रीयुत राजवाडे महाशय के संग्रह की उसी बखर की हस्तलिखित प्रति में उनका जन्म शक संवत् १५४८ (वि. सं. १६८३) क्षयनाम संवत्सर, बैशाख सुदि ५, चन्द्रवार को होना लिखा है। परन्तु उक्त संवत् में बैशाख शुक्ला ५ को चन्द्रवार नहीं, किन्तु गुरुवार था, इस लिये उक्त बखर में दिया हुआ शिवाजी का जन्मदिन भी विश्वासयोग्य नहीं कहा जा सकता।

(४)—मल्हारराव रामराव चिटनवीस की बखर में उनका जन्म शक सं. १५४९ (वि. सं. १६८४), प्रभवनाम संवत्सर, बैशाख सुदि २, गुरुवार को होना, और ६ उच्च ग्रह होना बतलाया है, परंतु उक्त तिथि को गुरुवार नहीं, किंतु शनिवार था, और न उस दिन ६ उच्च ग्रह होने की संभावना थी। अतएव उक्त बखर का कथन भी संतोषजनक नहीं कहा जा सकता।

(५)—बडोदेसे प्रकाशित 'शिवदिग्विजय' नामक पुस्तक में शिवाजी का जन्म शक-संवत् १५४९ (वि. सं. १६८४) प्रभवनाम संवत्सर, बैशाख शुक्ला २, गुरुवार रोहिणी में होना माना है। परंतु उक्त तिथि को गुरुवार तथा रोहिणी नक्षत्र नहीं, किंतु शनिवार और भरणि नक्षत्र था। अत एव इसपर भी विश्वास नहीं किया जा सकता।

(६)—बडोदे की छपी हुई 'शिवप्रताप' नामक पुस्तक में शिवाजी का जन्म शक सं. १५४९ (वि. सं. १६८४) रक्ताक्षीनाम संवत्सर में होना माना है। परंतु दक्षिणी बार्हस्पत्य गणना के अनुसार शकसंवत् १५४९ (वि. सं. १६८४) का नाम रक्ताक्षी नहीं, किंतु प्रभव था। रक्ताक्षी नाम तो शक-संवत १५४६ (वि. सं. १६८१) का था। इस लिये यह कथन भी माननीय नहीं।

(७)—काव्येतिहास में प्रकाशित 'मराठी साम्राज्याची छोटी बखर' नामक पुस्तक में शिवाजी का जन्म शक-संवत् १५४९ (वि. सं. १६८४ क्षयनाम संवत्सर, बैशाख सुदि ५, सोमवार को होना लिखा है। परंतु शक सं. १५४९ (वि.सं.१६८४) का नाम क्षय नहीं, किंतु प्रभव था। अतएव इस के कथन को भी उपर्युक्त कथनों के समान समझना चाहिये।

(८)—'भारतवर्ष' नामक मराठी पुस्तक में शिवाजी की ९१ कलमों (विषयों) वाली एक बखर छपी है। उस की १५ वी कलम में शिवाजी का जन्म शक सं. १५४९ * (वि. सं. १६८४), क्षयनाम संवत्सर, बैशाख सुदि ५, चन्द्रवार को होना बतलाया है, जो संख्या ७ के समान ही है।

(९-१०)—भारतवर्ष नामक पुस्तक में प्रकाशित 'छत्रपतीची वंशावलीबद्ध यादी' में शक-सं. १५४९ (वि. सं. १६८४) बैशाख सुदि ५ को, और उसी में न्यायशास्त्री पंडितराव की जो बखर छपी है, उस में

* छपी हुई पुस्तक में १५५९ छपा है; जो प्रेसकी भूल होनी चाहिये।

शक-सं. १५४९ ( वि.सं.१६८४) प्रभव संवत्सर में उनका जन्म होना माना है। पहली 'यादी'में वार नहीं दिया, और दूसरी में मास, पक्ष, तिथि और वार नहीं दिए, इस लिए उन दोनों की जाँच नहीं हो सकती।

( ११ )—उसी पुस्तक में छपे हुए 'पन्तप्रातिनिधींची बखर' में छत्रपतिमहाराज का जन्म शक-संवत् १५४९ (वि. सं. १६८४) प्रभव संवत्सर, बैशाख शुक्ला १५ इन्दु ( सोम ) वार को होना लिखा है। उक्त संवत् की बैशाख सुदी १५ को सोमवार नहीं, किंतु शुक्रवार था। उक्त पुस्तक के टिप्पण में ५ के स्थान में लेखक के दोष से १५ लिखा जाना बतलाया है। यदि शुद्ध पाठ पंचमी माना जाय, तो उसकी जाँच ऊपर लिखी हुई संख्या ३, ७ और ८ के समान समझनी चाहिए।

ऊपर लिखी हुई ११ पुस्तकों में से पहली दो में, जो सबसे पुरानी है, शिवाजी के जन्म का संवत्, मास आदि दिया ही नहीं। बाकी की ९ पुस्तकों में; जो उन के स्वर्गवास से १०० वर्ष या उस से भी अधिक पीछे की लिखी हुई है, शक सं. १५४८ या १५४९ ( वि. सं.१६८३ या १६८४ ) दिया है। ऐसे ही पिछली ९ पुस्तकों में से दो (संख्या ४, ५ ) में गुरुवार, और चार ( संख्या ३, ७, ८, ११ ) में सोमवार दिया है, तथा संख्या ६, ९, १० में वार नहीं दिया। इन् पुस्तकों के देखने से शिवाजी के जन्मदिन के विषय में संशय हुए बिना नहीं रहता।

मरहठों का अँगरेजी-इतिहास लिखनेवालों में सब से पहले लेखक ग्रान्ट डफ ने शिवाजी का जन्म ईसवी सन् १६२७ के मई-महिने ( शक सं. १५४८ वि. सं. १६८४ ज्येष्ठ आषाढ ) में होना माना है। प्रोफेसर टकाक्खव शक संवत् १५४९ ( वि. सं.१६८४ ) की बैशाख सुदि ५को माना है, जो अधिकांश बखरों के अनुसार है। शिक्षक केलुस्कर ने शकसंवत् १५४९, बैशाख सुदि २, गुरुवार माना है; परंतु तिथि और वार का योग न होने से उस पर विश्वास नहीं किया जाता। श्री. यदुनाथ सरकारनें उल्लिखित बखरों में से एक में भी दी हुई तिथि, संवत् आदि पर विश्वास नहीं किया, और जेधे की बखर या शकावली ( जिसका वर्णन आगे किया जायगा ) में दिये हुए संवत् आदि को ठीक माना है। मिस्टर किंकेड और श्रीयुत पार्सनिस ( स्वर्गवासी ) नें शिवाजी का जन्मदिन ता. १० एप्रिल, सन् १६२७ शक-सं. १५४९ वि. सं. १६८४ बैशाख सुदि ५ को माना है।

इस प्रकार अँगरेजी के भिन्न भिन्न इतिहास लेखकों ने भिन्न भिन्न बखर के अनुसार छत्रपति की भिन्न भिन्न जन्मतिथि दी है, जिस से किसी एक तिथि या संवत् का निश्चय नहीं हो सकता। कुछ वर्ष पूर्व स्वर्गवासी लोकमान्य टिळकमहाराज को भोर संस्थान के कारीगॉव के इजाफेदार श्रीयुत दयाजीराव सर्जेराव उर्फ दाजीसाहब जेधे देशमुख के यहाँ से एक पुराणी बही मिली जिस में शक-संवत् १५४० से. १६१९ ( वि. सं. १६७५ से १७५४ ) तक की घटनाओं का वर्ष-क्रम से उल्लेख है। उक्त महानुभाव ने उसका नाम 'जेधे की शकावली' रक्खा। अतएव हम भी इस लेख में उसे 'शकावली' कहेंगे। संभव है, वह शकावली शक-संवत् १६१९ ( वि. सं. १७५४ ) तक लिखी गई है। उक्त शकावली में शिवाजी का जन्म शक-संवत् १५५१ ( वि. सं. १६८६ ) फाल्गुन वदि ३ ( उत्तरीय-पूर्णिमान्त-गणना के अनुसार चैत्र वदि ३ ) शुक्रवार और हस्त-नक्षत्र को होना लिखा है। यह शकावली ऊपर लिखी हुई पहली दो बखरों को छोडकर बाकी सब से पुरानी है। दक्षिणी गणना ( अमान्त ) के उक्त संवत् मे फाल्गुन वदि ३ को शुक्रवार और हस्त-नक्षत्र भी था।

जेधे के घरानेवालों के अधिकार में बीजापूर और अहमद-नगर के सुलतानों की दी हुई जागीर अबतक चली आती है। कान्होजी जेधे शाहजी और शिवाजी का समकालीन था, और जिस समय शिवाजी अफ-झलखाँ से प्रतापगढ में मिले, उस समय वह अपने ६ पुत्रों सहित शिवाजी के पास विद्यमान था। उस के पुत्रों में से बाजी-नामक जेधे का जन्म शक–संवत् १५५० ( वि. सं. १६८५ ), कार्तिक वदि ५ ( उत्तरीय गणना से मृगशिर वदि ५ ) को हुआ था; अर्थात् जेधे की शकावली के अनुसार वह शिवाजी से अनुमानतः एक वर्ष बडा था। उक्त शकावली के कथन की पुष्टी नीचे लिखे हुए प्रमाणों से भी होती है।

( १ ) थोडे वर्ष पूर्व तंजोर में 'शिवभारत' नाम की पुस्तक मिली जिसकी रचना कवीन्द्र परमानन्द निधिवासकर ने शिवाजी की आज्ञा से ही की थी, और जिस में शिवाजी के दादा मालोजी से लगाकर शक-संवत् १५८४ ( वि. सं. १७१९ ) तक का शिवाजी का वर्णन है। यह पुस्तक शिवाजी की जीवितदशा में बनी हुई होने के कारण उन के जन्मदिन के निर्णय

में सब से अधिक उपयोगी है। उक्त पुस्तक के ६ ठे अध्याय में शिवाजी का जन्मदिन नीचे लिखे अनुसार है–

भूबाण-प्राण-चन्द्राब्दैः सम्मिते शालिवाहने ।
शके संवत्सरे शुक्ले प्रवृत्ते चोत्तरायणे ॥ २६ ॥
शिशिरर्तौ वर्तमाने प्रशस्ते मासि फाल्गुने ।
कृष्णपक्षे तृतीयायां निशि लग्ने सुशोभने ॥ २७ ॥
महोरस्कं महाबाहुं सुषुवे साद्भूतं सुतम् ॥ ३१ ॥

आशय––शालिवाहन-शक १५५१ ( वि. सं. १६८६ ) के उत्तरायण और शिशिर ऋतु में फाल्गुन-कृष्णा ३ की रात्री को ( शहाजी के ) पुत्र ( शिवाजी ) का जन्म हुआ।

यह कथन जेधे के अनुसारही है। इस में उक्त दिन का वार नहीं दिया; परंतु यह विशेष रूप से बतलाया है कि शिवाजी का जन्म रात्री को हुआ था।

( २ )––तंजोर में एक शिलालेख मिला है, जिसमें शिवाजी का जन्म शक संवत् १५५१ ( वि. सं. १६८६ ) में होना लिखा है। उक्त लेख में मास, पक्ष, और तिथि नहीं दी; परंतु संवत् जेधे की शकावली और शिवभारत के अनुसार है।

( ३ )––हमारे मित्र ब्यावर (राजपुताना ) निवासी व्यास मीठालालजी के द्वारा हमे प्रसिद्ध ज्योतिषी चंडू के वंशजों के यहाँ का एक पुराना गुटका मिला है, जिस में ज्योतिष की कई पुस्तकों की नकलें है। उन पुस्तकों के मध्य में दिल्ली के बादशाहों, उनके शाहजादों, अमीरों तथा हिन्दू राजवंशियों में राठोडों, कछवाहों, मेवाडके राणाओं, देवडों, भाटियों, गौडों, हाडों, गूजरों, एवं मुहणोतों, सिंघियों, भण्डारियों, पंचोलियों, ब्राम्हणों तथा रानियों और कुँवारियों आदि की अनुमानतः ५४० जन्म-पत्रियों का सङ्ग्रह है। यह गुटका ज्योतिषी चंडूके वंश-धर पुरोहित शिवराम ने वि. सं. १७३२–३७ तक लिखाया, जैसा उसमें जगह जगह दिए हुए संवतों से माळूम होता है। उक्त संग्रह में मेवाड के राणाओं की जन्मपत्रियों के अन्तर्गत शिवाजी की जन्म पत्री भी है, जिस से यह भी पाया जाता है कि उस समय भी शिवाजी मवोड के सूर्यवंश राजाओं के वंशधर माने जाते थे। उक्त जन्मपत्री में वि. सं. १६८६ ( श. सं. १५५१) की फाल्गुन बदी ३, शुक्रवार को, सूर्योदय से ३० घटी ९ पल पर, शिवाजीका जन्म होना लिखा है। स्पष्ट सूर्य

१०।२३ और स्पष्ट लग्न ४।२९ दिया है। अनुमान होता है कि यह जन्मपत्री दक्षिण की बनी हुई जन्मपत्री की नकल ही है। केवल शक-संवत् १५५१ के स्थान पर वि. सं. १६८६ बना दिया है; क्यों कि फाल्गुन-बदि ३ को दक्षिणी (अमान्त) गणना के अनुसार ही शुक्रवार था, उत्तरीय गणना के अनुसार चैत्र बदि ३ को।

चंडू जोधपूर राज्य का प्रसिद्ध ज्योतिषी था, उसकी तैयार की हुई सारणि के अनुसार अब तक पञ्चाङ्ग बनता है, जो 'चण्डवाणि पञ्चाङ्ग' कहलाता है। चंडू और उसके वंशधर जोधपूर-राज्य के राजकीय ज्योतिषी रहे। जबसे जोधपूर-राज्य ने बादशाह अकबर की आधीनता स्वीकार की तबसे वहाँ के राजा मुगलों के दरबार में सेवार्थ रहा करते थे, और उनके साथ चंडू के वंश का कोई-न-कोई ज्योतिषी भी रहा करता था। चंडू और उस-के वंशधर एक बडे राज्य के प्रसिद्ध ज्योतिषी थे, इस लिए उनके पास बादशाहों, राजा-महाराजाओं आदिकी जन्म-पत्रियोंका पहुचना साधारण बात है। अनुमान होता है कि जो जो जन्म-पत्रियाँ उनके यहाँ आती थी, उनकी नकलें वे अपने यहाँ रख लेते थे। इन्हीं को शिवराम ने जाति या वंशके अनुसार क्रम-बद्ध किया। शिवाजी की यह जन्म-पत्री शिवाजी के स्वर्गवास से पूर्व ही शिवराम ने क्रम-बद्ध की थी। शिवराम की लिखी जन्म-पत्री, जेधे की शकावली, शिवभारत तथा तञ्जोर के शिलालेख से ठीक मिलती हुई है। शिवभारत में रात्रि में जन्म होना लिखा है। वह भी शिवराम की लिखी जन्म-पत्री से शुद्ध प्रतीत होता है; क्यों कि उक्त शक-संवत् में दक्षिणी फाल्गुन बदि ३ (उत्तरी चैत्र बदि ३) को शिवाजी के जन्म-स्थान शिवनेरी में सूर्यास्त २८ घटी ५२ पल पर हुआ होगा। अतएव शिवाजी के जन्म के समय अनुमानतः सवा घडी रात्रि गई होगी। ऐसे ही जेधे का दिया हुआ हस्त-नक्षत्र भी शुद्ध है, क्यों की उक्त तिथि को हस्त-नक्षत्र ही था। शिवराम की लिखी हुई जन्म-पत्री में चन्द्र कन्याराशि पर है, और वह भी उस दिन हस्त-नक्षत्र का होना सिद्ध करता है।

ऊपर उध्दत किए हुए चारों प्रमाणों से शिवाजी का जन्म शक-संवत् १५५१ (वि. सं. १६८६) दक्षिणी फाल्गुन बदि ३ उत्तरी चैत्र बदि ३ शुक्रवार, हस्त-नक्षत्र, अर्थात् ता. १९ फरवरी सन १६३० ई-

को होना निश्चित है। जिन बखरों में शिवाजी का जन्म-दिन दिया है, वे सब शिवाजी के जन्म से १०० या उससे भी अधिक वर्ष पीछे की लिखी हुई होने, उनके परस्पर न मिलने और उनमें दी हुई तिथि और वार गणित से शुद्ध सिद्ध न होने के कारण वे इस विषय में विश्वास के योग्य नहीं है। शिवभारत और शिवराम की दी हुई जन्म-पत्री दोनों शिवाजी के जीवनकाल में लिखे जाने और जेधे की शकावली से उनकी सब बातों के मिलने तथा तंजोर के शिलालेख से संवत् के मिलने के कारण वे ही प्रामाणिक हैं, बखरें नहीं।

ता. ३ मई सन् १९२७ ईसवी (चैत्रादि वि. सं. १९८४ बैशाख शु. २) को भारतवर्ष के भिन्न भिन्न नगरों में वीरशिरोमणि छत्रपति शिवाजी महाराज के जन्म से ३०० वर्ष पूरे होने और ३०१ का प्रारंभ होना मानकर जयंती मनाना निश्चय हुआ। तदनुसार अजमेर नगर में भी उक्त तारीख को छत्रपति की जयन्ती मनाना निश्चय हुआ। उस की सूचना मेरे पास आने पर मैं ने जयंती के मुख्य प्रबंध-कर्ता को सूचित किया कि अभी तो शिवाजीमहाराज के जन्म से ३०० वर्ष पूरे होने में २ वर्ष कम है और न उन का जन्म बैशाख शुक्ला २ को हुआ था। शिवाजी जैसे वीर और स्वतन्त्रता देवी के परमोपासक की जयन्ती देशभर के प्रत्येक नगर में मनाई जाय यह बडे हर्ष का विषय है, परंतु खेद की बात यह है कि उन के ठीक जन्म दिन पर यह जयन्ती नहीं मनाई जा रही है। देशभर में जयंती का वही दिन निश्चय हो चुका था इस लिये वह उसी कल्पित दिन को मनाई गई। इस पर मैं ने 'शिवाजी का जन्मदिन' नामक एक छोटासा सप्रमाण लेख 'सुधा' नामकी मासिक-पत्रिका में प्रकाशित कराया जिस में उनका शुद्ध जन्मदिन शक-संवत् १५५१ (वि. सं. १६८६) अमान्त फाल्गुन बदि ३ (पूर्णिमान्त चैत्र बदि ३) शुक्रवार को होना बतलाया था। उस की चर्चा महाराष्ट्र में भी हुई। महाराष्ट्र के विद्वानों में शिवाजी के जन्मदिन के संबंध में मतभेद हो रहा है। बखरों पर विश्वास करने वाले विद्वान् बखरों के संवत्, मास, पक्ष, तिथि आदि को शुद्ध मानने की हठधर्मी करते हैं। दूसरा पक्ष जेधे की शकावली, शिवभारत, तंजोर का शिलालेख तथा हमारे संग्रह की शिवाजी के जीवितकाल की लिखी हुई उन की जन्म-पत्री के दिन को ही ठीक मानते हैं। 'सुधा' में

प्रकाशित हमारे लेख-पर एक महाराष्ट्र विद्वान् ने यह शङ्का की है कि, शिवाजी की जन्म-पत्री महाराष्ट्र में तो मिली ही नहीं और मारवाड में मिली जिसपर कैसे विश्वास किया जावे।

ऐसी शङ्का करना निरर्थक है, क्यों कि जोधपूर के महाराज दिल्ली या अन्यत्र जहाँ कहीं जाते वहीं चंडू के वंश का कोई एक ज्योतिषी उन के साथ बराबर रहा करता था। चंडू के घराने के ज्योतिषियों की इतनी अधिक प्रसिद्धि थी कि जहाँ कहीं वे जाते वहीं दूर दूर के राजाओं, बडेबडे अफसरों, सरदारों, धनाढ्यों आदि की जन्मपत्रियाँ उन को दिखाई जाती थीं, जिन की नकलें वे अपने यहाँ रख लेते थे। इसी से चंडू के यहाँ से जन्म-पत्रियों का बडा भारी संग्रह मिला है। जोधपूर की ख्यात से पाया जाता है कि वि. सं. १७२० में महाराज जसवन्त-सिंह बादशाह औरंगजेब की सेना के साथ दक्षिण में थे। जसवन्त-सिंहजी ने शिवाजी के अधीन के गढ कुण्डाणे पर चढाई कर गढ पर मोरचे लगाये, परंतु गढवालों के अराबों की मार से महाराज को अपने मोरचे उठा कर लौटना पडा था। संभव है कि उक्त महाराज के दक्षिण में रहते समय अथवा शिवाजी के दिल्ली जाने के अवसर पर शिवाजी की जन्मपत्री चंडवाणी ज्योतिषी के पास पहुँची हो।

कुछ मास पूर्व बनेडा ( उदयपूर राज्यान्तर्गत ) के एक ज्योतिषी के यहाँ के पुरानी जन्म-पत्रियों की पुस्तक के कितनेक जीर्ण पत्रे हमारे देखने में आए, जो अनुमान १५० वर्ष से भी पुराने होंगे उन में भी शिवाजी की जन्मपत्री मिली। उस में संवत्, मास आदि वही हैं जो चंडू के संग्रह की जन्म-पत्री में है। अन्तर इतना ही है कि उस में अमान्त फाल्गुन वदि३ के स्थान में पूर्णिमान्त चैत्र बदि ३ दिया है। बनेडा का राजा भीमसिंह औरंगजेब की सेवा स्वीकार कर दक्षिण में रहा और वहीं मरा। बादशाही सेवा में रहनेवाले राजपूताने के राजाओं के साथ उन के राजकीय ज्योतिषी रहते थे। बनेडा के राजा भीमसिंह के ज्योतिषी को भी संभवतः शिवाजी की जन्म-पत्री देखने का अवसर मिला हो और उस ने उसकी नकल कर ली हो। इन सब प्रमाणों से यही पाया जाता है कि शिवाजी का शुद्ध जन्मदिन शक सं. १५५१ फाल्गु. वदि ३ ही है।

# शिवकालीन संतांची कामगिरी

( लेखक—प्रो. शं. वा. दांडेकर, पुणें )

जयां ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी काई ॥

श्री ज्ञानेश्वरी अ. ४ ओ. १५५

प्रस्तुत निबंधांत शिवकालीन संतांच्या धार्मिक कामगिरीचा विचार करावयाचा असल्यामुळें 'शिवकालीन' व 'संत' ह्या दोन शब्दांचे सामान्य अर्थ मान्य करून चालण्यास हरकत नसावी. मात्र शिवकालाचा आरंभ प्रस्तुत विषयाला अनुकूल असा, म्हणजे पैठणकर श्रीएकनाथांच्या कालापासून धरला पाहिजे.

शिवकालीं महाराष्ट्रांत निदान साठपांसष्ट संत होऊन गेले. त्यांतील नुसत्या प्रमुख संतांचा नामनिर्देश करावयाचा म्हटलें तरी, नृसिंहसरस्वति, एकनाथ, मोरया गोसावी, तुकाराम, रामदास, श्रेष्ठ, आनंदमूर्ति, दासोपंत, जनार्दनस्वामी, जयरामगोसावी, आनंदतनय, बोधलेबुवा, दामाजी, उद्धव गोसावी, उद्धव चिद्धन, कृष्णयाज्ञवल्की, जनीजनार्दन, रंगनाथ स्वामी निगडीकर, निरंजन बुवा पैठणकर, शिवकल्याण, कृष्णदयार्णव, मोनीबोवा पाटगांवकर, विठ्ठल बीडकर, केशवस्वामी, प्रेमाबाई, आक्काबाई, वेणाबाई, बहिणाबाई, वगैरे सत्तावीस अठ्ठावीस साधूंचीं तरी नांवें घ्यावीं लागतील. यांपैकीं समर्थ रामदासस्वामी यांच्या कामगिरीचा विचार अन्यत्र केला असल्यामुळें तदितर जे राहिले त्यांचाच विचार या लेखांत करावयाचा आहे. त्यांतूनहि प्रत्यक्ष अथवा परंपरेनें ज्यांचें महाराष्ट्रावर वजन पडलें व ज्यांनीं समाजाला विशिष्ट वळण लावण्याचे कांहीं प्रयत्न केले अशाच श्रीनृसिंहसरस्वती, श्रीएकनाथ, श्रीतुकारामप्रभृति प्रमुख संतांचाच विचार करितां येण्यासारखा आहे. संतांचा चरित्रविषयक भाग येथें मुळींच देण्यांत येणार नाहीं. तर त्यांच्या उपदेशाचा अथवा शिकवणुकीचा तत्कालीन महाराष्ट्रास काय उपयोग झाला या मुद्यावरच थोडी चर्चा करण्यांत येईल.

या बाबतींत आतांपर्यंत न्यायमूर्ति रानडे, राजारामशास्त्री बोडस, इतिहासाचार्य राजवाडे, प्रो. हरिभाऊ लिमये, प्रो. पटवर्धन, रा. ब. भांडारकर, महाराष्ट्रसारस्वतकार भावे, सरदेसाई, विठ्ठल रामजी शिंदे वगैरेंनीं बरीच चर्चा केली आहे. शिवाय, शिवाजी महाराजांचीं केळुसकर, सरकार वगैरेंनीं जीं चरित्रें लिहिलीं आहेत त्यांतहि याचा त्रोटक उल्लेख आहे. संत-कवि-चरित्र-लेखक ह. भ. प. पांगारकर व श्री. आजगांवकर यांनींहि निरनिराळ्या संतांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. त्यांत चरित्रविषयक भाग बराच आहे.

शिवाय साकल्यानेंहि या प्रश्नाचा विचार त्यांत, तीं चरित्रें स्वतंत्र वेगवेगळ्या साधूंचीं असल्यानें, आला नाहीं. याशिवाय भिडे, सोनावणे, ओक, नाडकर्णी, केळुसकर वगैरेंचे तुकाराम, एकनाथ वगैरे संतकवि व मराठी वाङ्मय यांविषयीं छोटेखानी निबंध आहेत. पण त्यांतहि या विषयाची तुरळकच चर्चा आहे. याच विषयाची पण निरनिराळ्या रूपानें चर्चा करणारीं अशीं दोन महत्त्वाचीं पुस्तकें आहेत. एक रा. भास्कर वामन भट यांचें "महाराष्ट्रधर्म" व दुसरें रा. नारायण कृष्ण गद्रे यांचें "महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग" हें. परंतु एकांत 'धर्माचा'च ऊहापोह आहे व दुसरा ग्रंथ तर आमच्या चर्चेच्या विषयाचे काळा-पर्यंतच आणून सोडणारा आहे.

यांपैकीं न्यायमूर्ति रानडे यांनीं आपल्या "मराठीसत्तेचा उदय" या ग्रंथांत शिवाजी महाराजांच्या वेळेला मराठीसत्तेचा वृक्ष जो फुलाफळास आला त्याचा संपूर्ण इति-हास लिहावयाचा म्हणजे शिवकालीन संतांनीं भूमि कशी तयार केली हें पाहणें अवश्य आहे, ही कल्पना प्रामुख्यानें प्रथम पुढें आणिली. परंतु त्यानंतर राजवाडे, भावे, दिवेकर शास्त्री वगैरेंनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं, शिवपूर्वकालीं जें रामदासांव्यतिरिक्त संताळ माजलें होतें त्याच्या निवृत्तीच्या व जगदुद्धाराच्या अचाट व अव्यवहार्य कल्पना होत्या. त्यांच्या शिकवणुकीनें धार्मिक खळबळ उडाली असली तरी ही निवृत्तिमार्गी चळवळ, राष्ट्रास उदयोन्मुख करण्याऐवजीं ऐहिक अवनतीकडे ढकलणारी अशीच झाली. शिवाजी-महाराजांनीं राजकीय गुलामगिरीच्या शृंखलांतून महाराष्ट्रास जसें मुक्त केलें तसें या खुळचट धार्मिक बंधनांतूनहि राष्ट्रास काढणें अवश्य होतें. व त्याप्रमाणें श्रीसमर्थ रामदास स्वामी यांनीं या भक्तिमार्गाचें बंड मोडून राष्ट्रास अभ्युदयोन्मुख केलें; आणि यामुळें श्री-शिवाजीमहाराज यांना स्वराज्यस्थापना करतां आली. असें या संतांच्या कामगिरी-संबंधानें द्विधा मत असल्यानें या ठिकाणीं त्या प्रश्नाचा पुनश्च एकदां सांगोपांग विचार करण्याचें योजिलें आहे.

महाराष्ट्रांत साधुसंतांनीं जी खळबळ उसळून दिली त्या चळवळीचें खरें स्वरूप काय होतें व तिचा त्या वेळच्या राजकीय व धार्मिक घडामोडींवर काय परिणाम झाला हें लक्षांत येण्याकरतां प्रथम, त्या वेळची परिस्थिति व त्या वेळच्या संतांची त्यांच्याच शब्दांतून निघणारी शिकवणूक यांचा विचार करणें अवश्य आहे. कारण, त्या योगानें आपणांस संतकार्याविषयीं स्वतंत्र मत बनवितां येईल, व तदनुरोधानें पूर्वोक्त मतांतील ग्राह्य कोणचें तें ठरवितां येईल.

**तत्कालीन धार्मिक स्थितिः**—त्या काळीं महाराष्ट्रांत वैदिककालीन चातुर्वर्ण्य-व्यवस्था जवळ जवळ मोडकळीस आली होती. हा वर्णाश्रमव्यवस्थेचा ऱ्हास ज्ञानेश्वर-कालीं जरी स्वराज्य होतें तरीहि दृग्गोचर होऊं लागला होता. ज्ञानेश्वरानंतर राजे यवन झाल्यानें तो ऱ्हास झपाट्यानें होऊं लागला येवढेंच. [ राजवाडे – राधामाधवविलासचंपू, प्रस्तावना पहा.] यामुळेंच पुढील अवनतीचे काळांत श्रीनाथप्रभृति संतांनीं ज्ञानेश्वराचे मार्गावर पाऊल टाकून धर्म रक्षण्याचा प्रयत्न केला.

श्रीमत्शंकराचार्य यांनीं गीताभाष्याचे उपोद्घातांत वर्णाश्रमव्यवस्थामूलक वैदिक धर्म हा ‘ब्राह्मणत्वा’ चें रक्षण होण्यावर अवलंबून आहे असें म्हटलें आहे. श्रीनाथ-तुकोबादिकांचे उद्गार जर पाहिले तर तत्कालीं द्विज हे बरेच अवनत होत आले होते असें दिसतें. ब्राह्मणांनीं जीवनकलहाच्या चढाओढींत उडी घालून गाई, म्हशी विकाव्या असले अगदीं निकृष्ट असे धंदे करावयास सुरवात केली होती. [ तुकारामबोवा—‘हाती होन दावी बेना’ हा संपूर्ण अभंग पहा. ] ‘ब्राह्मणास गंधाचा टिळा लावा-वयाची लाज वाटूं लागली. पंचागें तर त्यांनीं दडवलींच. म्लेंच्छ राजास खूष करण्याकरतां शुभ्र धोतरांचा त्याग करून ते ‘कातडी विजारा’ लेवूं लागले. त्यांस वेद नकोसा झाला, व ते यावनी ग्रंथ वोकूं लागले; येवढेंच नव्हे, तर पोटाची खळगी भरण्याकरतां ते नीच, भ्रष्ट जे यवन त्यांची सेवा करूं लागले; असें तुकोबानें आपल्या काळच्या द्विजांचें वर्णन केलें आहे. कान्होबा म्हणात कीं, पोट जाळण्याकरतां ते प्रसंगीं लेकीचीहि धारणा करीत. ही जशी उच्च वर्णांची स्थिति तशीच उच्च आश्रमाचीहि स्थिति तत्कालीं झाली होती. नाथानीं आपल्या भागवतांत असल्या ‘पोट्या संन्याशावर’ फारच तडाके मारले आहेत. अशा रीतीनें उच्च समजले जाणारे वर्णच बिघडले मग खालचे म्हणून सम-जले गेलेले वर्ग कोठवर जाऊन पोंचले असतील. हें काय निराळें सांगावयास पाहिजे ! तात्पर्य, तो काळ असा आला होता कीं, धर्माला त्राता कोणी राहिला नव्हता; जिकडे तिकडे बजबजपुरी माजली; कानफाटे, बैरागी, मलंग, फोईफोडे असले अनेक पंथ माजले; ब्राह्मण्यें बुडालीं, यजनयाजन बंद पडलें, राजे भ्रष्ट यवन झाले व प्रजेचे ‘भक्षक’ झाले. पर्जन्य वेळेवर पडेना, भूमी अपीक होऊन उजाड होऊं लागली. अशा रीतीनें धर्मास ग्रहण लागलें व तें खग्रास ठरतें कीं काय अशी सुज्ञांस भिती वाटूं लागली. म्हणूनच ‘धर्मरक्षणार्थ’ आम्हीं अवतार घेतले असें श्रीनाथतुकोबांचें म्हणणें आहे.

आतां, त्या वेळेच्या राजकीय परिस्थितीचा थोडक्यांत विचार करूं. श्रीज्ञानदेवांचे कालीं महाराष्ट्रांत स्वराज्यच होतें. त्यांचे समकालीन परंतु त्यांचे समाधीप्रवेशानंतर बरींच वर्षे मागें राहिलेले जे नामदेव त्यांचे अभंगांत मात्र मुसलमानी राजांच्या त्रासाचा उल्लेख आहे. ‘राजे भ्रष्ट यवन झाले । कलीं दोष मातले । मग इहीं अवतार घेतले । कलीदोष हरावया॥’ असें त्यानीं ज्ञानदेवांच्या अवताराविषयीं लिहितांना सामान्य तऱ्हेनें म्हटलें आहे. नामदेवांचा मुलगा गोंदा यानें नामदेवचारित्रांत बेदरच्या मुसलमानी दरबारांत नामदेवरायांनीं मेलेली गाय उठवून कसा चमत्कार केला याचें वर्णन केलें आहे. अल्लाउद्दिन खिलजीच्या नंतर महा-राष्ट्रावर मुसलमानांच्या वारंवार स्वाऱ्या होऊं लागल्या व शेवटीं बहामनी राज्याची स्थापना होऊन महाराष्ट्रांत मुसलमानांचा पाय कायमचा रोंवला गेला. या मुसलमानी अमलासंबंधानें दोन चार गोष्टी फारच महत्वाच्या आहेत. पहिली म्हणजे मुसलमानांच्या स्वाऱ्यांनीं जरी देवगिरी येथील हिंदुराज्य बुडालें तरी पण दक्षिणेंत सुमारें इ. १३३५ च्या सुमारास विजयानगर राज्याची स्थापना होऊन, पहिला हरिहरराय व पहिला बुक्कराय

यांच्या द्वारां माधवाचार्य अथवा विद्यारण्यस्वामी यांनीं स्वधर्म व स्वराज्य यांचें रक्षण केलें. व हें स्वधर्मी राज्य सन १५६५ पर्यंत टिकलें. दुसरी गोष्ट, आरंभीं आरंभीं तर मुसलमान लुटालूट करून परत जात व दक्षिणेंतले राजे, जहागिरदार हेच मालक उरत. तिसरी गोष्ट, येथें स्थिर झाल्यावरहि मुसलमानांना येथील लोकांवरच बरेंचसें अवलंबून असावें लागे. दिल्लीच्या राजांस स्वमुलखांतून अस्सल दुराणी मिळत असत. तसें दूर असलेल्या दक्षिणेंतील राजांस संभवनीय नव्हतें. यामुळें त्यांस येथील बाटे व येथील देशमूख, देशपांडे वगैरे गढ्या करून राहिलेल्या लोकांवर बरेंच अवलंबून रहावें लागे व यांच्यातीलच लोक ते आपल्या प्रधानगिरीवर वगैरे नेमत. यामुळें हे गढी करून राहिलेले लोक जवळ जवळ स्वतंत्रच असत. [रानडे, मराठी सत्तेचा उदय] शिवाय या मुसलमानी राजांत जसे कांहीं अत्यंत क्रूर असे राजे झाले तसेच कांहीं शांतवृत्तीचे असेहि झाले. कित्येक तर नृसिंहसरस्वतींचे, व राघवचैतन्यांचे शिष्य बनले. शेवटची गोष्ट म्हणजे महाराष्ट्रांत त्या काळीं गढी, डोंगरी किल्ला वगैरेंचा आश्रय करून आपल्या गांवावर आपली हुकमत चालवणारा असा देशमुख, देशपांडे, कुलकर्णी व मराठे संस्थानिक यांचा बराचसा वर्ग होता. हा संघ ज्यास मदत करील त्याचेंच बूड येथें टिकण्याचा संभव असे. म्हणूनच विधर्मी राजे यांच्या साहाय्याची अपेक्षा करीत. याचा निष्कर्ष इतकाच कीं, आपल्या स्थितींत महदंतर घडलें आहे इतकें कळण्याइतका त्रास महाराष्ट्रास मुसलमानी अमदानींत झाला नाहीं. श्रीनाथांच्या काळीं तर मुसलमानांचा पहिला जोर कमी होत आलेला होता. सन १५५७त वारलेल्या विजापूर येथील इब्राहिम आदिलशहाच्या राज्याचें वर्णन करतांना टेलरनें म्हटलें आहे कीं, यानें हिशोब पूर्वी पर्शिअन भाषेंत ठेवीत ते बदलून मराठींत ठेवण्यास सुरवात केली व यामुळें पुष्कळ ब्राह्मण सरकारी नोकरींत शिरले; व याचा एकंदर हिंदूंच्या सौख्यावर बराच फायदेशीर असा परिणाम झाला.[१] तात्पर्य, महाराष्ट्रांतील वस्तीकारांस जो त्रास भोगावा लागला याला बरेंच कारण तत्कालीन नेत्यांमध्यें शिरलेली श्ववृत्ति, सुखाभिलाषित्व, लोभ, एकमेकांपासून विलग रहाण्याची प्रवृत्ति, स्वधर्माचरणाविषयीं अनादर, वगैरे दोष होत असें म्हणावयास हरकत नाहीं. हे समाजांतील दोष प्रामुख्यानें संतांच्या लक्षांत येण्यास अडचण पडली नाहीं. आणि ह्यांनीं आपल्या शिकवणीचा मुख्य भर या दोषांचें आविष्करण करून त्यांची दुरुस्ती करण्यावर ठेविला असल्यास नवल नाहीं.

**शिकवणूक:**— जगांतील सर्व साधुसंत हे नरदेहांतील मुख्य कर्तव्य 'ईश्वरप्राप्ति' हेंच सांगतात. व यास या काळांतील साधु मग ते श्रीनाथ-तुकारामबोवा असोत अथवा श्रीसमर्थ असोत, हे अपवाद नव्हते.[२] श्रीनाथतुकारामबोवाप्रभृति साधूंनींहि 'आत्मा वा अरे द्रष्टव्य:' हें औपनिषदिक ध्येयच मानवी जविनाचें खरें ध्येय आहे अशी

१ "Hindoos not only suffered no persecution at his hands but many of his civil and military officers were Brahmins and Marathas". Taylor's Manual of Indian History.

२ प्रपंच सुखें करावा । परि कांहीं परमार्थ वाढवावा
परमार्थ अवघाचि बुडवावा । हें विहित नव्हे ॥ दासबोध द. ५ स. ३ ओ. १०३

घोषणा केली[१] व 'वेदबाह्यलंड बोले तो पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें' ॥ तु. तसेंच 'वेदाज्ञे करुनि न करिती स्वहित । नव्हति अलिप्त देहाहुनि ' ॥ तु० ॥ श्रीनाथांचे तर वेदावर[२] निष्ठा, श्रद्धा दाखविणारे किति तरी उद्गार देतां येतील.[३]

येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे. या साधुसंतांनीं मानवी आयुष्याच्या साधनानें 'सच्चिदानंद पदवी' प्राप्त करून घ्या असा उपदेश केला; याचा अर्थ आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येकास 'त्वां घरादाराचा त्याग करावा. व रानांत जाऊन देवास आळवावें' असेंच ते सांगत असा मात्र नव्हे. सर्वास एकच उपदेश सर्वांनाच करण्याइतकें मनुष्यस्वभावाचें गाढ अज्ञान त्यांच्यांत खास नव्हतें; हें त्यांच्या ज्या शेष उक्ति आहेत त्यांचा निर्मल अंतःकरणानें जो विचार करील त्यास दिसून येईल. त्यांच्या उपदेशाच्या बुडाशीं 'जया जैसा अधिकार । तैसें करावें उत्तर' ॥ हें तत्त्व होतें.

या सर्व संतांस वैदिक चातुर्वर्ण्य व चतुराश्रम-व्यवस्था मान्य होती. व वेदविहित मार्गानें ज्यानें त्यानें आपलें कल्याण करावें हेंच त्यांच्या शिकवणुकीचें सार आहे. तुकारामबोवा यांचा स्वतःच्या पुढील कार्याचा उल्लेख करणारा, एक अभंग[३] आहे. त्यावरून या सर्व साधुसंतांची शिकवणूक काय होती याची कल्पना येईल.

याबरोबरच हीहि गोष्ट सांगितली पाहिजे कीं, या थोर पुरुषांनीं काळ व परिस्थिति ओळखली. वैदिक धर्माचा ऱ्हास होऊं लागला आहे, व विधर्मी राजवटींत तर तो अधिक जोरानें होऊं लागला आहे ही गोष्ट त्यांस दिसून आली; आणि म्हणूनच त्यांनीं वैदिकधर्मास काळपरत्वें योग्य अशा तऱ्हेचा उजळा देण्याचें ( त्यास मूठमाती देण्याचें नव्हे) काम आरंभिलें. या बाबतींत त्यांस श्रीज्ञानदेव यांच्या ग्रंथांचा व चरित्राचा फारच उपयोग झाला; व त्यांनीं घालून दिलेला मार्गच ते आतां चोखाळूं लागले. परंतु वेदकाळांत वैदिक ध्येय साध्य करण्याकरतां सर्व समाज जीं साधनें सार्वत्रिकरीत्या उपयोगांत आणीत होता, त्यांचाच व तशा स्वरूपांत त्या काळांत उपदेश केल्यास परिस्थितीनें तें अवघड करून टाकल्यानें त्या साधनांकडे आतां कोणी ढुंकूनहि पहाणार नाहीं व साधनाच्या त्रासांत साध्यच नाहींसें होईल, म्हणून वैदिकध्येयच कायम ठेवून तत्कालास योग्य अशा वेदमूलक परंतु सुलभ अशा उपासनामार्गाचा त्यांनीं प्रसार केला. महाराष्ट्रांत त्या कालीं मुख्यतः असे चार पांच उपासनासांप्रदाय होते.

---

१ आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥ तु०
मनुष्यदेहींचेनि ज्ञानें । सच्चिदानंद पदवी घेणें ।
एवढा अधिकार नारायणें । कृपावलोकनें दिधला ॥ नाथभाग. अ. ९ ओ. ३३०

२ "प्राणी पावावया कल्याण । हें वेदोक्त स्वधर्माचरण" ॥ श्रीनाथ

३ धर्म रक्षावया साठीं ॥ करणें आटी आम्हांसी ॥१॥
वाचा बोलूं वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥२॥
न बाणतां स्थिति अंगीं । कर्मत्यागी तो लंड ॥३॥
तुका म्हणे अधम त्यासी ॥ भक्ति दूषी हरिची ॥४॥

एक विठ्ठलसांप्रदाय, दुसरा गाणपत्यसांप्रदाय, तिसरा दत्तसांप्रदाय व चवथा खंडे-राव मल्हारीचा सांप्रदाय; व पांचवा रामसांप्रदाय ( हा समर्थ रामदास स्वामींनीं पुढें विशेष रूढ केला ).

या उपासना-मार्गांत दृष्टीआड होत चाललेल्या अशा दोन गोष्टी लोकांच्या समोर प्रामुख्यानें मांडण्यांत येऊं लागल्या. त्या ह्या कीं, देवप्राप्तीच्या आड वर्ण व लिंगविचार येत नाहीं[1]. या सांप्रदायचतुष्टयापैकीं विठ्ठलसांप्रदायांतील साधूंनीं 'मांदी मेळवून समाज सुसंघटित करण्याचा फारच मोठा प्रयत्न केला.

" या रे या रे लहान थोर । याती भलते नारी नर ।
करावा विचार । न लगे चिंता कोणासी" ॥ तुका.

असें सर्वांस पंढरपुरास चलण्याविषयीं तुकारामबोवा हाकारतात. पंढरपुरास सर्वांना आषाढीकार्तिकी एकादशीस हाकारण्यांत त्यांचा हेतु एवढाच दिसतो कीं, तेथें चंद्रभागेचे वाळवंटांत जमणाऱ्या वेगवेगळ्या वर्णांच्या सर्व लोकांस श्रीपंढरीनाथाच्या कृपाछत्रा-खालीं जमल्यावर आपला देव एकच, आपले धर्मग्रंथ एकच व आपला धर्म एकच ही जाणीव उत्पन्न व्हावी; व विलग आणि विस्कळीत होत चाललेला समाज पुनश्च सुघटित व्हावा. प्रो. यदुनाथ सरकार यांनीं या यात्रांचे योगानें ऐक्याची भावना दृढ होत असे असें जें आपल्या शिवचरित्रांत वर्णन केलें आहे तें योग्यच आहे. या संघटनेचा तत्कालीं काय परि-णाम झाला हें दाखवून मग शिकवणुकीच्या पुढील भागाकडे वळूं.

शिवकालांत महाराष्ट्रांतील मोठा वर्ग हा आपल्या धर्ममातेस जवळजवळ पारखाच होत चालला होता. धर्मग्रंथ पडले संस्कृतांत. त्यांचें अध्ययन करून लोकांस त्यांचा अर्थ शिकवावयाचा ज्यांचा अधिकार तेच स्वकर्म विसरून नीच यातीची सेवा करूं लागले. राज्य करण्याचा ज्यांचा अधिकार तेहि स्वसुखाभिलाषी चैनी बनून नीच सेवेंत मिळणाऱ्या वेतनावरच संतुष्ट होऊन राहिले. उलट राज्यकर्ते विधर्मी व आपल्या धर्माचा प्रसार व्हावा एतदर्थ आटोकाट प्रयत्न करणारे होते; आणि त्यांचा धर्महि एकेपरीं सोपा, वर्णाश्रमखटपटविरहित असा होता. तो पत्करण्यांत दरबारी मान्यताहि मिळ-ण्याचा संभव होता. यास मदत म्हणून दुष्काळ, मानुषतासुलभ अशी चैनीकडे प्रवृत्ति वगैरे गोष्टी होत्याच. अशा स्थितींत महाराष्ट्रांत वर्णाश्रमव्यवस्था शेष राहिली; शेंडी, जानवें राहिलें; याला कारण या साधुसंतांचे प्रयत्न होत. व महाराष्ट्रानें याबद्दल त्यांचे सदैव ऋणीच राहिलें पाहिजे.

खालील गोष्टीकडे नजर दिल्यास आम्हीं आतां केलेल्या विधानाचें पूर्ण महत्त्व लक्षांत येईल. ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण म्हणजे सर्व समाज नव्हे. मोठा असा भाग या दोन वर्णेतरांतच आहे. तो पूर्वी असेल त्याच स्थितींत बहुंशीं वरच्या दोन वर्गांस हि रहाणें प्राप्त आहे. साधुसंतांचा उपदेश ब्राह्मण व क्षत्रिय ह्या वर्गांस तर होताच. पण साधुसंतांनीं

---

१ उत्तमापासोनी अंत्यजवरि । मुक्तिचि सेल मागावी रे रे ॥ ज्ञानदेव.

या खालच्या समाजांत आपण वैदिकधर्माचे घटकावयव आहोंत, वर्णाश्रमव्यवस्था कितीहि मोडकळीस आली तरी तीच श्लाघ्य आहे, व प्रत्येकास स्वधर्मानेंच इहपरलोकीं सुख मिळणार आहे, त्यांत जात अथवा पंथ आड येऊं शकत नाहीं; असली विश्वासयुक्त जाणीव उत्पन्न केली. ही जी जाणीव व धार्मिक व्यवस्थेचें प्रेम उत्पन्न केलें गेलें याचाच उपयोग शिवाजीमहाराजांस झाला.[१] मुळांतच गाई, ब्राम्हण, देवधर्म यांजविषयीं समाजांत प्रेम नसेल तर मी देवधर्मांकरतां भांडतों, गोब्राह्मणांचें पालन व्हावें म्हणून खटपट करतों व तुम्हीहि आपले जीव त्या कार्याकरतां मजबरोबर अर्पण करा; असें जर कोणी सांगूं लागला तर त्याचें कोण ऐकेल ? न्या. रानडे समजतात त्याप्रमाणें तत्कालीन चळवळ ही वैदिकधर्माविरुद्ध बंड असती तर तिचा तसा उलट परिणाम झाला असता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आज जी सत्यसमाजाची वृत्ति आहे तीच जर तत्कालीन महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाची मनोभूमिका असती तर शिवाजीराजे यांना 'मी गोब्राह्मणाचें पालन करतों' या वाक्याचा कितीसा उपयोग झाला असता बरें ? त्या वेळेस महाराष्ट्राची भूमिका तशी बनली नव्हती; याचें सर्व श्रेय या साधुवर्गाचे प्रयत्नासच आहे.

वर्णाश्रमव्यवस्था, गोप्रेम यांचें या नामनिरत साधूनींहि रक्षण करण्याची कशी खटपट केली हें खालीं दिलेल्या कडव्यांवरून[२] दिसून येईल. प्रसंग पडेल तेव्हां ब्राह्मण-

---

१ काउन्टेस सीसॅरेस्को या बाईनीं 'इटलीचें स्वातंत्र्य' या पुस्तकांत खालीलप्रमाणें उद्गार काढले आहेत. The first thing needful was to restore the people to consciousness, to animation of some sort, it did not matter what, so it were a sign of life." त्या वेळच्या महाराष्ट्राच्या स्थितीसहि हे उद्गार तंतोतंत लागू पडतात.

२ श्रीनाथांचे भागवतांत तत्कालीन ब्राह्मण समाजावर कडक टीका आहे. पण श्रीनाथांचे ठिकाणीं ब्राह्मण्यासंबंधानें किती आदर होता याकरतां त्यांनीं आपल्या ग्रंथाचे शेवटीं जी गुरूजवळ मागणी केली तीतील एक भाग देतों; यावरून कळून येईल.

'तेथ म्यांही केली विनंती । जे ये ग्रंथीं अर्थार्थी होती ।
त्यांसी ब्रह्मभावे ब्राह्मणभक्ति । नामीं प्रीति अखंड यावी ॥
ते न व्हावे ब्रह्मद्वेषी । निंदा नातळावी त्यासी ।
समूळ क्षय ब्रह्मद्वेषेसी । निंदेपाशीं सकळ पापें ॥

अ. ३१, ५३७—५३८ शिवाय भा. अ. ११, १३७९ — ८३ ओव्या पहा.

रामावतारीं अति महिमान । तैं न घडेचि गोशुश्रूषण ।
या लागीं गोकुळीं जाण । गायींचें सेवन म्यां केलें ॥
या लागीं गायी आणि ब्राह्मण । माझा जाण जीवप्राण ।
आपत्कालीं गोरक्षण । करी तो पढियंता मज जाण।

अ. ११,१३८४-९१ भागवत.

वर्गावर वगैरे त्यांनीं टीकाहि केली. परंतु ती टीका व्यवस्था नाहींशी करण्याकरतां नव्हे तर सुधारण्याकरतांच होती.

तात्पर्य, या धर्मऱ्हासाच्या काळांत वैदिक धर्माचीं प्रमुख अंगें गो-ब्राह्मण यांसंबंधीं यांनीं लोकांत प्रेम जागृत केलें म्हणूनच धर्मरक्षणाचे कामांत शिवाजीमहाराजांस लोक मिळाले.

आतां त्यांच्या **तत्त्वज्ञाना**कडे वळूं. ही सर्व साधुमंडळी अद्वैती होती. शंकराचार्य व ज्ञानदेव यांच्या तत्वज्ञानाचा या सर्व मंडळीवर मोठाच परिणाम झालेला होता. ही सर्व मंडळी अद्वैती असूनहि भक्तिप्रधान अशी होती. अद्वैतांत भक्ति शक्य आहे व होते असें यांनीं प्रतिपादन केलेलें आहे.

या अद्वैत तत्वज्ञानाचा एक मोठा फायदा महाराष्ट्रास झाला. तो असा कीं, दक्षिण महाराष्ट्रांतील तंट्यासारखे वीरवैष्णव व वीरशैव यांजमधील तंटे महाराष्ट्रांत कधींच झाले नाहींत. महाराष्ट्रांत शैव वैष्णव हे [1]गुण्यागोविंदानें नांदत व नांदतातहि. पण या अद्वैतावर एक आक्षेप घेण्यांत येत असतो. तो असा कीं, या अद्वैततत्वज्ञानानें भेद नाहींसा केला. या अद्वैतज्ञानानें कांहीं चांगलें झालें असेल. पण, एक मोठी वाईट गोष्ट झाली आहे. ती ही कीं, त्या योगानें महाराष्ट्रांतील लोकांना राम व रहिम यांपैकीं कोणास हि भजलें तरी सारखेंच वाटूं लागलें, व लोकांचे ठिकाणीं स्वधर्मप्रेम व विधर्माविषयीं तिरस्कार असावयास पाहिजेत ते विकार मुळींच नाहींसे झाले. शिवाय हिंदु व मुसलमान यांतहि कांहीं फरक आहे ह्याकडे लोक कानाडोळा करूं लागले. असला आक्षेप आपल्याकडीलच लोक अद्वैत तत्त्वज्ञानावर आणतात असें नाहीं; तर पाश्चात्य लोकहि अद्वैत तत्त्वज्ञानावर असाच आरोप करीत असतात. परंतु थोडा खोल विचार करून पाहिलें तर हे आक्षेप खोटे असून तुकारामबुवा वगैरे साधूंच्या अद्वैत तत्त्वज्ञानामध्यें व्यावहारिक द्वैत, गुणीजनांचा मान व दुष्टांचें शासन यांस वाव[2] आहे; असें दिसून येईल. तात्पर्य, अद्वैत तत्त्वज्ञान, समाधि-

तुकारामबोवाहि टीका करतात, पण तेच खालीलप्रमाणें उद्गार काढतातः—

पानफूल नेतो वेश्येसी उदंड। ब्राह्मणासी खांड देऊं नेदी।
लेंकराची रास स्वयें धांवे क्षाळूं। न ह्मणे प्रक्षाळूं द्विजपायां।
गाईचें पाळण नयेचि विचारा। अश्वासी खरारा करी अंगें।

[1] धरोनि दोन्ही रूपें पाळणें संहार। करी कोप रुद्र दयाळ विष्णु॥ तुकाराम.

[2] तुकाराम—

यज्ञ भूतांच्या पाळणा। भेद कार्याकारणा॥
पावावया उपासना। ब्रह्मस्थानीं प्रस्थान॥

दुसऱ्या प्रसंगीं ते म्हणतातः —

जग देव परि निवडीन निराळें। ज्ञानाचे आंधळें भारवाही॥
परपीडक तो आम्हां दावेदार। विश्वीं विश्वंभर म्हणवूनि॥...
तुका म्हणे मूर्ती साक्ष नारायण। अवगुणीं दंडण गुणीं पूजा॥

**शिवाय नाथभागवत अ. ३ ओ. ३७०-३७७ व अ. २ ओ. ४१६-२४**

दुखाचा अनुभव हीं व्यवहारास आड येत नाहींत असें यांचें मत आहे हें टीपेंतील (पृ. १४७-८) उताऱ्यांवरून अगदीं स्पष्ट होत आहे.

या सर्वहि साधूंच्या मतानें वर वर्णिलेला अद्वैतानुभव हा श्रीगुरुकृपेनें प्राप्त होणाऱ्या ज्ञानाचें फल आहे. व म्हणूनच या सर्वांच्या मतें साधनांतलें मुख्य साधन श्रीगुरुसेवा ही होय. पण शिष्यास हा वेदांतील उच्चतम अनुभव प्राप्त करून देणारे गुरु अडक्याला मिळण्याइतके सवंग नाहींत. श्रीगुरुची गांठ पडणें ही कठिणतर गोष्ट आहे. ईश्वरकृपेनेंच ती गोष्ट घडून येणारी आहे. येवढेंच नव्हे; तर ईश्वरच आपल्या भक्ताची निष्काम कर्मरूपी सेवा पाहून संतुष्ट होतो व त्यास गुरुरूपानें भेट देतो. अर्थात् साधनाचा आरंभ म्हणजे ईश्वरार्पणबुद्धया स्वकर्म करणें हा होय. तें अर्पण योग्य रितीनें होऊन अंतःकरण शुद्ध झालें कीं त्या अंतःकरणास भगवंताचा वेध लागतो. तें त्याचा थांवा करतें व ह्याच्या कळवळ्याच्या धांव्यास देव प्राप्त होतो. या साधन विचारांत एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. सर्व साधु ( रामदासांसह ) एकजात 'भगवन्नामावर' अतीशय भर देतात. स्वकर्म टाकावें व हें नामस्मरण करावें असें कोणीहि सांगत नाहीं. पण स्वकर्म करीत असतां याची जोड अवश्य आहे. या अनुसंधानांत कर्म घडलें नाहीं तर जीव तें न करण्याबद्दल जबाबदार नाहीं. यासच भागवतधर्म म्हणतात. या नामाच्या योगानेंच कर्माचें जडत्व जाऊन तें सर्वांगपूर्ण होऊन मोक्ष देण्यास योग्य होतें. सप्रेम भगवद्भजनानें अंतःकरणशुद्धि कशी होते व भगवान् संतुष्ट होऊन भक्तावर प्रसाद कसा करतात, ही गोष्ट श्रीनाथांनीं भागवत अध्याय २ च्या शेवटच्या श्लोकांवरील ओव्यांत फारच सुंदर रीतीनें सांगितली आहे. या साधुसंतांनीं निवळ परमार्थाचाच उपदेश केला आहे असें नाहीं. पण यांचा मुख्य भर परमार्थावर होता हीहि गोष्ट खोटी नाहीं. सर्व साधूंनीं प्रसंगोपात्त व्यवहारांत वागावें कसें, जगांत कशी रहाणी ठेविली असतां इहलोकीं व पारलिकहि कल्याण होतें, याचें विवरण केलें आहे. यांत अर्थातच त्यांचा भर चातुर्वर्ण्यव्यवस्था व चतुराश्रम-व्यवस्था यांवर होता हें निराळें सांगावयासच नको. ज्या वर्णांत व ज्या आश्रमांत जो असेल त्यानें त्या वर्णाला व आश्रमाला योग्य अशीं कर्में करून आपला निर्वाह करावा, असाच त्यांचा उपदेश असे. त्यांत एकपत्नीव्रत, कुटुंबपोषणाची जबाबदारी, पितृमातृसेवा, देवभक्ति, सत्यभाषण, धैर्य, शौर्य, मान्यता वगैरे सद्गुणांचें वर्णन व कन्याविक्रय, परस्त्रीगमन, मद्यपान, अभक्ष्यभक्षण, खिस्तीचा व्यापार, नीचसेवा वगैरेंचा निषेध हे त्यांच्या शिकवणुकींत आहेत. ह्या सर्व उपदेशांत एकदोन गोष्टी विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. पहिली, या सर्व उपदेशांत मनुष्यानें आपला व्यवहार करावा परंतु त्यांत आसक्त राहूं नये हें तत्त्व विशेष बिंबविलें जात असे. दुसरें, प्रत्येक मनुष्यानें आपल्या पोटाकरतां दुसऱ्यावर भार उगाच घालूं नये असाहि त्यांचा उपदेश असे. यामुळेंच संन्याशाचा, बैराग्याचा, कानफाड्याचा वगैरे प्रकारचा वेष घेऊन जगास आपल्या पोटाकरतां नाडणाऱ्या लोकांचा

यांनीं तीव्र निषेध[1] केला आहे. तुकारामबोवांनीं तर कीर्तनावर पैसे घेणें म्हणजे 'मातेची भाड' घेणें होय असें प्रतिपादिलें आहे. याचा अर्थ खऱ्या त्यागाची त्यांस किंमत ठाऊक नव्हती असा नव्हे. कंथा प्रावर्ण। नव्हे भिक्षेचें तें अन्न॥ असें तुकारामबोवाच म्हणतात. परंतु देवाकरतां सर्व उपाधीचा त्याग करून राहणारा विरक्त विरळाच असावयाचा. पोट-बाबूच बरेचसे असावयाचे, असें जाणून त्यानीं भिक्षेचा निषेध केला आहे. तिसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे समाजास मंत्रतंत्र, जादुटोणा, खोटा गुरुमार्ग, दांभिकपणा वगैरे खुळांपासूनहि दूर करण्याचा ते अतीशय प्रयत्न करीत. शेवटची व सर्वांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे, हे साधुहि समाजाची, सबंध गांवाची म्हणून कांहीं कर्तव्यें समजत व तसा समाजिक ऐक्याचा व सामाजिक कर्तव्याचहि ते उपदेश करीत.

इतकें या संतांच्या शिकवणुकीविषयीं विधिमुखानें सांगून या विषयाची परिपूर्ति होणार नाहीं. कारण संतांच्या शिकवणुकीविरुद्ध निरनिराळे आक्षेप घेण्यांत आले आहेत. व ते आक्षेप खरे आहेत असें ठरल्यास आम्हीं संतांच्या धार्मिक चळवळीचा शिवाजी महाराज यांच्या राजकारणास उपयोग झाला हें जें वरती विधान केलें आहे त्याला वैय्यर्थ्य येईल. तेव्हां त्या आक्षेपांचें निराकरण करणेंहि अवश्य आहे. म्हणून आतां प्रस्तुत त्या आक्षेपांचा विचार करूं.

(१) या संतांच्या शिकवणुकीवर पहिला आक्षेप असा आहे कीं, 'तिजवर बौद्ध धर्माची छाप बरीच पडलेली दिसते.' पण या आक्षेपांत विशेष तथ्य नाहीं. खुद्द बुद्ध हा तत्त्वज्ञानापेक्षां तत्त्वज्ञानाच्या चर्चेस विटलेला उत्तम नीतिमान् असा साधु होता. आज खास त्याचें म्हणून जें तत्त्व-त्रय प्रसिद्ध आहे तें 'सर्वं क्षणिकं क्षणिकं, सर्वं दुःखं दुःखं, सर्वं शून्यं शून्यम्' येवढेंच आहे. पण सामान्य वर्ग हा बुद्धास या त्याच्या तत्त्वत्रयापेक्षां वैदिक धर्मांत सांगितलेल्या यज्ञीय हिंसेविरुद्ध जें त्यानें अहिंसेचें अवास्तव बंड उभारलें त्याबद्दलच अधिक ओळखत आहे. आतां या चार गोष्टींपैकीं या साधुसंतांच्या वाङ्मयांत कोणकोणत्या गोष्टींची छाप पडलेली दिसते हें पाहूं.

महाराष्ट्रांतील साधु व सुगत आणि सुगताचे माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक, वैभाषिक हे अनुयायी यांत मतैक्य कोणतेच बाबतींत नाहीं. उलट त्यांच्या व साधुसंतांच्या मतांत जमीनअस्मानाइतकें अंतर आहे. सुगत व त्याचे अनुयायी हे अस्सल नास्तिक, वेद व देव न मानणारे असे होते. यांपैकीं असत् ख्यातिवाले माध्यमिक तर आत्माच मानीत नाहींत. त्यांचा अनात्मवादच आहे. व बाकीचे जवळ जवळ बुद्धीलाच आत्मा मानणारे आहेत. आतां खुद्द ज्ञानेश्वरापासून तों तहत् बहिणाबाई निळोबापर्यंत सर्व महा-

---

१ भिक्षापात्र अवलंबणें। जळो जिणें लाजिरवाणें॥
ऐसियासी नारायणें। उपेक्षिजे सर्वथा॥
जगा घालावें सांकडें। दीन होउनि बापुडें॥
हेंचि अभाग्य रोकडें। मूळ आणि अविश्वास॥

राष्ट्रीय साधु आपण पूर्ण वैदिक धर्मानुयायी आहोंत, वेद ही आपली माता आहे; असें कंठरवानें सांगत आहेत.

> अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढवीती ॥
> नाहीं श्रुतिपरौति । माउली जगा ॥
> या कारणें बापा । जया आथि आपुली कृपा ॥
> तेणें वेदाचिया निरोपा । आन न कीजे ॥ ज्ञा. अ. १६
> शिखासूत्र तुझा गुंतला जमान । तोंवरी तूं जाण श्रुतिदास ॥
> बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥
> वेदशास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचे वदन नावलोकीं ॥ तुकाराम.

असाच वेदावरील त्यांचा विश्वास दाखविणारीं किती तरी प्रमाणें देतां येतील. वेदाच्या प्रामाण्यावरील विश्वासाबद्दल इतकीं प्रमाणें व मागें सांगितलेलीं चातुर्वर्ण्यावरील विश्वासाचीं प्रमाणें दिल्यावर न्यायमूर्ति रानडे यांच्या मताचें निराळें खंडन करण्याचें कारणच नाहीं. संतांचा धर्म हा वेदमार्गाविरुद्ध बंड नव्हतें. संतांना वैदिक व्यवस्थेतील कीड काढावयाची होती, तिलाच नाहींशी करावयाची नव्हती. तुकारामबोवांच्याच भाषेंत बोलावयाचें म्हणजे, लुप्तप्राय होत चाललेल्या वैदिक धर्मास 'उजळा' देण्याचा हा यत्न होता.

या दोहोंमधील दुसरा महत्त्वाचा फरक म्हणजे आत्मवाद अथवा अनात्मवाद याबद्दलचा होय. महाराष्ट्रांतील या काळांतील कोणताहि साधु अनत्तावादी, क्षणिक विज्ञानवादी अथवा निरीश्वरवादी नाहीं. ते निरीश्वरवादी नाहींत हें तर प्रमाणें देऊन सिद्ध करण्याचें कारणच नाहीं. कारण त्यांचेवरच पुष्कळ लोकांचा असा आक्षेप आहे कीं, ते जगास विसरून 'देवपिसे' झाले होते. राहिला प्रश्न अनत्तावादाचा. तोहि सहज खोडून टाकतां येण्यासारखा आहे. प्रस्तुत निबंधाच्या चर्च्य विषयाच्या दृष्टीनें हा महत्त्वाचा मुद्दा नसल्यानें एक-दोन प्रमाणें देऊनच काम भागवूं.

> आत्मयाच्या साखा । न पडेचि दुसरी रेखा ॥ ज्ञानदेव
> भूतीं भगवद्भाव । मात्रा सहित जीव ॥
> अद्वैतीं तो ठाव । निरंजनीं एकला ॥ तुकाराम
> शून्यसिद्धांतबोधु । कवणी सत्ता होय सिद्धु ।
> नसता हा अपवादु । वस्तूसि जो ॥ ज्ञा. अमृतानुभव.

तात्पर्य, बुद्धाच्या 'सर्वं शून्यम्' याचा या साधुसंतांवर कांहींएक परिणाम झाला नव्हता हें उघड आहे. या साधुसंतांनीं दयेचें व अहिंसेचें फाजील बंड माजविलें व सर्व राष्ट्रच्या राष्ट्र निर्बळ, मेंगें करून सोडलें; त्यांतली प्रतिकारशक्ति सर्व घालविली; असेंहि या आक्षेपकांचें एक म्हणणें आहे. तेव्हां साधुसंतांच्या शिकवणुकींत त्यांना या दृष्टीनें नांवें ठेवण्यास जागा आहे किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे. बौद्ध धर्मांतील अहिंसेसंबंधींहि कांहीं गोष्टी या बाबतींत लक्षांत घ्याव्या लागतील. बुद्ध हा अहिंसेचा उपदेश

करीत होता. पण येवढ्यावरून त्याचे धर्मांत मांसाशन निंद्य गणलें गेलें होतें असा कोणाचा समज असल्यास तो चुकीचा आहे. बुद्धाचे अनुयायी आजहि मांसाशन करणारे आहेत. साधुसंतांनीं अहिंसा, दया यांचा उपदेश लोकांना केला व लोकांना निर्बल बनविलें म्हणजे काय याचा विचार करण्यासाठीं त्यांचेच ग्रंथांतील अहिंसानिदर्शक कांहीं उतारे[१] वाचून पाहिले असतां या साधुसंतांनीं अहिंसेची व भूतदयेची थोरवी गाइली, ही गोष्ट खरी असली तथापि ते या सद्गुणाच्या व्याप्तीची मर्यादा पूर्णपणें जाणून होते; असेंच दिसून येईल. धर्म हा मनुष्यांत असणाऱ्या पशुवृत्तींना निर्बंध घालण्याकरितां आहे. व या साधुसंतांनीं त्याचाच उपदेश केला यांत कांहींएक गैर नाहीं. कारण, धर्म जेव्हां दया, अहिंसा या सद्गुणांच्या मर्यादा न ओळखतां त्यांचे अवास्तव गोडवे गाऊं लागतो तेव्हां यांत गैरवाजवीपणा येतो. पण तसा प्रकार या साधुसंतांच्या बाबतींत तरी खास नव्हता, ही गोष्ट पुढें दिलेल्या त्यांचे ग्रंथांतील प्रमाणांवरून उघड होणारी आहे. या बाबतींतील ज्ञानेश्वरांचें विवेचन अत्यंत मार्मिक आहे. आपल्या टीकेंत याज्ञिक अहिंसेबरोबर मनुष्याचा जीव रक्षण करण्याकरतां निर्माण झालेलें जें आयुर्वेदशास्त्र याचाहि त्यांनीं अंतर्भाव केला आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ज्ञानोबारायांचा अर्थ वरवर पाहणाऱ्यास जसा वाटतो तसा घेतल्यास ज्ञानेश्वरांना आयुर्वेदहि नको होता असेंच वाटेल. ज्ञानेश्वर महाराजांनीं या ठिकाणीं जी चर्चा केली आहे त्याचा खुलासा असा आहे कीं, अहिंसेच्या प्रश्नाचा तात्त्विक व व्यावहारिक या दृष्टीनें विचार व्हावयास पाहिजे. अद्वैत मानून एकाची हिंसा करावयाची व एकाचें जतन करावयाचें हें तत्त्वज्ञानास धरून होणार नाहीं. त्या दृष्टीनें आपलीं नखें काढणें, दुसऱ्याकडे रागानें पहाणें, अथवा बोलणें, हेंहि हिंसेंतच जमा होईल. म्हणून ज्या कोणास ही अहिंसा आहे असें समजून अहिंसेची कृती करावयाची असेल त्यानें नुसतें आहुत्या देऊन भागावयाचें नाहीं, अगर मनुष्याचाच जीव रक्षण करून भागणार नाहीं, अथवा पाणी गाळून पिऊन भागणर नाहीं. येवढेंच करणें म्हणजे शरिरावरील एक केस ठेवावयाचा व एक उपटावयाचा असेंच होणार आहे. एवढ्याकरतां पूर्ण अहिंसा-कृति करणें झाल्यास ती श्रीज्ञान-

---

१ ज्ञानेश्वर– भूतमात्राचेनि नांवें । तृणातेंहि नासुडावें ॥
किंबहुना सांडावें । छेदभेद ॥ ज्ञा. अ. १७

ज्ञानेश्वरी अध्याय तेरामध्यें ओवी २१६ पासून तों ओवी ३११ पर्यंत जवळजवळ शंभर ओव्या खर्च करून ज्ञानेश्वरांनीं अहिंसेचें वर्णन केलें आहे. त्यांत याज्ञिक, आयुर्वेदीय व जैन हीं अहिंसेचीं मतें पूर्वपक्षांत घालून पुढें स्वमत सांगितलें आहे. तें संपूर्ण वर्णन अत्यंत काव्यमय असून प्रत्येक अहिंसावाद्यानें तें वाचून मनन करण्याजोगें आहे.

नाथ– भागवतें अध्याय ५ श्लो. १३ वरील ओव्या.
जीवें जीव नेणें पापी सारिखाची ॥
बळी दुजयाची कापूं बैसे ॥ (सर्व अभंग)
ऋणवैरहत्या ॥ हें तो न सुटे न देतां ॥ तुकाराम.

देवांनीं म्हटल्याप्रमाणें कोणच्याच इंद्रियाकडून व केव्हांहि कांहींहि काम होतां कामा नये. परंतु तें मनुष्यजीवनास कितपत शक्य आहे तें ज्याचें त्यानेंच पहावें. तेव्हां अहिंसेची व व्यवहाराची सांगड ज्ञानांत बसते व ती अशी कीं, मूळ अहिंसा हें एक विशिष्ट प्रकारचें कर्म अथवा कर्माभाव नव्हे, तर ती अंतःकरणवृत्तीचा गुण आहे. वैद्य हा रोग्याचें गळूं फाडून वरवर हिंसा करतोसा दिसला तरी तो तें कर्म, रोगी बरा व्हावा म्हणूनच करीत असल्यामुळें ती अहिंसाच आहे. खरा अहिंसावादी नखेंहि काढीत नाहीं, असें म्हणणारे श्रीज्ञानेश्वरच,

'तया करणेया आंतु । घडो कां त्रैलोक्याचा घातु ।
परि तेणें केला ही मातु । बोलूं नये ॥' असें म्हणतात.

व तेच सोळाव्या अध्यायांतः—

जगाच्या सुखोद्देशें । शरीर वाचा मानसें ।
रहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥

अशी अहिंसेची सुटसुटीत व्याख्या करितात.

नाथ— (दया प्रश्रय वगैरे) करितां **यथोचित** अर्पण । जरि क्रिया होय भिन्न भिन्न ।
तरी अंतरश्रद्धा अभिन्न । हें मुख्य लक्षण भागवतधर्मीं ॥ नाथभागवत अ. ९

तुकारामबोवाः– करी यापरी स्वहित । विचारूनि धर्मनीत ॥
हत्या क्षात्रकर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥
पुण्य करितां होय पाप । दुध पाजुनि पोशिला साप ॥
तुका म्हणे संतीं । करूनि ठेविली आइति ॥

तुकारामबोवा वगैरे अव्यवहार्य कल्पनेनें भरलेले होते असें म्हणणाऱ्या लोकांनीं हा संपूर्ण अभंग जरूर वाचून पहाण्यासारखा आहे. तुकोबांच्या अहिंसेचें तत्त्वहि ज्ञानोबाच्या तत्त्वाप्रमाणेंच खालील वाक्यांत भरलेलें आहे.

'कोणाही जीवाचा **न घडावा मत्सर** । वर्म सर्वेश्वर–पूजनाचें ॥

जसें अहिंसेचें तसेंच अहिंसेजवळ येणाऱ्या 'दया' या वृत्तीचें. या गुणाचीहि मर्यादा हे सर्व साधु जाणत होते.

ज्ञा.— अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहालें द्रवीभूत ।
तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥
अगा गोक्षीर जरी जाहालें । तरी पथ्यासि नाहीं घेतलें ।
ऐसेनिहि विष होय सुदलें । नवज्वरीं देतां ॥
तैसे आनीं आन करतां । नाशु होईल हिता ॥ ज्ञा.अ. २ ओ.१८३-८५
दुर्जनासी करी साहे । तोही लाहे दंड हे ॥
दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥

तुका म्हणे नखे । काढुन टाकिजती सुखें ।।
तुका म्हणे त्याचें । पाप नाहीं ताडणाचें ।। तुकाराम १२३४.

या साधुसंतांनीं प्रतिकारशक्ती घालवली का योग्य पायावर तिचा पुरस्कार केला हें पुढील कडव्यांवरून स्पष्ट करून येईल.

दया तिचें नांव भूताचें पाळण । आणिक निर्दळण कंटकाचें ।।
दंड अन्यायाचे माथां । देखोनि करावा सर्वथा ।।
अन्यायासी राजा जरी न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना ।।
तुका म्हणे संतां करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां ।।
होईल तितुकें बळ । फजित करावें तें खळ ।।
मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास । कठीण वज्रास भेदूं ऐसे ।।
निवडावे खडे । तरी दळण ओजें घडे ।।
धर्माचें पाळण । करणें पाषांडखंडण ।।

ब्रह्मश्री दिवेकरशास्त्री हे किर्लोस्कर-खबरमध्यें 'समर्थपूर्वकालीन संतांमध्यें सत्य अहिंसा, समदृष्टि हीं तत्त्वें केव्हां पाळावींत व केव्हां पाळूं नयेत हें तारतम्यज्ञान नव्हतें,' असें म्हणतात. परंतु या सर्व वाक्यांवरून हे साधुसंत अहिंसा, दया या सद्गुणांची मर्यादेबाहेर वाढ झाल्यास ती समाजास कशी विघातक होईल व मग 'धर्मीअंगींच अधर्म' कसा होईल हें जाणून होते असें स्पष्ट दिसतें. त्यांनीं समाजाचें बळ तामसीवृत्तीवर न उभारतां सबल, प्रतिकारक्षम पण सात्त्विक वृत्तीवर उभारण्याचा प्रयत्न केला. आतांपर्यंत दिलेल्या त्यांच्या मतांत बौद्धधर्मांतील अहिंसेशीं कितपत साम्य आहे हें वाचकांनींच ठरवावें. यांच्या ग्रंथांतूनच यज्ञयागादिकांपेक्षां नामस्मरण वगैरेंचें महत्त्व वर्णन केलें आहे ही गोष्ट खरी आहे. पण त्याचें कारण 'कलीं न घडे साधन' अशी त्यांची समजूत होती हें आहे. त्यांनीं अहिंसेचें स्तोम माजविलें नाहीं हें सिद्ध करण्याकरतां जीं प्रमाणें दिलीं आहेत त्यांवरून त्यांनीं समाजांतली प्रतिकारशक्ति कमी केली हाहि आक्षेप दूर होण्यासारखा आहे. येशु ख्रिस्तानें पर्वतावरून केलेल्या उपदेशांत आपल्या शिष्यांस खालीलप्रमाणें उपदेश केला आहे. " But I say unto you, that you resist not evil but whosoever shall smite thee on thy right cheek, turn to him the other also " St. Matthew VI. 39 येशूच्या अनुयायांनीं या उपदेशाच्या मर्यादा जाणल्या व तें तत्त्व अमलांत आणलें. व ज्यांच्या धर्मांत हें तत्त्व आहे ते आज जगाच्या मोठ्या विभागावर राज्य करीत आहेत. परदास्यांत सांपडल्यामुळें आम्ही मात्र अशा वाक्याजवळ जवळ येणारीं कांहीं वाक्यें शोधून आमच्याच साधुसंतांना, त्यांनीं घातलेल्या मर्यादेचें मर्म न समजल्यामुळें, 'अव्यवहार्य' म्हणून त्यांसच नांवें ठेवीत आहोंत. हा दृष्टिकोनांतील फरक भिन्न परिस्थितीमुळेंच असावा. आणखी काय ? आमच्या साधुसंतांच्या ग्रंथांतूनहि क्षमेचें महत्त्व गाइलेलें आढळून येतें. पण अशा अभंगांचा विचार करतांना एक गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत ठेविली पाहिजे

कीं, हे अभंग त्यांनीं सर्व समाजास म्हणून उपदेशिलेले नाहींत. साधूंनीं केलेले अभंग म्हणजे वर्तमानपत्रांत सर्वांच्या वाचनाकरितां लिहिलेले लेख नव्हत. ते निरनिराळ्या गांवीं निरनिराळ्या प्रसंगीं, प्रसंगविशेषीं, निरनिराळ्या व्यक्तींकरतां म्हणून केलेले असतात. अर्थात् ते त्या उद्देश्य व्यक्तीच्या भूमिकेस साजेसेच असतात. तेवढ्यावरून सर्व समाजास ते असाच उपदेश करीत असले पाहिजेत असा अर्थ करणें चुकीचें आहे. येवढ्याकरतां 'क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं' असें म्हटलेलें सांपडलें कीं लगेच यानें राष्ट्र पंगू बनविलें हें म्हणणें धोक्याचें आहे. उलट, एकाद्याच्या ग्रंथांत 'झोडावे मारावे' असें एकादें वाक्य आलें तर त्यानें राष्ट्र प्रतिकारक्षम केलें असें ठरविणें चुकीचें आहे. तात्पर्य, साधूंनीं राष्ट्र प्रतिकारक्षम केलें किंवा निर्बल, निःसत्व केलें हें पहाणें झाल्यास त्यांच्या सर्व लिखाणाचा विचार करून पूर्वापर संबंध लावून त्यांतून निष्कर्ष काय निघतो हें पाहून मगच तें ठरविलें पाहिजे. हल्लींच्या सत्याग्रहाच्या तत्त्वांत तर, अचल अविकार्य सहनशीलता हा प्रतिकाराचा निःशस्त्र मार्ग रूढ होत आहे. अशा काळीं लोकांच्या ठिकाणीं 'स्वधर्म' -प्रेम जागृत करून नाठाळाचे माथीं काठी देऊं व घा असें शिकविणारे संत राष्ट्रास निर्बल करणारे होते हें म्हणणें निःसंशय धाष्टर्याचेंच होईल.

(२) या साधुसंतांवरचा दुसरा आक्षेप असा आहे कीं यांच्या शिकवणुकींत जीं तत्त्वें भरलेलीं आहेत तीं राष्ट्रीय जीवनास विघातक अशीं आहेत. असलीं तत्त्वें यांनीं प्रसृत केलीं पण त्यांना सुधारणारे कल्पक, ब्रह्मतेजसंपन्न, योगेश्वर समर्थ रामदासस्वामी उत्पन्न झाले म्हणूनच शिवाजीराजे यांस कार्य करतां आलें, व महाराष्ट्रधर्म वांचला. नाहींतर महाराष्ट्रधर्माची गत कांहीं धड नव्हती. साधुसंतांच्या वाङ्मयांतून या आक्षेपकांच्या दृष्टीनें विघातक तत्त्वें वेंचून काढलीं तर तीं खालीलप्रमाणें देतां येतील: — (१) दैववाद, (२) जगन्मिथ्यात्व व क्षणभंगुरता, (३) जगाचें दुःखरूपत्व, (४) प्रपंच व अभ्युदयाविषयीं अनास्था आणि परलोकदृष्टि, (५) कर्मसंन्यास व भक्तिमार्ग, (६) विठोबा या सहिष्णु दैवताची उपासना, (७) जगदुद्धाराच्या अचाट, अवजड व अव्यवहार्य कल्पना. (८) सर्वत्र एकच देव वसतो; रामरहिम एकच. या आक्षेपांचा विचार करीत असतां आम्ही समर्थ रामदासस्वामी यांच्या मतांचा तुलनेकरतां उल्लेख करणार आहोंत. म्हणून येथें प्रारंभींच येवढें सांगणें इष्ट आहे कीं, आम्हांस श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचे संबंधानें परम आदर आहे. व त्यांच्या ठिकाणीं जाज्वल्य देव-राष्ट्र-धर्म-प्रेम होतें हेंहि आम्हांस मान्य आहे. त्यांनीं राजकारणाचा, व व्यवहाराचा, उपदेश केला हीहि गोष्ट आम्हांस मान्य आहे. परंतु अलीकडे त्यांचें 'संतत्व', त्यांची थोरवी, त्यांनीं 'देशद्रोही तितुके कुत्ते । मारोनि घालावे परते', 'बुडाला औरंग्या पापी' वगैरे उद्गारांवर अधिष्ठित होत आहे. व या वचनांशीं तुलना करून ज्यांच्यांत अशीं वचनें नाहींत ते राष्ट्रप्रेमरहित, त्यांनीं देश बुडविण्यास मदत केली, असा नवीन पिढीचा समज होऊं पहात आहे. त्यांतील चूक आम्हांला दाखवावयाची आहे.

या साधुसंतांनीं लोकांना यत्नेश्वराचें पूजन शिकवून त्यांच्यांत स्वसामर्थ्याची

जाणीव, उत्साह व आत्मविश्वास उत्पन्न करण्याचे ऐवजीं त्यांस 'असेल माझा हरि तर देइल खाटल्यावरी' असला घातुक उपदेश केला. त्या योगानें, असलेली परिस्थिति देवानें अथवा दैवानें, आपल्यापेक्षां अधिक सामर्थ्यवान् अशा कोटीनें, उत्पन्न केली आहे; त्यांत हातपाय हालवून कांहीं उपयोग नाहीं, तेव्हां असेल त्यांत आनंद मानावा हेंच चांगलें; असें मानून लोक परदारयांतच, तें घालविण्याचा प्रयत्न न करतां खुशाल स्वस्थ बसले.

तात्पर्य, शिवाजी महाराज यांनीं प्रयत्न करण्याचे पूर्वी त्यांच्या इतका यशस्वी प्रयत्न मुसलमानांना घालवण्याचा कोणीं केला नाहीं, याचें सर्व खापर साधुसंतानीं लोकांना शिकविलेल्या दैववादामुळें उत्पन्न झालेल्या घातुक संतोषवृत्तीवर फोडलें पाहिजे. पण महाराष्ट्राच्या सुभाग्यानें समर्थ रामदासस्वामींचा अवतार झाला. स्वामींनीं लोकांना 'यत्न तो देव जाणावा' असें शिकवलें. लोकांत त्या योगानें नवचैतन्य उत्पन्न झालें, तरुणांचे बाहु स्फुरूं लागले, प्रचंड संघटना झाली व स्वराज्यस्थापना झाली, असें या आक्षेपकांचें म्हणणें आहे.

हा आक्षेप आणणारे लोक एक मुख्य गोष्ट विसरतात. दैववाद हा व्यवहाराचे प्रगतीस जसा फारच घातुक आहे तसाच तो परमार्थाचेहि प्रगतीस फारच घातुक आहे. व्यवहारांत, त्याचप्रमाणें परमार्थांतहि दैववादाचा उपयोग करतां येतो, व पुष्कळ लोक तसा करतात, ही गोष्ट श्रीतुकारामबुवादि साधू यांस माहीत नव्हती असें नाहीं. तुकोबा म्हणतात "भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी" अर्थात् दैववादाचा हा उपयोग—दुरुपयोग—माहीत असूनहि ते लोकांस दैववादच शिकवीत राहते तर तें त्यांचें करणें आपल्या पायांवर आपणच धोंडा पाडून घेण्याइतकें तात्त्विकदृष्ट्या वेडगळपणाचें झालें असतें. सिसिली देशांत ॲबडेरा गांवीं, इसवी सनापूर्वी चारशें वर्षें, प्रोट्यागोरास या नांवाचा एक मोठा वावदूक, चलाख, नास्तिक तत्त्ववेत्ता (Sophist) होऊन गेला. त्याचा धंदा पैसे घेऊन लोकांना नीति, तत्त्वज्ञान व कलाकौशल्य शिकवून हुशार करून सोडणें हा होता; व तो हें शिकवण्याकरतां आपलें गांव सोडून या गांवाहून त्या गांवास असा नित्य हिंडत असे. 'मनुष्य हाच सर्व वस्तूंचें प्रमाण आहे' (Man is the measure of all things) असा त्याच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य सिद्धांत होता. बरें वाईट, सत्यमिथ्या, वगैरे ठरविण्याची कसोटी म्हटली म्हणजे प्रत्येक मनुष्याचें मनच होय. अशा अर्थाचा जो वरील सिद्धांत तो, तो सर्व लोकांस सांगत असे. यावर प्लेटो नांवाच्या जगविख्यात ग्रीक तत्त्ववेत्त्यानें आपल्या 'थिॲटिटस्' नांवाच्या संवादांत केलेली टीका, अत्यंत मार्मिक व लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्यांतील एक मुद्दा असा आहे कीं, जर प्रत्येक मनुष्याचें मन हेंच बरें वाईट ठरविण्याची कसोटी आहे, तर प्रोट्यागोरास यानें आपलें घरदार सोडून लोकांना तत्त्वज्ञान, नीति वगैरे शिकविण्याचे परिश्रम कां करावेत ? त्याचप्रमाणें तुकारामबुवा यांनीं सरसि दैववादाचाच उपदेश केला असतां, तर एकाद्या चाणाक्ष श्रोत्यानें त्यांना विचारलें असतें कीं "महाराज, दैववादच जर सत्य आहे तर मग आपण जाग्रणें करून, हाडाचीं

काढें करून रक्त ओकांपर्यंत हे उपदेशाचे श्रम फुकट कां करतां ? " व हें त्या श्रोत्यांचें विचारणें अयोग्यहि न ठरतें. तात्पर्य, तुकारामबुवादि साधु दैववादच शिकवीत राहिले असें मानलें तर, हा दैववादाचा बाण आपल्यावरच उलटेल, हें न कळण्याइतके ते अज्ञानी होते असें समजावें लागेल. पण त्यांच्या अभंगांच्या जोरदार वाणीवरून व त्यांचीं जीं यासंबंधीं स्पष्ट वचनें आहेत त्यांवरून, ते असे अज्ञानी बुवा होते, अगर असला दोन्ही लोकीं घातुक दैववाद त्यांनीं शिकविला, असला निष्कर्ष काढावयाला त्यांच्या अभंगांत फारशी जागा नाहीं, अशी या लेखकाची समजूत आहे. दैववादी कांहीं वाक्यें आहेत, पण त्यांच्या तोडीस तोड, किंबहुना सरस व दैववादाची व प्रयत्नवादाची सुंदर सांगड घालणारीं, अशींच पुष्कळशीं वाक्यें[१] आहेत.

शेवटचें कडवें हें विशेष अर्थपूर्ण आहे. यांत दैव व प्रयत्न यांची संगति लाविली आहे. दैववादावरच भिस्त ठेऊन प्रयत्न करणें अवश्य आहे, असें श्रीतुकारामबुवा यांत सांगत आहेत. 'पुढें तुझें जें संचित होणार तें तूंच आज करणार आहेस, व आज जें तूं भोगतोस हें तुझ्याच मागील कृत्यांचें फळ आहे; एवढ्याकरितां पुढची जबाबदारी ओळखून आज तूं उत्तम कर्में कर,' असा त्यांचा उपदेश आहे. दैववादाचा उपयोग प्रयत्नवाद शिकविण्यास ते करतात. यावरून ते हताश दैववादी होते, कां उत्साहपूर्ण प्रयत्नवादी होते, याचा विचार करण्याचें आम्हीं आमच्या वाचकांवरच सोंपवितों. प्रयत्नवाद शिकविणारे त्यांचे वाटेल तितके अभंग देतां येतील.[२]

(२) जगन्मिथ्यात्व व क्षणभंगुरता: — बुद्धानें सर्वं क्षणिकं क्षणिकं असा उपदेश केला; त्याचाच परिणाम या साधुसंतांचेवर झाला. व यांनीं

'नाशवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान'

असला सर्व संसार लटका आहे, असा उपदेश केला. यांनीं हा उपदेश केला ही गोष्ट निर्वि-

---

१ आपलें आपण न करूं हित। करूं हें प्रमाण संचित॥
तरी मी नष्टचि पतित। तुका म्हणे संत मज हांसती॥ १॥
एकीं केली हातोफळी। ठाया बळी पावले॥ १॥
येथें न घलीं न घलीं आड। संचितसा शब्द नाड॥
उठा उठी गोड। बीजें बीज वाढवीं॥ १॥
हातीं हित आहे करील तयासी। म्हणऊनि ऋषीं सांगितलें॥ १॥
भविष्य न सुटे भोगिल्यावांचूनी। संचित जाणोनी शुद्ध करा॥

२ ओलें मूळ भेदी खडकाचें अंग। अभ्यासासी सांग कार्यसिद्धि॥ सर्व अभंग
जीवासाठीं गौरव वाढे। आहाच जोडे तें नव्हे॥
तुका म्हणे रणीं। जीव देतां लाभ दुणी॥
शोकें शोक वाढे। हिंमतीचे धीर गाढे॥
येथें केलें नव्हे काई। लंडीपण खोटें भाई॥
करिती होया होय। परी नव्हे कोणी सहाय॥
तुका म्हणे शूर। व्हावें धुरेसीची धूर॥

वाद आहे. पण त्यांनीं जें सांगितलें तें खोटें आहे का ? या साधूंनीं नुसता असा उपदेश केला एवढ्यावरूनच त्यांना राष्ट्राचे हितशत्रू गणतां येणार नाहीं. ते शत्रु अथवा मित्र होते हें ते या सत्य गोष्टीवर पुढें जें अनुमान काढतील त्यावर अवलंबून आहे. खुद्द उपनिषदांतून ' परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायात् ' ' श्वोभावा मर्त्यस्य यदन्तकैतत् ' असलीं वचनें आहेतच. तर मग यांचेवर औपनिषदिक तत्त्वज्ञानाचा परिणाम झाला होता असें कां म्हणूं नये ? उपनिषत्कालानंतर उपनिषद् प्रमाण मानणारा कोणीच वैदिक धर्मानुयायी राजा झाला नाहीं का ? व त्यास हीं प्रमाणें आडवीं आलीं नाहींत का ? खुद्द बुद्धाचे अनुयायी असाच उपदेश बुद्धापासून ऐकूनहि राज्यकर्ते होऊन गेले. मग आम्हांलाच तेवढा हा उपदेश एवढा घातुक का वाटावा ? का अशोकादिक हे बुद्धास मानीत; पण या आज्ञेपुरते मानीत नव्हते व आम्ही मात्र साधूंची आज्ञा तंतोतंत पाळतों व त्यामुळें या निकृष्ट अवस्थेस येऊन पोंचलों ! वास्तविक साधूंनीं क्षणभंगुरता अथवा जगताचा लटकेपणा सांगितला हा मरणाची वाट पहात बसण्याकरतां नव्हे; तर आळस झाडून उद्योगास आरंभ करण्याकरतांच होय. तुकारामबोवा आपल्या ' मराठी ' भाषेंत म्हणतात ' मरण मागे तो गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ।।' अर्थात् असा क्षणभंगुरवाद हा निरुत्साह करण्याकरतां नव्हे तर झडझडोन कर्मप्रवृत्त करण्याकरतां आहे.[१]

या साधुसंतांच्या शिकवणुकीचें असें आहे कीं, त्यांचीं शिकवणूक ' सांडी गवसी ' अशी करणारी नव्हे. जगांत केव्हांहि निरनिराळ्या अधिकाराचे निरनिराळे लोक असावयाचेच. त्या सर्वांस लागू पडतील अशा त्रिकालाबाधित तत्त्वांचा वर्षाव ' वृष्टिन्यायें ' त्यांचे मुखांतून होत असतो. यामुळें ज्या मनुष्यास जें पाहिजे तें त्यांत सांपडतें हा फायदा होतो. पण अज्ञान्याच्या ठिकाणीं हा गुणच दोष होऊन उलटतो. येशूच्या कळपांतील लोकं तुकारामबोवांच्या विरुद्ध अज्ञपणानें हे साधु अपुरे होते, यांच्या शिकवणुकींत विसंगतता आहे असें दाखविण्याकरतां त्यांच्या अभंगांत सकृत्दर्शनीं विसंगत दिसणारीं असलीं वाक्यें दाखवितातच. आपणहि ज्या परिस्थितींत असतों त्या परिस्थितीस अनुकूल अशीं मोठ्या माणसांचीं वाक्यें काढून आपलें समाधान करून घेतों अशांतलाच प्रकार या वादासंबंधींहि आहे.

'संसार लटका, शरीर क्षणभंगुर, तेव्हां एकदम उठा व रानांत जा, एवढाच उपदेश त्यांना करावयाचा असता तर या जगांत मानानें रहाण्याचा उपदेश ते साधु करितेचना.

घरीं रांडापोरें मरती उपवासी । सांगे लोकापाशीं थोरपण ॥ तु ॥<br>
नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥ तु० ॥<br>
नये मरो लंडीपणें । काय बापुडें तें जिणें ॥ तु० ॥<br>
तुका म्हणे नांवें । कीर्ति आगळीनें जावें ॥ तु० ॥

---

१ 'मढें झांकुनियां करिती पेरणी । कुणबीयाचेवाणी लवलाहे ॥<br>
तयापरी करी स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥'

व्हावा वाटे जना । तुका म्हणे साठीं गुणां ॥
तुका म्हणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥

या साधुसंतांचीं शिकवणूक त्रिकालाबाधित सत्यावर उभारलेली आहे. या बाबतींत ज्ञानदेवांचा दृष्टांत द्यावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, 'उदया येतां गभस्ति । अशेषहि मार्ग दिसती,' पण आपण कोणच्या वाटेनें जावयाचें हें आपल्याला जिकडे जावयाचें असेल, व आपल्याजवळ जी साधनसामुग्री असेल त्यावर अवलंबून आहे. चौकांत उभा राहिलेला एकादा गृहस्थ, सूर्याला त्यानें आपणांस पाहिजे तोच मार्ग नेमका न दाखवतां सगळेच मार्ग त्यानें प्रकट केले म्हणून दोष देऊं लागला, तर तें जसें हास्यास्पद होईल, तसेंच या साधूंविषयीं बोलणेंही हास्यास्पद होईल. या दृष्टान्तांत फरक एवढाच कीं, साधु जोंपर्यंत हयात असतात तोंपर्यंत व्यक्तीस पाहून योग्य तो मार्ग ते दाखवितात. परंतु त्यांची मृत्युलोकची यात्रा संपली कीं मग त्यांचे ग्रंथ म्हणजे सूर्यासारखेच सर्व मार्ग प्रकट करणारे असतात. चालणाऱ्यानें 'शोध करून' चाललें पाहिजे. फुकाचा त्यांस दोष देऊन उपयोग काय ?

(३) तिसरा आक्षेप असा कीं यांनीं लोकांना संसार दुःखबांदवडी आहे, व त्याचा शक्य तितक्या लवकर त्याग करून मोकळे व्हा, असा उपदेश केला. यामुळें लोकांना प्रपंचांत रस वाटेनासा झाला व सर्व टाळ कुटूं लागले. खरोखरच जर सर्वांचीं अंतःकरणें देवाकडे लागलीं असतीं तर या साधूंना–व याला रामदासहि अपवाद नाहींत—आनंदच झाला असता. पण त्यांना माहित होतें कीं आपण जरी घसा कोरडा करून हें सांगितलें तरी जसें पाण्याच्या ओघाविरुद्ध पोहणें अशक्य, तसेंच सर्वांस हें अशक्य आहे. तुकारामबोवा म्हणतातः—'ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दाराधन' ॥ तेव्हां सर्वांनींच जगाचा त्याग करावा असें ते सांगतच नाहींत. स्वतःच तुकारामबुवा सांगतातः—जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥

सुखें करावा संसार । न संडावें दोन्ही बार ॥ दयाक्षमा घर । चोजवीत येतील ॥
जोडोनियां धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेच करी ॥

अर्थात् संसार दुःखबांदवडी आहे या त्यांच्या उपदेशाच्या बुडाशीं 'सुखाभिलाषी होऊं नका, सुखाकरितां कर्तव्य व नारायण यांस विसरूं नका, कोणासही 'पुरे वाटे' पर्यंत सुख मिळालें नाहीं, तेव्हां सुखाच्यापेक्षां अधिक जे पुरुषार्थ आहेत तिकडेच बघा, असाच हेतू आहे. रामदासस्वामीहि

जगीं सर्व सुखी असा कोण आहे । विचारी मना तूंचि शोधोनि पाहे ॥
देहेदुःख तें सुख मानीत जावें। असाच उपदेश करतात.

(४व५)वरील तीन आक्षेपांचें निरसन करण्याकरतां आणलेल्या पुराव्यावरून चौथा आक्षेप कीं, यांनीं लोकांचीं तोंडें केवळ परलोकाकडेच वळविलीं हा कितपत साधार आहे हें दिसून येणार आहे. सामान्यतः प्रवृत्ति आणि निवृत्ति हे दोन शब्द ज्या अर्थानें वापरतात त्या अर्थानें हे

संत केवळ निवृत्ति-प्रधानच होते असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं. जर यांना निवृत्ति-प्रधान म्हणावयाचें असेल तर त्या दृष्टीनें रामदासस्वामीहि निवृत्तिमार्गीच होते. ज्यांची कामगिरी महाराष्ट्राचे राष्ट्रीय जीवनास उपजीवी झाली असें सर्व समजतात ते समर्थ तरी काय सांगत होते हें पहाण्यासारखें आहे. तेही आत्मवस्तु गुरूअंजनाविण दिसत नाहीं (द. १ स. ९ ओ. २५।२६) सायुज्यमुक्ति आत्मनिवेदनभक्तीशिवाय नाहीं. ( द. ४ स. ९ ओ. १० ) व कर्मयोग संशयो भरला ( द. ५ स. १० ओ. १४ ) असेंच म्हणतात. हें सांगून रामदास जर निवृत्तिमार्गी होत नाहींत तर मग तुकारामबुवादिक कां व्हावे ? हें गूढच आहे ! ज्ञानेश्वरहि गीतेंत भगवें घेऊन होणारा संन्यास सांगितला आहे असें मानीत नाहींत. ' घडे ज्ञानप्रधान ऐसा । संन्यास जया वीरेशा । ' असला संन्यास गीतेंत आहे असें ज्ञानदेवांचें मत आहे. श्रीनाथतुकारामादिक संत बाह्य वेषधारी संन्याशांवर पुष्कळच कोरडे ओढतांना दिसतात. या सर्वांचा सिद्धांत ज्ञानानें मोक्ष होतो असाच आहे. परंतु त्याचा अर्थ सर्वच ज्ञान संपादण्यायोग्य आहे असा त्यांचा समज नाहीं. उलट या ज्ञानाचा अधिकारी विरळा असतो, बहुतेक कर्माचेच अधिकारी असतात, म्हणून ते अशा बहुजनसमाजाकरतां कर्माचाच उपदेश करतात व स्वतः कर्म करून दाखवितात—

' तेथ सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी ।
नैष्कर्मींही दावावी । आचरौनि ।
' जाणां नेणां सकळां । हा कर्ममार्ग कीर प्रांजळा ।
जैसी नांव क्रियाबाळा । तोयतोरणी ॥ ' असें ज्ञानोबा प्रतिपादन करतात.

ज्ञानानें मोक्ष होतो असें मानूनहि हे साधू ज्ञानवानानें लोकांकरतां अखंड कर्म करीत राहिलें पाहिजे असाच उपदेश करतात.

' देखें प्राप्तार्थ जे झाले । निष्कामता पावले ॥
तयाही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं — " ज्ञा.
विशेषें आचरावें । लागें संतीं ॥ ज्ञा.
बहु तूं झालासी चतुर शहाणा । शुद्ध आचरणा चुकों नको ॥
अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरली पाटी ॥
तैसे संत जगीं । क्रिया करूनि दाविति अंगीं ॥
बालकाचे चालीं । माता जाणोनि पाउल घालीं ॥
तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥
तुका म्हणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं परी जगीं करी उपकार ॥
आप तरे त्याकी कोन बऱ्हाई । औरनकुं भलो नाम धराई ॥
काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नहीं दूध चाखे ॥ सर्व अभंग
कहे तुका उपकार ही काज । सब कर रहिया रघुराज ॥ तु.

आतां ही गोष्ट खरी आहे कीं जरी यांनीं संन्यासाचा पुरस्कार केला नाहीं व ज्ञान्यानेंही लोकसंग्रह करावा असें सांगितलें, तरी पण तीव्र मुमुक्षु असला तरीहि त्यानें प्रपंचच करावा असें मात्र तें केव्हांहि सांगत नाहींत. या बाबतींत बाबू अरविंदघोष यांच्या गीतेवरील निबंधांतील 'गीताहृदय' या प्रकरणांतील खालील उतारा मननीय आहे. साधुसंतांच्या शिकवणुकीचेंहि मर्म त्यांत उत्तम रीतीनें दृग्गोचर होत असल्यानें उतारा लांब असूनही देत आहोंत.

"I cannot think that the Gita would solve such an inner situation by sending Buddha back to his wife and father and the government of the Sakya State, or would direct a Ramakrishna to become a Pundit in a vernacular shcool and disinterestedly teach little boys their lessons, or bind down a Vivekanand to support his family and for that to follow dispassionately the law or medicine or journalism. The Gita does not teach the disinterested performance of duties but the following of the divine life, the abandonment of all Dharmas, *sarvadharman*, to take refuge in the supreme alone, and the divine activity of a Buddha, a Ramakrishna, a Vivekananda is perfectly in consonance with this teaching. Nay, although the Gita prefers action to inaction, it does not rule out the renunciation of works, but accepts it as one of the ways to the Divine. If that can only be attained by renouncing works and life and all duties and the call is strong within us, then into the bonfire they must go, and there is no help for it. The call of God is imperative and cannot be weighed against any other considerations."

रामदासांच्या पूर्वीचे साधु भक्तिमार्गी होते असा एक आक्षेप घेण्यांत येतो. मग रामदास कोण होते ? रामदास आपण 'दासबोधांत' काय सांगतों म्हणून म्हणतात ? ते म्हणतात ' येथें बोलिला विशद । भक्तिमार्ग '. पारमार्थिक मार्गाच्या दृष्टीनें विचार केला तर रामदासस्वामी व तत्पूर्वीं झालेले इतर साधु यांत कांहींहि फरक नाहीं. गुरुकृपा, ज्ञानध्यान याच मार्गानें देवाची प्राप्ति होते, असें इतर साधूंप्रमाणें रामदासहि म्हणतात. फरक जर असला तर दोहोंनीं केलेल्या कर्ममार्गाच्या चर्चेच्या व्याप्तींत आहे. तोहि कर्माच्या फलासंबंधानें नाहीं. तुकारामबोवादिकांनीं जी कीर्तनभजनरूप भक्ति सांगितली ती रामदासानीं सांगितलेल्या भक्तीहून निराळी होती अथवा ती रामदासांना त्याज्य वाटत होती असें नाहीं. तुकारामबोवाहि 'भजनकीर्तनाचा' उपयोग व मर्यादा जाणत होते. ' करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ।' असेंच तुकारामप्रभृतिक म्हणतात.

तात्पर्य, हे संत भक्तिमार्गी होते म्हणजे उठावें त्यानें चोवीस तास टाळच कुटावेत

असें सांगणारे नव्हते. त्यांचे ठिकाणींहि तारतम्य होतें. विशेषतः तुकारामबोवांच्या पुरतें तरी त्यांची भाषा प्रसंगीं काटेतोल, मुद्देसूद व न्यायाची आहे असें दाखवतां येईल.

( १ ) विधीनें सेवन । विषय त्यागातें समान ॥

( २ ) भिक्षा आणि व्यवसाय । काला करी तो गाढव ॥

( ३ ) देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥

तात्पर्य, यांचा भक्तिमार्ग आचरट, अव्यवहार्य असा नव्हता, असें वरील कडव्यांवरून सिद्ध होत नाहीं काय ?

कर्मसंन्यासाचीहि हीच स्थिति आहे. रामदासस्वामींनीं ज्याप्रमाणें संन्यास घेतला नाहीं, त्याप्रमाणें नाथांनींहि संन्यास घेतला नाहीं. रामदास ब्रम्हचारीच राहिले पण नाथांनीं तर गृहस्थाश्रमहि पत्करला. तुकोबा हे संन्यासाश्रम ज्यांत विहित नाहीं अशा वर्णांत जन्मल्यामुळें त्यांचेसंबंधीं हा प्रश्नच उद्भवत नाहीं. परंतु यदाकदाचित् ते द्विजातींत जन्माला आले असते तरीहि त्यांनीं तो घेतलाच असता असें सांगतां येत नाहीं. उलट घेतला नसता असेंच म्हणावयास त्यांच्या अभंगांत पुष्कळ जागा आहे.

तात्पर्य, देहपातापर्यंत स्वार्थाची होळी करून केवळ लोक-कल्याणाकरितां लोकांत धर्माचें प्रेम उत्पन्न करण्याची ज्यांनीं खटपट केली त्यांस राष्ट्रबुडवे म्हणावे व भक्तिमार्गी म्हणून त्यांची निंदा करावी; हा केवळ काळाचा महिमा आहे.

( ६ ) सहावा आक्षेप असा कीं, यांचें पूज्य दैवत विठोबा हें सहिष्णु होतें (दिवेकरशास्त्री, किर्लोस्करखबर). आधीं विठोबा दैवत हें सहिष्णु दैवत आहे हें कोणीं ठरविलें ? हे ब्रह्मश्रींनीं ( १ ) मनानेंच ठरविलें ( २ ) का तुकोबांचे वगैरे ग्रंथ वाचून ठरवलें (३) का विठोबाचे भक्त आज ज्या स्थितींत आहेत त्यावरून ठरवलें ? दुसऱ्यावरून खास नाहीं. कारण खुद्द तुकाराम महाराज — जो या असुरांचा काळ । भक्तजन प्रतिपाळ । खेळे ही लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायावरी ॥ चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा । सकळ मुकुटमणिशूरा । अहो दातारा जगदातिया ॥

भक्तां राखे पायापाशीं । दुर्जनाशीं संहारी ॥

दुर्जनाचा येणें करूनि संहार । पूर्ण अवतार रामकृष्ण ॥

असें विठोबाचें वर्णन करतात. पण हें पहावें कोणी ?

आतां विठोबाचे भक्त हे सहिष्णु आहेत असें गृहीत धरून शास्त्रीबुवानीं हें अनुमान बांधलें असें म्हणावें तर शास्त्रीबुवांच्या सारखे व्युत्पन्न असली चुकी करतील हें संभवत नाहीं. आधीं सर्व वारकरी सहिष्णु नाहींत. त्यांच्यांतहि तंटे, भांडणें, फिर्यादी चालूच आहेत. पण घटकाभर धरलें कीं ते सहिष्णु आहेत. तरी त्यावरून बिचाऱ्या तुकारामबुवावर व देवावर तरी तसा आरोप शास्त्रीबुवा करणार नाहींत. कारण त्यांना माहित आहे कीं 'ससितूणधनुर्बाण' अशा श्रीरामाचे आधुनिक रामदासी भक्त हे तरी 'जयजय रघुवीरसमर्थ' असें ओरडून भीक मागण्यापलीकडे दुसरें काय करीत आहेत ?

तेव्हां यांपैकीं एकच बाजू शिल्लक राहते कीं, ब्रह्मश्रींनीं समर्थांच्या असुरहन्त्या जयिष्णु श्रीरामचंद्राचें वर्णन करण्याकरतां तुलनेस घाईघाईंत विठोबास सहिष्णु केलें येवढेंच !

श्रीपंढरीनाथ कटावर कर ठेवून उभे आहेत ही गोष्ट खरी. पण त्यांचे कटावर हात भक्तांस 'भक्त-लक्षण' दाखवण्याकरतां आहेत हें विसरतां कामा नये.

तसेंच हे साधुसंत असहिष्णु कां होते हें पाहणें असल्यास राघवचैतन्य, नृसिंहसरस्वती, मोरया गोसावी यांच्या चरित्राकडे पाहिलें पाहिजे. ही मंडळी अंगांत ताकद नव्हती म्हणून सहिष्णु होती असें नव्हे तर वाटेल तें करण्याचें सामर्थ्य अंगांत असल्यानें ही समर्थ मंडळी सहिष्णु असत. व प्रसंगविशेषीं यानीं आपली शक्ति दाखविलेलीच आहे. त्याकरतां गुरुचरित्र, चैतन्यकल्पतरु इत्यादि पाहावे म्हणजे मुसलमानांवरहि, कसें आक्रमण ते करीत हें दिसून येईल.

येऊन जाऊन श्रीनाथांचे गुरु जनार्दनपंत यांचें यासंबंधीं उदाहरण देण्यांत येतें. पण तेहि आपण करतों हें उत्तम आहे असें समजत नव्हते. आपल्याकडून नीच-सेवा घडली असें त्यांचे उद्गार प्रसिद्ध आहेत. पण त्यांचेच शिष्य हे आपल्या स्वामीस सोडल्यावर कधींच नोकरींत नव्हते हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. तात्पर्य, एकट्या जनार्दनस्वामीच्या उदाहरणावरून सर्व साधु सहिष्णु, दास्यांत आनंद मानणारे होते असें अनुमान करणें चुकीचें होईल.

(७)'या साधुसंतांच्या जगदुद्धाराच्या अचाट, अवजड, अव्यवहार्य, कल्पना होत्या' (दिवेकरशास्त्री). खरेंच, तसें नसतें तर

ज्ञानोबानीं— 'ये मराठीचीये नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाल करीं । ज्ञा. अ. १२
नाथानीं—संस्कृतवाणी देवें केली । तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली भा.अ. १

तुकारामबोवांनीं—

सांडोनिया रामराम । ब्राह्मण करिती दोमदोम ॥
संता नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥
न घडे यावरी न धरवे धीर । पीडितां हें राष्ट्र देखोनि जग ॥

कान्होबांनीं—

नमस्कारावया हरिदासां । लाज धरिती कांहीं गर्वसा ॥
पोटासाठीं खोसां । वंदिती म्लेंच्छाच्या ॥

असले उद्गार काढले नसते ! महाराष्ट्रभूमंडळांत, मराठींत ग्रंथसंपत्ति निर्माण व्हावी, मराठी भाषेचा गौरव वाढावा, महाराष्ट्रांतील आचांडाल लोक ज्ञानसंपन्न व सुखी व्हावेत, येवढ्याकरतां मराठी ग्रंथसंपत्ति निर्माण करणारे व महाराष्ट्रांतील लोकांनीं आशेनें मारले जाऊन मुसलमानांचे चाकर बनूं नये असला उपदेश करणारे हे संत निवृत्तिमार्गी, व यांच्या या जगदुद्धाराच्या कल्पना अव्यवहार्य, अवजड व अचाट आहेत असा कोण समंजस ( ? ) वाचक म्हणणार नाहीं !

(८) समर्थपूर्वकालीन संतांमध्यें ' रामरहिम सर्व देव एकच आहेत व सर्वत्र ईश्वर असतो ही कल्पना होती. समर्थांना ही कल्पना दुर्बल वाटली......'' दिवेकरशास्त्री.

समर्थ--पूर्वकालीन संत अद्वैती होते, अर्थात् त्यांना ब्रह्मदेवापासून पिपीलिकेपर्यंत एकच देव भरला आहे असें दिसत होतें. मग समर्थांचा काय वेगळा अनुभव होता ? समर्थ हे द्वैती होते काय? इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं, मनुष्यावर कित्येक वेळीं ' मेहरबानी करा व या स्नेह्यांपासून आमचें रक्षण करा ' अशी म्हणण्याची पाळी येतें. समर्थ हे समर्थ नसते तर शास्त्रीबुवांसारखे त्यांचे स्तुतिपाठक पुढें आले असतां त्यांसहि वरच्यासारखेंच म्हणावें लागलें असतें.

अद्वैतदृष्टीनें जेथें ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत एकच देव आहे असा अनुभव आहे, तेथें रामांत एक व रहिमांत दुसरा असा कोठून अनुभव येणार ? पण याचा अर्थ व्यवहारांत अथवा धर्माचरणांत हे साधु अद्वैतच करीत असत असें म्हणणें म्हणजे त्यांच्या ग्रंथांचें सूक्ष्म परिशीलन न करतां आपण बोलत आहोंत असें जगास दाखविण्यासारखें आहे. कारण तुकारामबोवा स्वत: म्हणतात, सर्व देवच आहेत हें खरें; पण कार्यकारणापुरता भेद मानला पाहिजे,

यज्ञ भूताच्या पाळणा । भेद कार्याकारणा
पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥

तसेंच उपासना मार्गांतहि हिंदूनीं ' यवनां 'च्या दैवतास भजावें असें त्यांनीं कोठेंहि सांगितलें नाहीं. उलट ब्राह्मणादिक ' पीरास ' भजूं लागले, स्नानसंध्या सोडून दोमदोम करूं लागले तर तुकोबादिकांनीं त्यांचा निषेधच केला आहे.

सरतेशेवटीं, या साधूंच्या शिकवणुकीचा राष्ट्राचे प्रगतीस कांहीं उपयोग होऊं शकला, का या शिकवणुकीनें उलट प्रगतीस बंधच दिला या प्रश्नाचा पूर्ण विचार होण्याकरतां ज्यांची शिकवणूक महाराष्ट्रास तत्कालीं उपकारक झाली असें सर्वच एक मुखानें म्हणतात, अशा समर्थ रामदास स्वामींच्या शिकवणुकीबरोबर यांच्या शिकवणुकीची तुलना करूं; म्हणजे सहजच चर्च्य प्रश्नाचा निकाल लागणार आहे. इतर साधुसंत व रामदास यांचें तत्त्वज्ञान व शिकवणूक यांचें परस्पर कोठपर्यंत जुळतें व कोठें भिन्नत्व येतें येवढें दर्शविण्यापुरतीच या ठिकाणीं चर्चा करावयाची आहे.

यांच्या तत्त्वज्ञानाचा विचार करण्यापूर्वी एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, ती ही कीं, साधु ही कोटी पंडित ( a philosopher ) अथवा राजकारणी पुरुष ( a politician ) याहून अगदीं वेगळी आहे. पंडित हा बुद्धीनें या जगताच्या बुडाशीं असलेल्या मूलतत्वांच्या स्वरूपाविषयीं कांहीं निश्चय करण्याचा प्रयत्न करतो. परंतु त्याजवळ सामान्यतः अनुभवाचें अंग नसतें. राजकारणी हा भौतिक सुख लोकांच्या पदरांत कसें पडेल याचा सामान्यतः उद्योग करतो. त्यास सामान्यत: या सत्तत्त्वाच्याकडे वळण्यास अवसरच नसतो. परंतु साधु हा याहून वेगळाच आहे. साधु हा प्राधुर्यानें स्वात्मानुभवी असतो. रामदास स्वामी हे संताची व्याख्या जवळ जवळ अशीच

करतात 'जो जाणेल भगवंत : तया नांव बोलिजे संत.' ( दशक ६ स. १ ओ. १६ ). पण याचा अर्थ तो साधु असूनहि पंडित असूं शकणार नाहीं, स्वदेशाभिमानी असूं शकणार नाहीं अथवा प्रसंगविशेषीं राजकारणपटुहि असूं शकणार नाहीं असें मात्र नव्हे. पण एकादा पंडित, स्वदेशाभिमानी व राजकारणधुरंधर असेलहि पण तेवढ्यानें तो साधू मात्र खात्रीनें होणारच नाहीं. हा फरक येथें इतका विशद करून सांगण्याचें कारण रामदास स्वामी हे मुळांत साधु अथवा संत होते. साधु या कोटींत इतरत्र क्वचितच सांपडणारी एक गोष्ट दृष्टीस पडते. ती ही कीं सर्व साधू एकच भाषा बोलतात, एकच अनुभव सांगतात, मग ते कोणच्याहि देशांत व कोणच्याहि काळांत व कोणच्याहि धर्मांत जन्माला आलेले असोत. यामुळेंच, रामदासांच्या शिकवणुकींत व इतर साधूसंतांच्या शिकवणुकींत फारसा फरक नाहीं व पडणेंहि शक्य नाहीं. येथें त्यांचे कोणकोणच्या बाबतींत ऐक्य आहे हें दाखवतों. पण तें दाखवीत असतां स्थलसंकोचास्तव आम्हीं फक्त रामदासस्वामींचीं व तींहि दासबोधांतीलच वचनें देतों. रामदासांचेहि इतर करुणाष्टकें, मनाचे श्लोक, रामायणें वगैरें-तील उतारे देत नाहीं, अथवा इतर साधूंचींहि वचनें देत नाहीं.

(१) मनुष्यजन्माचें साफल्य 'थोरला देव' ओळखण्यांत आहे. संसाराच्या बाजारांत देवाचा नफा पहा.

जेणें परमार्थ ओळखिला । तेणें जन्म सार्थक केला ॥
येर तो पापी जन्मला । कुलक्षया कारणें ॥

द. १ स. ९ ओ. २५–२७; द. १२ स. ८ ओ. २८–३४.

(२) ब्रह्मज्ञानाशिवाय सायुज्य मुक्तीचा उपदेश व्यर्थ, आत्मविवेदनाशिवाय मुक्ति नाहीं. दशक ७ स. २ ओ. २–५ दश. ४ स. ९ ओ. २५–२६.

(३) आत्मप्रत्ययो गुरु अंजनाविना नाहीं. द. १ स. ९ ओ. १०. द. ५ स. १ ओ. २०–२३.

(४) परमार्थाकरतां साधक हा प्रपंचास मनापासून विटलेला पाहिजे. दश. ५ स. १० ओ. ४.

प्रपंचीं वीट मानिला । मनें विषयेत्याग केला ॥
तरीच पुढें आवलंबिला । परमार्थ मार्ग ॥

(५) तो वीट येण्याकरतां गर्भवास-दुःख, बाल्यावस्थेंतील दुःख, तारुण्यदशेंतील विषयव्यथेचें दुःख व वृद्धापकाळीं जरेचें दुःख, अंतीं मृत्यूचें दुःख व तापत्रयदुःख यांची जाणीव पाहिजे. दासबोध दशक तिसरा पहा.

(६) सत्त्वगुण—इतर वर्णनांत खालील वर्णन करतात.

ईश्वरी प्रेमा अधिक । प्रपंच संपादणें लौकिक ॥
सदा सन्निध विवेक । तो सत्त्वगुणं ॥ द. २ स. ७ ओ. ९
अन्यायेवीण गांजिती । नानापरी पीडा करिती ॥
तितुकेंहि सांठवे चित्तीं । तो सत्त्वगुण ॥ द. २ स. ७ ओ. ६८

(७) तमोगुण—इतर वर्णनांत खालील वर्णन करतात.

डोळां युद्धचि पहावें । रण पडिलें तेथें जावें ॥
ऐसें घेतलें जीवें । तो तमोगुण ॥ द. २ स. ६ ओ. ७.
युध्य देखावें ऐकावें । स्वयें युद्धचि करावें ॥
मारावें कीं मरावें । तो तमोगुण ॥ द. २ स. ६ ओ. १६.
चेटक विद्येचा अभ्यास । शस्त्रविद्येचा हव्यास ।
मल्लविद्या व्हावी ज्यास । तो तमोगुण ॥ द. २ स. ६ ओ. २८.

(८) बद्ध मुमुक्षुतेच्या सदरांत आल्यावर त्याजकरतां (उपासना नवविधा भक्ति,) आत्मज्ञान, ध्यान वगैरे. द. ४ स. ३ द.१६ स.१०. ओ.२३–३१. द. २ स.६ द.८-स७.

(९) आत्मसाक्षात्कार झाल्यावर आत्मसाक्षात्कारी पुरुषानें लोकांस उत्तम गुण शिकवावेत, गुप्तरूपानें समुदाय करावेत. द. ११ स. ३–४–६–९–१०.

(१०) मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ॥ द. ११ स. ५–६.

(११) क्षात्रधर्म — रामदासांची कविता.

(१२) स्वराज्याचा आनंद.

बुडाला औरंग्या पापी । म्लेंछ संहार जाहला ॥
मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें। आनंदवनभुवनीं॥ रामदासांची कविता ४२१.

येथवर दिलेल्या यादीवरून समर्थेतर महाराष्ट्रसंत व समर्थ यांच्यांत शिकवणुकीचे बाबतींत ऐक्य कोठवर आहे व भेदच असला तर तो कोणत्या प्रकारचा आहे हें ठरविण्याचें आम्ही वाचकांवर सोंपवतों. या दोहोंमधील फरक जातीचा ( of a kind ) नाहीं तर तो अंशात्मक ( of a degree ) आहे. श्रीसमर्थ हे आनंदवनभुवनांत स्वराज्यसूर्याचा उदय झालेला पाहण्यास राहिले व त्यांना अत्यंत हर्ष झाला. असें सुभाग्य सामान्य स्वार्थी मनुष्यास लाभलें तर त्यासहि आनंद होईल. मग साधु हे काय अशा स्वार्थी माणसांपेक्षांहि नीच कोटीचे, पाषाणहृदयाचे असतात काय ? लोककल्याण प्राप्त व्हावें येवढ्याकरतां स्वार्थाची होळी करून अहोरात्र खटपट करणाऱ्या साधूंस स्वराज्य प्राप्तीनें आनंद होईलच होईल, हें निराळें सांगावयास नको. देवाधर्माकरतां झगडून देवधर्म स्थापन करणारा हा केव्हांहि सर्व साधूंस आदरणीयच वाटणार. पण दृष्टि का दूषित असली म्हणजे तिला स्पष्ट गोष्टच दिसेनाशी होते. याचाच परिणाम एका इतिहासाचार्यांस रामदास व इतर साधु, विशेषतः तुकारामबुवा, यांचे शिकवणुकींत जमीनअस्मान इतकें अंतर आहे असें दिसण्यांत झाला. यांच्या मतें '(१) तुकारामबुवा लोकांकडे आपण होऊन जाऊन उपदेश करीत नसे; (२) कोणी आलेंच तर त्यास नुसता वैराग्याचा उपदेश करी; (३) येवढेंच नव्हे तर तुकारामावर रामदासांचा वचक होता व जो कोणी उपदेश घ्यायला त्याचेकडे येईल त्याला तो रामदासाकडे पाठवी; (४) सर्व समाज तुकारामबुवा होणें केव्हांहि शक्य नाहीं; (५) रामदासांनीं परिस्थिती ओळखली व इतर साधूंनीं ओळखली नाहीं.' यांपैकीं

प्रत्येक गोष्ट खोटी आहे असें सिद्ध करतां येण्यासारखें आहे. परंतु प्रस्तुतचा निबंध हा तुकाराम व रामदास यांवरील स्वतंत्र निबंध नसल्यानें तुकारामबुवां पुरतें एक एक कडवें घेऊन त्यांच्यावरील आक्षेपांचें निरसन करतों, व हा भाग पुरा करतों.

(१) तुकारामबुवा आपण होऊन लोकांकडे जाऊन उपदेश करीत नव्हते.

सेवितों हा रस वाटितों आणीका । घ्यारे होऊं नका रानभरी ॥
तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मार्ग हा सोपा सुखरूप ॥
प्रायश्चित देतो तुका । जातो लोकां सकळां ॥
तुका पाया लागे । दान समुदाव मागे ॥

या कडव्यांवरून ते आपण होऊन लोकांस उपदेश करीत हें उघड आहे.

(२) नुसता वैराग्याचा उपदेश करीत होते.

मागें संतांच्या शिकवणुकीचा विचार करतांना दिलेलीं तुकारामबोवांचीं ‘ सुखें करावा संसार ’ ‘ तुका म्हणे ज्यावें । सत्कीर्तीनें बरवें ’ वगैरे कडवीं पहा.

(३) उपदेशाकरतां ‘रामदासाकडे’ धाडी.

असें जर ठोकळ विधान केलें नाहीं तर शिवाजीराजे यांस रामदासाकडे पाठवलें या कथेस आधार काय ?

येथें समर्थ व शिवाजीराजे यांची केव्हां गांठ पडली वगैरेविषयीं भाटे, फाटक, राजवाडे, देव वगैरेंचीं जीं निरनिराळीं मतें आहेत त्यांचा विचार आम्ही करीतच नाहीं. आम्ही फक्त तुकाराममहाराज व शिवाजीराजे यांचे संबंधापुरताच विचार करणार आहोंत. वास्तविक स्थिति काय होती ही खालील लहानशा विवेचनावरून कळून येईल.

तुकारामबुवा हे आपल्या कालासंबंधानें म्हणतात.

‘ म्हणविती ऐसें ऐकतों संत । न देखिजे होत डोळां कोणी ॥

तुकारामबोवांची ‘ संत ’ ठरवण्याची कसोटी फारच कडक होती. ते स्वतः आपण जगाचा उद्धार करावयास आलों असें सांगतात. तेव्हां स्वसामर्थ्याची पूर्ण जाणिव असतांना[1] व दुसरा योग्य दिसत नाहीं अशी स्थिती असतांना तुकोबा हे आपणांकडे आलेल्यास दुसऱ्याकडे धाडतील हें अशक्यच आहे. अशक्य होतें असा नुसता तर्क करूनच थांबायला नको. त्यांनीं लोकांस उपदेश दिला अशीं स्पष्ट उदाहरणें आहेत. बहिणाबाई, रामेश्वरभट व इहलोक सोडल्यावर निळोबा--या सर्व ब्राह्मणमंडळीस तुकोबांनीं उपदेश दिला हें त्यांचे शिक्षित स्वतःच आपल्या अभंगांत सांगतात. व श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्याकडे धरणें घेऊन बसलेला ब्राह्मण श्रीज्ञानदेवांचे आज्ञेनें तुकोबारायाकडे आला व त्यांनीं त्याला उचित एकादश अभंगात्मक उपदेश केला हें तुकोबारायांचे गाथ्यांतील आज प्रसिद्ध असलेल्या अभंगावरून सिद्ध आहे. अशा स्थितींत तुकोबा हे आपल्याकडे उपदेशाकरतां जो येईल त्यास रामदासाकडे धाडीत असला सिद्धान्त ठोकणें हें एक संशोधनकुशल इतिहासाचार्यच करूं जाणोत !

---

1 गाढवाचें घोडें । आम्हीं करूं दृष्टिपुढें ॥

'रामदासीं लक्ष लावा' वगैरे जे अभंग आहेत ते क्षेपक आहेत. छत्रचामर धाडून शिवाजी महाराज यांनीं बोलावणें धाडलें असतां तुकोबाराय यांनीं उत्तर म्हणून दिलेले जे अभंग आहेत त्यांत त्यांचें निःस्पृहत्व दिसून येतें. तुकारामबोवांचें हें उत्तर म्हणजे रामदासस्वामींनीं दासबोध द. १० स. ११ यांत सांगितलेल्या निःस्पृह वर्तनाचा उत्तम नमुना आहे. यावरून त्यांची व शिवाजी महाराजांची कधीं गांठ पडलीच नाहीं अथवा पुढें पुढें शिवाजी महाराज त्यांचेकडे जातनासे झाले वगैरे कोणचेंहि अनुमान बांधणें चुकीचें आहे. शिवाजीराजे हे एकदां कीर्तनास आले असतां कीर्तन-श्रवण करून त्यांस वैराग्य प्राप्त झालें अशी एक कथा प्रसिद्ध आहे.पण त्याबरोबरच पुनश्च आईसाहेबांनीं शिवाजी राजे विरक्त झाल्याची वार्ता कळविल्यावर 'पुनः त्यास योग्य मार्गास ल ावतों मजकडे धाडा असा त्यांस निरोप करून शिवाजीराजे यांस 'हत्त्या क्षात्रकर्म । नव्हे निष्काम तें कर्म' असा उपदेश करून पुनः प्रपंच करावयास लावलें हीहि कथा प्रसिद्धच आहे. या बाबतींत एकच गोष्ट सांगून हा लांबलेला भाग आवरतों.

एकदां शिवाजी राजे कीर्तनांत बसले असतां परचक्र आलें व विठ्ठलकृपेनें तें वारलें गेलें. ही गोष्ट जर लक्षांत घेतली तर या प्रश्नाचा चटकन् उलगडा होणार आहे. तुकारामबोवा यांची शिकवणूक राज्यस्थापनेस घातक आहे असा त्यांचे कीर्तन प्रत्यक्ष श्रवण करणारे शिवाजी महाराज यांचा समज असता तर ते स्वतः वारंवार कथेस कां गेले असते ? व त्यांस लहानपणीं दादाजी कोंडदेव वगैरेंनीं कां जाऊं दिलें असतें ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. महाराजांचे लहानपणीं त्यांचें पालकत्व ज्यांचेकडे होतें त्यांस व मोठेपणीं खुद्द महाराजांस तुकोबांच्या प्रेमळ कीर्तनांत कांहीं आपल्या आकांक्षांच्या विरुद्ध दिसत नव्हतें मग त्यांचे नंतर तीनशें वर्षांनीं चर्चा करणाऱ्या लोकांसच असें कां दिसावें ? हा एक दृष्टीचा फरक आहे; येवढेंच त्याचें उत्तर.

(४) सर्व समाज तुकारामबोवा होणें शक्य नाहीं.

अगदीं खरें. पण तशी त्यांची कल्पनाच नव्हती. 'अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यांस तेंचि देऊं' या कडव्यावरून काय सिद्ध होतें ?

(५) यांनीं परिस्थिति ओळखिली नाहीं.

'भीत आतां नाहीं आपुल्या मरणा । दुःखी होतां जना न देखवे ।
न घडे यावरी न धरवे धीर । पीडितां राष्ट्र देखोनि जग ।
काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडोनि पुढती वाटे लावूं ॥
आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । धड तें नासोनि भलता टाकी ।

हे व इतर तुकोबांचे अभंग व कान्होबांचे अभंग हे वाचले असतां या बंधुद्वयांस परिस्थिती कळली होती किंवा नाहीं याचा स्वच्छ खुलासा होईल. परिस्थिती कळूनहि, स्वदेशाभिमान असूनहि, कित्येकांस प्रकृतिस्वभाव व स्वतःचें संकल्पित ध्येय यांमुळें राजकारणांत भाग घेतां येत नाहीं. पण याचा अर्थ त्यांस परिस्थितीचें ज्ञान नसतें, अथवा स्वदेशाभिमान नसतो अशी कल्पना करणें चुकीचें आहे.तुकारामबोवा स्वतःसंबंधानें सांगतात,

आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥

या त्यांच्या वचनावरून तुकोबांस 'हरिकथा निरूपण' मुख्य वाटत होतें तरीपण लौकिक भागही ते संपादित होते ही गोष्ट उघड आहे.

इतकें लिहावयाचा हेतू येवढाच कीं पूर्वींचा, तुकोबारायांसंबंधाचा ग्रह कांहीं संशोधकांनीं बदलावा, त्यांचे ग्रंथांचा आमूलाग्र अभ्यास करावा व मगच शिवाजीराजे सुद्धां ज्यांच्या कीर्तनास जात होते त्यांचेविषयीं आपलीं मतें बनवावीं.

तात्पर्य, या साधुसंतांची शिकवणूक श्रीहरीप्राप्ति करून घ्या अशी होती; पण ती ऐहिक पुरुषार्थाच्या आड येणारी नव्हती. यांनीं अद्वैत तत्वज्ञानाचा उपदेश केला पण यांचें अद्वैत तत्वज्ञान गुणीजनांचा मान व दुष्टांचें शासन यांच्या आड येणारें नव्हतें. अद्वैत प्रतिपादन करूनहि उपासनेकरतां 'रामरहिम' असा भेद ते करीत. अद्वैत प्रतिपादन करूनहि 'वर्णैक्य' करावयाची त्यांची इच्छाहि नव्हती. यांनीं भक्ति शिकवली पण ती वर्णाश्रमव्यवस्थेस खाणारी नव्हती. ज्ञानहि शिकविलें पण तें आपल्या जननी--भक्तीस खाणारें नव्हतें. दैववाद, जगाचें दुःखरूपत्व वगैरे त्यांनीं प्रतिपादिलें पण तें लोकांस निरुत्साह, निर्बल, पंगु करण्याकरतां नव्हे, तर कर्म करूनहि, फळ मनाजोगतें न मिळाल्यास संतोषाकरतां दैववाद सांगण्यांत आला; व सुखाकरतां कर्तव्याचा त्याग करण्यास जगाचें दुःखरूपत्व हा इषारा देण्यांत आला. याबरोबरच इहलोकांतील पुरुषार्थाकरतां यश, कीर्ति, मान्यता, यांचे गोडवेहि यांनीं गायिले, व समाज रक्षण्यास अवश्य असणाऱ्या गुणांबद्दल समाजांत प्रेम उत्पन्न केलें. प्रसंगविशेषीं स्वधर्माविरुद्ध व स्वाभिमानी नरास चीड आणणाऱ्या म्लेंच्छ सेवेवर--म्लेंच्छदैवत व म्लेंच्छराजे यांच्या सेवेवर---यांनीं कोरडेहि ओढले. या शिकवणुकींत स्वराज्याच्या आकांक्षेच्या विरुद्ध तर कांहीं नाहींच. उलट यामुळें लोकांत धर्मप्रेम उत्पन्न झालें. आचाण्डाल सर्वांचे अंतःकरणांत 'धर्म' रक्षणीय आहे ही भावना उद्दीपित झाली. व राजे विधर्मी असल्यानें आयतीच संघटना झाली. असो. आम्हीं आतांपर्यंत संतांच्या शिकवणूकीविषयीं प्रचलित असणारीं मतें, त्यावेळची धार्मिक व राजकीय परिस्थिति संतांच्या वचनांवरून निघणारी त्यांची शिकवणूक, व तीवर घेतले जाणारे निरनिराळे आक्षेप यांचा विचार केला. तसेंच आम्ही मागें प्रसंगोपात्त यांच्या शिकवणुकीचा धार्मिक, सामाजिक, नैतिक व तद्द्वारां राजकीय उन्नतीस कसा उपयोग झाला हें दाखवीत आलोंच आहोंत. त्याचेंच आतां थोडक्यांत समालोचन करून हें प्रकरण संपवितों.

भारतवर्षांतील इतर प्रांतांबरोबर महाराष्ट्राचाहि धार्मिक ऱ्हास होत होता. तेराव्या शतकाचे शेवटीं महाराष्ट्रावर पहिली मुसुलमानी स्वारी झाली व पुढें वारंवार स्वाऱ्या होऊन मुसुलमान दक्षिणेंत कायमचेच वास्तव्य करून बसले. यामुळें महराष्ट्राच्या बऱ्याचशा भागाचें 'स्वराज्य' गेलें व धार्मिक ऱ्हास अधिक जोरानें होऊं लागला. अशा परिस्थितींत संतांनीं महाराष्ट्रांत धार्मिक भावना जागृत ठेविली व धर्म जगवला.

कोणत्याहि राष्ट्राचा उदयकाल येण्यास त्याची सर्वांगीण नैतिक, सामाजिक, धार्मिक व राजकीय-उन्नति होणें अवश्य आहे. धर्माचा व राजकारणाचा विशेषतः विधर्मी राज-

वर्टीत किती निकट संबंध असतो हें मागें दाखविलेंच आहे. या साधुसंतांनीं जरी प्रत्यक्ष राजकारणांत भाग घेतला नव्हता तरी यांपैकीं प्रमुखांस परदास्य बोचत होतें. नाथ ' ज्याचा देह पराधीन। तो जीवें जितां सदा दीन। पराधीना समान। दुःख जाण ॥' असे उद्गार काढतात.

तात्पर्य, स्वधर्म, स्वभूमि यांचा अभिमान असणारा प्रत्येक मनुष्य राजकारण करूनच राष्ट्रोन्नतीस मदत करूं शकतो असें नाहीं. इतर अंगांची उन्नति होण्यास तो मदत करून राष्ट्रसेवक होऊं शकतो. शस्त्रधारण करून धारातीर्थी पडणें अथवा दुसऱ्यास पाडणें येवढाच एक मार्ग राष्ट्रोन्नतीस मदत करण्याचा आहे असें नाहीं. या बाबतींत इसापनीतींतील शिंगाड्याची गोष्ट प्रसिद्धच आहे.

फ्रेंच राज्यक्रान्तीच्या पूर्वी डिडेरो वगैरे लेखकांनीं आपल्या लेखांनीं लोकांचीं मनें तयार केलीं असें इतिहासकार सांगतात. लोकांच्या मनाची तयारी झाल्याशिवाय राष्ट्रांत क्रान्ति होऊं शकत नाहीं ही गोष्टहि इतिहासप्रसिद्धच आहे. अशाच जातीची पण निराळ्या स्वरूपाची कामगिरी या साधूसंतांनीं केली.

महाराष्ट्रांत त्या काळीं विधर्मी राज्य होतें. व विधर्मी राज्य असलें कीं एकादा मनुष्यहि आपल्या धर्मांत राहिला म्हणजे तो एक प्रकारचा 'स्वराज्याच्या' दृष्टीनें फायदाच आहे व तेथें स्वराज्य पुनः उत्पन्न होण्याची आशा आहे असें समजण्यास हरकत नाहीं. या साधुसंतांनीं वैदिक धर्मांच्या पडत्या काळांत धर्मास हात दिला. धर्माचीं प्रमुख अंगें गोब्राह्मण यांना सुधारून त्यांचा मान समाजांत ठेवला. संस्कृतांतील ग्रंथसंपत्ति प्राकृतांत आणून धर्मजीवनाच्या जणूंकाय पाणपोयाच यांनीं घातल्या. यामुळें नवीन धार्मिक चैतन्य मिळून तत्कालीन समाज चैतन्ययुक्त झाला. या आध्यात्मिक बलानें समाजांत आत्मविश्वासाचें नवें वारें खेळूं लागलें; यांची कामगिरी येवढीच असती तरीहि ती पुष्कळच होती. परंतु याशिवाय त्यांनीं सर्वसंग्राहक, सामुदायिक अशीं कीर्तन, भजन, वारी इत्यादि उपासनेचीं अंगें रूढ केलीं आणि यायोगानें समाजाचीं वेगवेगळीं अंगें जवळ येऊं लागलीं, समता वाढली व समाज संघटित झाला. नुसत्या पारलौकिक गोष्टीवरच भर देऊन ते थांबले नाहींत तर स्वतः उपदेशद्वारां, धर्मरक्षणाची, गोरक्षेची थोरवी गाऊन, या लोकीं मान मिळविण्याची, आवश्यकता लोकांपुढें सांगून लोकांत यांनीं उच्च भावना जागृत केल्या. ही संघटना करण्याकरितां नुसत्या वारी-भजनाचा मामुली उपदेश करूनच ते थांबले नाहींत; तर प्रसंगविशेषीं परधर्मांतील दोष दाखवून परधर्मसेवेवर त्यांनीं चांगलेच कोरडे ओढले. त्यावेळीं लोकांत शक्ति होती व त्यांचेजवळ शस्त्रें होतीं; उच्च भावना नव्हत्या; एकी करणारें व स्वार्थत्यागास प्रवृत्त करणारें उच्च ध्येय नव्हतें. संतांच्या शिकवणुकीनें समाजांत याचा प्रसार झाला. शिवाजीराजे यांचेंहि ध्येय पुराण-श्रवण व संतकीर्तन-श्रवण या योगानेंच बनलें. व संतांच्या तपःसामर्थ्यानें तयार केले गेलेल्या या भूमिकेवरच स्वधर्मध्वजांकित अशा हिंदवी स्वराज्याचें अलौकिक मंदीर धर्मवीर शिवाजीराजे यांस उभारतां आलें. हीच संतांची कामगिरी.

# उत्तर हिंदुस्थानांतील शिवकालीन
## राजनीति व राज्यव्यवस्था

( लेखक–श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर, बनारस )

सारांशः—शिवाजीच्या राजनीतीचें व राज्यव्यवस्थेचें स्वरूप तत्कालीन व तत्पूर्व-कालीन मुसलमानी राजनीति व राज्यव्यवस्था ह्यांच्या स्वरूपाहून थोडेसें भिन्न होतें, आणि त्यामध्यें हिंदु राजनीतीचे व राज्यव्यवस्थेचे कांहीं अवशेष व कांहीं विशेष दिसत होते. त्याचप्रमाणें कांहीं मुसलमानी राज्यव्यवस्थेच्या पद्धतींचाहि परिणाम परिस्थितीमुळें त्याज-वर झालेला दिसत होता. असा आरंभ करून, लेखकानें पहिल्या भागांत मुसलमानी धर्माचा थोडक्यांत इतिहास दिला आहे व मुसलमानी राजनीतीचें सामान्य स्वरूप त्या अनुषंगानें वर्णिलें आहे. 'मुसलमानांचें मुख्य ध्येय स्वतःच्या इस्लाम धर्माचें पालन व संवर्धन करणें हें असल्यामुळें यांच्यामध्यें 'राष्ट्र' ही कल्पना उदय पावली नाहीं.' ... अर्थात् त्यांच्या राज्यांत रहाणाऱ्या सर्व लोकांचें समानतेनें व न्यायानें पालनपोषण करणें ही गोष्ट त्यांच्या राज्यसंवर्धनांत येत नसे....... खरें पाहिलें असतां मुसलमानी राज्यांत मुसलमानेतरांना प्रजेचे कांहींच हक्क नाहींत. त्यांनीं पाहिजे तर मुसलमान व्हावें य नंतर मुसलमानी प्रजेचे हक्क भोगावे....

इस्लामी धर्माप्रमाणें राजा हा राजकीय क्षेत्रांत व शासनव्यवस्थेंत पूर्ण स्वतंत्र असे...... राजकारण व राजधोरण ह्यांच्या बाबतींत आपल्याला साहाय्यक म्हणून राजा हा कांहीं मंत्री किंवा एकादें मंत्रिमंडळ नेमीत असे. परंतु त्यांना राजाच्या मर्जीविरुद्ध स्वतंत्र सल्ला देण्याचा अधिकार नसे. म्हणजे मंत्री हे राज्याचें एक स्वतंत्र अंग नसून तें राजाचेंच अंग होतें. ह्या मंत्र्यांमध्यें मुख्य 'वजीर' या नांवाचा असे. इतर मंत्र्यांचीं नांवें व पदानुक्रमहि कोणत्याहि राजवटींत निश्चित नसत. मंत्री हे स्थलकालानुसार राजाच्या इच्छेप्रमाणें बदलत असत. वझीर, दिवाण, सुभेदार व सुलतान हे खलिफाचे अंकित असत. पुढें जेव्हां सुलतान स्वतंत्र झाले तेव्हां त्यांच्याच अनुमतीनें इतर सरदार, सुभेदार, अमीरउमराव व इतर मंत्री आणि अधिकारी वर्ग हे नेमले जात असत, व त्यांचें अधिकारक्षेत्र सुलतानांच्या मर्जीप्रमाणें वाढ व कमी होई.

मुसलमानांचें परराज्याशीं धोरण आक्रमण-नीतीचें असे. त्यांच्यामध्यें कोणत्याहि स्वरूपाचे आंतर्राष्ट्रीय सुद्धां परस्पर संबंध सलोख्याचे अथवा प्रेमाचे फार वेळ टिकत नसत.

या वरील विवेचनावरून असें दिसतें कीं, मुसलमानांच्या मूलभूत राजकीय संस्था म्हटल्या म्हणजेः—

१ कुराण ग्रंथांत दिलेलीं वचनें व आश्वासनें आणि विधी व निषेध व नीति व नियम यांना अनुसरून स्थापन झालेली राजसत्ता, मुस्लीम प्रजेचे अधिकार व कर्तव्यें, मुसलमानेतर प्रजेची स्थिती व कर्तव्यें.

२ खलीफा व त्यांचे अधिकार आणि शासनें.

३ इतर सुलतान, बादशहा व राजे यांचे अधिकार व शासनें.

ह्या राजकीय कल्पना व संस्थांमध्यें मंत्रिमंडळाला, प्रजेच्या मूलभूत हक्काला, मुसलमानेतर प्रजेला, लोकशाही तत्वाला व राज्यरचनेला जागा नाहीं. ह्या राजतंत्रामध्यें राजा हाच सर्वाधिकारी व त्याच्याच हातांत सर्व सत्ता एकवटलेली असे. तोच न्यायाधीश तोच नियमकर्ता, तोच धर्मरक्षक व धर्मप्रसारक असे.

पण हिंदुस्थानांत मुसलमानी राजसत्ता प्रस्थापित झाल्यापासून बहुसंख्याक हिंदु प्रजेचा प्रश्न पुढें उभा राहिल्यामुळें मुसलमानी सामान्य धोरणांत बराच फरक करावा लागला. तो लेखकांनीं तुर्कशाही, बहामनशाही, शेरशाही व मोगलाई अशा चतुर्विध मथळ्याखालीं प्रत्येक शाहीचें वैशिष्ट्य सांगून दर्शविला आहे. त्यांपैकीं राज्यकारभार-विषयक वर्णनाचा भागच येथें अवतरिला आहे.

## १ तुर्कशाही (इ. १२०६–१५२६)

मुस्लीम राजांनीं जेव्हां हिंदुस्थान देशाचे भाग हळूहळू काबीज केले तेव्हां त्यांनीं पराजित केलेल्या हिंदु राजांचीं राज्यें, हिंदु जमीनदारांच्या जमीनी, व देशाधिकारी व प्रांताधिकारी यांचीं वतनें व अधिकार हीं सर्वथैव जप्त केलीं नाहींत. आपलें वर्चस्व कबूल करावयास लावून त्यांना आपले मांडलिक अथवा अधिकारी वा नोकर केलें. व त्यांचे जुने हक्क आणि अधिकार कायम ठेवले, व ह्या प्रकारानें देशाची राज्यव्यवस्था चालू ठेविली. त्या राजांनीं आपली हुकमत व आधिपत्य योग्य चालावें म्हणून कांहीं मुख्य मुसलमान प्रांताधिकारी देखरेखी करतां नेमले, व त्यांच्यामार्फत व सहाय्यानें देशस्थिती व राजद्रोह यांवर लक्ष व वचक ठेविला. अशा तऱ्हेनें हिंदुस्थानासारख्या अवाढव्य देशांत त्यांना हिंदु राजांचें, जमीनदारांचें व अधिकारी वर्गांचें सहाय्य राज्यव्यवस्थेकरतां राज्यकारभारा-करतां व शांततारक्षणाकरतां घ्यावें लागलें. ही पद्धत व नीति परिस्थितीमुळें त्यांना पत्करावी लागली.

## २ दक्षिणेंतील बहामनशाही

दक्षिणेमध्यें सुद्धां मुसलमानी राजनीतीचें व राज्यव्यवस्थेचें स्वरूप उत्तरेप्रमाणेंच होतें. मात्र मुसलमानांची संख्या फार कमी असल्यामुळें दक्षिणेंत अधिकारी वर्गामध्यें व सैन्यामध्यें हिंदूंचा भरणा विशेष असे. व त्यांच्याच सहाय्यानें व सलोख्यानें राज्य चालविणें शक्य होई. तरीपण वरिष्ठ अधिकार व राज्यसूत्रें मुसलमानी नीतिदृष्ट्या व हितदृष्ट्याच चालत व तीं मुसलमानांच्याच हातांत असत. हिंदूंची बरी वाईट राजकीय, धार्मिक व सामाजिक स्थिती राजाच्या इच्छेवर व स्वभावावर आणि मुसलमानी प्रजा व अधिकारी वर्ग यांच्या प्रकृतीवर अवलंबून राही. मुसलमानांच्या परिस्थितीमुळें व अडचणीमुळें त्यांना फक्त कांहीं सवलती मिळत. पण त्यांना राज्यांत प्रजेचे मूलभूत हक्क अथवा स्थान नसे.

राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें त्यांनीं राज्याचे चार भाग (तर्फ) केले होते. त्यांचीं नांवें गुलबुर्गा, दौलताबाद, वऱ्हाड व बेदर हीं होत. ह्या प्रत्येक भागावर एक वरिष्ठ अधिकारी अथवा तरफदार असे. त्याला राजाचे सर्व अधिकार असत. त्याच्या हुकमती-खालीं प्रांतांतील सैन्य असे व तोच दिवाणी, मुलकी व सैन्यांतील नेमणुका करीत असे व कारभार पाही; त्याच्यावर नियंत्रण राजाचेंच असे. राजा त्यांच्या कारभाराची देखरेख दौरे काढून करीत असे. ह्या प्रांताधिकाऱ्यांच्या हाताखालील नोकरांना सुद्धां बरीच सत्ता व अधिकार असत. त्या काळांत राज्यव्यवस्थेला बरचसें फुटाफुटीचें व विस्कळीत स्वरूप

असें. मुख्य सरकारला सर्व सूत्रें आपल्या हातांत ठेवणें शक्य होत नसे. त्याला आपले बरेचसे अधिकार खालच्या अधिकाऱ्यांना राजप्रतिनिधि म्हणून वाटून द्यावे लागत असत. त्यांच्या कामांत विशेष ढवळाढवळ करणें शक्य नसे. त्यांना बरेचसे कारभारस्वातंत्र्य द्यावें लागे. राजधानीपासून प्रांताचीं ठिकाणें लांब असल्यामुळें व रस्ता, प्रवास व वाहनें यांची स्थिती जलद दळणवळणाची नसल्यामुळें राज्यकारभाराची विभागणी व वाटणी बरीचशी करावी लागे. त्यामुळें राज्याचें सुखदुःख राजावर व त्याच्या अधिकारी व नोकरवर्गाच्या वृत्तीवर, नीतीवर व मतीवर अवलंबून राही. अशा सरकारी अधिकारी अमीर-वर्गाला उत्पन्नाकरतां जहागीरी दिलेल्या असत. त्या उत्पन्नांतून ते आपला निर्वाह व व्यवसाय करीत असत. अशा प्रकारच्या राज्यपद्धतीला जहागीरी नीतीची व लष्करी व्यवस्थेची सरंजामी अथवा मोकासापद्धत म्हणतां येईल. ही वेतनी पद्धत नव्हती पण वतनी पद्धत होती.

मूळ संस्थापक अल्लाउद्दीन बहामनी याचा मुलगा महंमद हा राज्यकारभारांत फार दक्ष व व्यवस्थित होता. त्यानें आपली राज्यव्यवस्था काळजीपूर्वक रचली होती. त्यानें आपलें मंत्रिमंडळ, हुजुरातीचें सैन्य व प्रांतिक कारभार हीं सर्व व्यवस्थितपणें चालू केलीं व तीं बहामनी राज्याखेरपर्यंत होतीं. त्यानें नेमलेल्या अष्टप्रधानांचीं नांवें पुढें दिल्याप्रमाणें होतीं:—

१ वकील–उस–सलतनह हा राजाचा. मुख्य प्रतिनिधी असे.
२ वझीर--इ--कुल. हा मुख्य प्रधान.
३ अमीर--इ--जुमला. हा अमात्य.
४ वझीर--इ--अश्राफ. हा सुमंत अथवा मंत्री.
५ नझीर हा दुय्यम अमात्य.
६ पिशवा. हा दुय्यम प्रतिनिधी अथवा सचीव.
७ कोतवाल. हा सेनापति.
८ सद्र--इ--जहान. हा न्यायाधीश अथवा पंडितराव.

ही हिंदु परंपरेनें चालत आलेली व महाभारत आणि शुक्रनीतींत सांगितलेली अष्ट प्रधानाची पद्धत बहामनी राजांनीं व विजयानगरच्या राजांनीं चालू ठेवलेली होती. एका तालीकोटच्या कानडी व मराठी बखरींत पुढीलप्रमाणें वाक्यें आढळतात:—"अष्ट प्रधानांना व सेनानायकांना युद्धाची तयारी" करण्यास सांगणें (बहामनी सुलतानांची आज्ञा), व "सर्व वजीर व अष्टप्रधान, दळवाई वगैरे ७२ नियोगी व सर्व मांडलिक" यास युद्धाची तयारी करण्यास सांगणें. (विजयानगरच्या राजाची आज्ञा.)

यावरून जुन्या हिंदु राज्यव्यवस्थेच्या व राज्यपरंपरेच्या कांहीं कल्पना व रचना मुसलमानी राजांनीं उचलल्या आणि कायम ठेवल्या असें आढळतें. ही तुर्की सुलतानांचीं राज्यें व साम्राज्यें दृढ प्रकारानें रोवलेलीं नसून तीं प्रांतिक अधिकाऱ्यांच्या स्वामीनिष्ठेवर व राजाच्या कर्तबगारीवर अवलंबून व टिकून असत. त्यांची मध्यवर्ती मुख्य राजसत्ता व व्यवस्था सामान्यपणें बगदाद येथील अब्बासी घराण्याच्या राज्यव्यवस्थेला अनुसरून असे. त्याप्रमाणें राज्याला मुख्यतः दोन प्रधान असत. एक दिवाण इ--वझारत नांवाचा व दुसरा दिवाण--इ--अरिझ या नांवाचा. एकाचें काम मुख्य कोशाधिकाऱ्याचें व दुसऱ्याचें मुख्य सेनानायकाचें. बल्बन व अल्लाउद्दीन खिलजी यानीं हेरांच्या खात्याची रचना व वाढ केली. फिरोज तघलखानें सरकारी कामाचें व टांकसाळीचें अशीं दोन खातीं काढलीं.

याशिवाय मीर-आदलचें न्यायाधिशाचें खातें होतें. पण हीं सर्व खातीं व त्यांचीं अंगें हीं खालपासून वरपर्यंत एका पद्धतीनें रचलेलीं अथवा बांधलेलीं नसून, त्यांचें अस्तित्व मुख्यतः राजधानींमध्येंच असे. प्रांताचा कारभार अमीर अथवा मालिक यांच्याकडे जहागीरदारीच्या रूपानें लष्करी, मुलकी व दिवाणी कामाकरतां सोंपविलेला असे. ते सर्व रीतीनें तेथील मुख्य अधिकारी असत; आणि खालचे अधिकारी व कामगार तेच निवडीत व नेमीत असत. त्यांना सहाय्यक म्हणून एक दिवाण व एक काझी हे नेमलेले असत. हे प्रांताधिकारी शिरजोर होऊन वारंवार बंडे, उपद्रव व राजद्रोह करीत, व त्यामध्यें जय पावल्यास राजे होत. राज्याचा पाया अशा कारणामुळें बराच अस्थीर व डळमळीत असे. त्यामुळें बरीचशीं जुनीं घराणीं जाऊन नवीन राजघराणीं येत गेलीं.

## ३ शेरशाही

मोंगलाईच्या पूर्वी व तुर्कशाहीनंतर १५४०–१५४५ मध्यें शेरशहा नांवाच्या अफगाण सरदारानें हुमायुनाचा पराभव करून दिल्ली येथें आपलें साम्राज्य स्थापिलें व मुसलमानांच्या अमदानीमध्यें पहिला उत्तम व योग्य राज्यकर्ता हें पद प्राप्त करून घेतलें. त्यानें खरा प्रजाधर्म व राजधर्म ओळखून राजनीतीला व राज्यव्यवस्थेला योग्य वळण दिलें. त्यामुळें त्याचें नांव अकबरासारखें हिंदुस्थानाच्या इतिहासांत स्मरणीय झालें आहे.

शेरशहाची राज्यरचना खालपासून वरपर्यंत पद्धतशीर बांधलेली होती. खेडेगांवापासून तों राजधानीपर्यंत राजसत्तेचें केंद्रीकरण व दृढीकरण एका वळणांत त्यानें केलेले होते. त्यानें राज्यकारभाराच्या व वसुलाच्या दृष्टीनें केलेला पहिला विभाग म्हणजे "परगणा" हा होय. त्याच्यावर एक शिकदार, एक अमीन, एक फोतहदार (खजिनदार) आणि दोन कारकून यांची अधिकारी म्हणून योजना केली. शिकदाराकडे पोलीसाचें काम असे व त्याकरतां त्याच्याजवळ हत्यारी माणसें नोकरीला असत. अमीन हा दिवाणीचें व वसूलीचें काम करी. शिकदार हा राजाच्या आज्ञांची अमलबजावणी करी, शांतता राखी व अमीनाला जरूर पडल्यास वसुलीच्या कामांत मदत करी. अमीन हा मुलकी कामाचा मुख्य असे. त्याला मदतनीस म्हणून एक फोतहदार आणि दोन कारकून असत. हे सर्वजण आपापल्या स्वतःच्या व इतरांच्या सर्व कामाबद्दल एकत्र जबाबदार असत.

"सरकार" हा अनेक परगणे मिळून झालेला राज्याचा विभाग होय. तेथें एक शिकदार-इ-शिकदरान हा फौजी अधिकारी व मुनसिफ-इ-मुनसिफान हा मुलकी अधिकारी असे. त्यांचीं कामें आपापल्या खालच्या अधिकाऱ्यावर देखरेख करण्याची असत; आणि त्यांच्या कामामध्यें चूक अथवा अफरातफर झाल्यास त्याची माहिती मुख्य दरबाराकडे त्यांना कळवावी लागे.

शेरशहानें सर्व कारभाराचीं मुख्य सूत्रें व अधिकार आणि बारीक देखरेख हीं सर्व आपल्या हातांत ठेविलीं होतीं. वरिष्ठ अधिकाऱ्यांना तो कनिष्ठ अधिकाऱ्यांच्या कामांत आपल्याला कळविल्यावांचून फारशी ढवळाढवळ करून देत नसे. तो सर्व अधिकाऱ्यांच्या बदल्या दोनदोन अथवा तीनतीन वर्षांनीं करीत असे. सरकार व परगणा असे राज्याचे दानचे पोट विभाग होते. सुभा व सुभेदार हे अकबराच्या वेळेस निर्माण झाले. शेरशहानें लष्करी अंमलदाराच्या ताब्यांत दिलेले असे मोठमोठे सुभे निर्माण केले नाहींत. त्यामुळें त्याच्या राज्याला आंतून धोका कमी झाला.

## ४ मोगलाई (१५२६–१७०७)

मोगलाईचा राज्यकारभार दोन प्रकारचा झाला. एक अकबर व जहांगीर यांचा

व दुसरा शहाजहान व औरंगजेब यांचा. पहिला राष्ट्रीय स्वरूपाचा व देशाला हितकारक असा होता. सतराव्या शतकांतील मुस्लीम राजनीतीचें व राजकारभाराचें स्वरूप व सामान्य राजकारण समजण्यास ह्या दोन्ही तऱ्हा समजून घेतल्या पाहिजेत. म्हणजे मोगली साम्राज्याच्या उत्कर्षाचीं व ऱ्हासाचीं कारणें व हिंदूचीं नवीं साम्राज्यें व राज्यें ह्यांचा उदय व उत्कर्ष हीं सर्व समजून येतील.

अकबराची राजनीति व राज्यव्यवस्था राष्ट्रीय स्वरूपाची होती. ती सांप्रदायिक मुसलमानी धर्माची नव्हती. हिंदुस्थान देश हा खरा हिंदू प्रजेचा देश. त्या प्रजेचें कल्याण हाच खरा राजधर्म व राजहित. तेव्हां राजाचें खरें कर्तव्य म्हणजे निरनिराळ्या धर्मांना व सांप्रदायांना समानतेनें वागविणें हेंच होय. त्यांच्याशीं विषमता, अन्याय, कपट, उच्चनीच भाव, या वृत्तीनें वागणें हे राजधर्माविरुद्ध होय. अकबरानीं हि सर्व प्रजेच्या कल्याणाची, त्यांच्या धार्मिक स्वातंत्र्याची, त्यांच्या समान राजकीय संरक्षणाची व हक्काची राजनीति पत्करली व एका विशिष्ट धर्मसंप्रदायाचें वर्चस्व व महत्व, त्याचें फाजील हक्क व हट्ट हिंदुस्थान देशाच्या राजकारणांत व व्यवहारांत चालूं दिले नाहींत. अकबराच्या राज्यांत राजशक्ती प्रबळ व प्रजाहितदक्ष होती. ती धर्मांध नव्हती.

त्यानें हिंदु व मुसलमान यांना राज्याधिकारी वर्गांत सारखें स्थान दिलें, लोकांना धर्मस्वातंत्र्य ठेविलें, व मुसलमानेतरांवरच्या जिझीया कर बंद केला (१५७९). त्यानें राज्यकारभार लष्करी बाण्यावर रचला. प्रत्येक अधिकारी, मुलकी व दिवाणी, हा प्रथमतः सैन्याधिकारी असे. त्यानें आपले मंत्री स्वतःच निवडले. व त्यांचें स्थान, अधिकार व संख्या स्वतःच्या मर्जीवर अवलंबून ठेवली. त्याचे मुख्य मंत्री सुमारें सात होतेः—

१ वकील अथवा मुख्य प्रधान

२ वझीर अथवा दिवाण. हा कोशाधिकारी असे.

३ बक्षी. त्याच्याकडे सैन्याची व युद्धाची व्यवस्था व देखरेख असे.

४-५ काझी-उ-कुझत व सद्र-उ-सदर हे मुख्य न्यायाधीश व धर्माधिकारी असत. मुस्लीम देवस्थानांना व इतर पुण्यकर्माकरतां भूमीदान वगैरे करणें सद्र-उ-सदर याकडे असे. पण अकबरानें १५८२ मध्यें सद्र-उ-सदरची जागा कमी केली. व तें काम सहा प्रांतिक कारभाऱ्यांमध्यें वाटून दिलें. याशिवाय राजाच्या गृहव्यवस्थेकरतां दोन कारभारी असत.

६ मीर अर्झ. तो राजाकडे येणाऱ्या अर्जांची काळजी व व्यवस्था पाही.

७ खान-इ-समान. तो राजगृहाची पूर्ण व्यवस्था पहात असे.

ह्या प्रत्येक अधिकाऱ्याच्या हाताखालीं अनेक लेखक, मदतनीस व नोकर असत.

राजा हा सर्व अधिकाऱ्यांचा व त्यांचे राजकीय अधिकारांचा व तदंगभूत मानापमान व मालमत्ता इत्यादींचा वारस समजला जाई. त्याला अनुसरून त्यांची सर्व मालमत्ता त्याच्याकडे येत असे अथवा ती जप्त केली जाई. ह्यामुळें मोगलाईंत पिढीजाद अमीर, सरदार व इतर अधिकारी यांचें राजकारणांत विशेष प्राबल्य झालें नाहीं. शेरशहाप्रमाणें अकबर हा लोकांना व अधिकाऱ्यांना जहागिरी देण्याच्या विरुद्ध होता. कारण जहागीरदार हे स्वतंत्र होऊं पहात व राजाला त्रास देत. तो अधिकाऱ्यांना वेतन देई. जहागिरीच्या पुष्कळ जमिनी त्यानें खालसा केल्या.

अकबराच्या राज्यव्यवस्थेचें दर्शनीय स्वरूप लष्करी बाण्याचें होतें. लष्करी अधिकाऱ्याकडेच मुलकी व दिवाणी काम सोंपविलेलें असे. किंवा मुलकी व

दिवाणी कामगाऱ्याकडेच लष्करी अधिकार सोपविलेले असत. ह्यामुळें ते राजाचे खरे स्थानिक प्रतिनिधी असत. त्यांना सर्व अधिकार असत. व लोकमत जागृत नसल्यामुळें राजाला त्यांचे बरेचसे वाईट स्थानिक व्यवहार कळत नसत. त्यामुळें लोकांना बराचसा छळ निमूटपणें सोसावा लागे.

राज्याचे १५ सुभे अथवा प्रांत करून प्रत्येक प्रांतावर एक सुभेदार नांवाचा अधिकारी नेमलेला असे. तो मुख्यतः सैन्याधिपति असे. त्याला सिपाह-सलार म्हणत. प्रांतातल्या सैन्यावर व लोकावर त्याचाच अधिकार असे. तोच लष्करी, मुलकी व दिवाणी अधिकारी असे. त्यांच्या वारंवार बदल्या होत असत. प्रत्येक प्रांताच्या मुख्य ठिकाणीं 'वकीयानवीस' नांवाचे बातमीदार असत. ते घडलेल्या सर्व महत्वाच्या गोष्टी राजाला परस्पर कळवीत. त्यामुळें प्रांतिक अधिकाऱ्यांवर राजाचें कांहीं नियंत्रण असे.

जहांगीर बादशहानें अकबराच्या राजनीतींत व राजव्यवस्थेंत फारसा फरक केलेला दिसत नाहीं. पण त्याच्या सौम्य स्वभावामुळें अकबरानें निर्माण केलेल्या राजनीतीला स्थायी करण्याला लागणारा जोम व कडकपणा त्याच्यामध्यें आला नाहीं. त्यामुळें ही अकबराची नवी राष्ट्रीय स्वरूपाची नीति पुढें फार काळ टिकणें शक्य नव्हतें व ती टिकली नाहीं.

शहाजहान बादशहाच्या कारकीर्दीपासून राज्यनीति पुन्हां जुन्या मुसलमानी धळणावर गेली; व त्यामुळें हिंदू प्रजेच्या धर्माबद्दल नुसती सहानुभूती व सहिष्णुता सुद्धां राहिली नाहीं. औरंगझेबाच्या कारकीर्दींत मुस्लीम नीतीची परमावधी झाली. व अकबरानें लावलेल्या नव्या वळणाचा पुरा ऱ्हास झाला. आणि देशांत एकछत्री होऊं पाहणारें मोगली साम्राज्य धर्मांध झालें. त्यामुळें हिंदु लढवय्या व स्वातंत्र्यप्रिय जाती पांच ठिकाणाहून उठल्या व त्यांनीं मोगल साम्राज्याचा औरंगझेबाच्याच कारकीर्दींत नाश केला. सुमारें इ. स. १६७८ पासून १७०७ पर्यंत मराठे, राजपूत, जाट, बुंदेले व शीख यांनीं पांच ठिकाणाहून औरंगझेबाच्या निकृष्ट राजनीतीला विरोध केला, त्याच्या सैन्याशीं युद्धें केलीं व अखेरीस त्याला जेरीस आणिलें, आणि पुढें त्याच्या राज्याचीं पाळेंमुळें खणून काढलीं.

प्रथम मराठ्यांचें राष्ट्र हिंदूधर्म व हिंदू राज्य रक्षणार्थ उठलें. नंतर राठोड राजपूत हे आपल्या राजपुत्रांचे व राजवंशाचे रक्षणार्थ उठले. जाट प्रजा ही आपल्या स्त्रियांचें पातिव्रत्य व आपल्या मालमत्ता, धर्म व जीव यांचें रक्षणार्थ उठली. बुंदेले क्षत्रिय हे आपल्या राज्य रक्षणार्थ उठले. आणि शीख समाज हा आपल्या सांप्रदायाचें रक्षणार्थ उठला.

# शिवकालीन धर्म

*( Laws of the Times of Shiwaji )*

## आणि

# व्यवहारनिर्णय पद्धती

*( System of Judicial Adminstration )*

( ले० भास्कर वामन भट धुळें. )



एकाद्या विवक्षित देशांत वास करणाऱ्या मानवी समाजाचा इतिहास ह्मणजे त्या समाजांत गतकालीं घडलेल्या राजकीय उलाढाली, त्याचप्रमाणें त्या समाजाची परकिय समाजांशीं झालेलीं युद्धें व त्या समाजावर राज्य करणाऱ्या राजघराण्यांतील पुरुषांचीं चरित्रें इत्यादि बाबींचें कथन अशी इतिहासाची व्याख्या एके काळीं प्रचलित व सर्वमान्य होती. प्रस्तुत ही व्याख्या अशास्त्रीय ठरली असून राजवाड्यांनीं खालील वाक्यांत ग्रथित केलेली व्याख्या शास्त्रशुद्ध व सर्वमान्य समजण्यांत आली आहेः—

" मानवी समाजाच्या चरित्रांत राजकारणाखेरीज अनेक व्यवहारांचा समावेश होत असतो. धर्म, आचार, विद्या, व्यापार वगैरे अनेक व्यवहारांच्या घडामोडी राष्ट्रांत होतात; व त्यांचा समावेश समाजांच्या चरित्रांत करणें अत्यावश्यक असतें. केवळ राजकारणाचा च तेवढा विचार करून इतिहासाला थांबता येत नाहीं. ........ सबब इतिहास ह्मणजे राष्ट्राचें सर्व तऱ्हेचें व सर्व प्रकारचें गतकालीन चरित्र, सर्व प्रकारचें वर्तमान चरित्र ह्मणजे वर्तमान इतिहास, असें लक्षण स्वीकारणें अपरिहार्य आहे. "

राजवाड्यांच्या या शास्त्रशुद्ध व्याख्येच्या दृष्टीनें मथळ्यांत दर्शविलेल्या विषयांचें स्वरूपदर्शन शिवकालीन महाराष्ट्राच्या इतिहासाचें एक महत्वाचें अंग ठरतें व शिवकालच्या इतिहासाभ्यासकांस व इतिहासलेखकांस या विषयाचें विवेचन करणें प्राप्त होतें. प्रस्तुत लेखांत हें इतिहासलेखनाचें स्थूल स्वरूपाचें कार्य आह्मी सिद्ध करण्याचा संकल्प केला आहे. मथळ्यांत अंतर्भूत होणाऱ्या विषयासंबंधाचा शिवकालचा इतिहास लिहावयाचा ह्मणजे त्या कालापुरताच या विषयासंबंधाचा इतिहास लिहून भागावयाचें नाहीं. छत्रपती शिवाजी महाराज ज्या महाराष्ट्रीय मानवी समाजांत जन्मास

आले, त्या समाजाचा संबंध थेट वेदकालापावेतों पोहोंचतो. वेदकालापासून-च्या मानवी समाजांत विशिष्ट प्रकारचे धर्म अस्तित्वांत होते व तेच धर्म परंपरेनें शिवकालीन मानवी समाजांत चालत आले. पूर्वी कधीं अस्तित्वांत नव्हते अशा प्रकारचे नूतन धर्म शिवकालीं अस्तित्वांत आले असें घडलें नाहीं. हा मुद्दा लक्षांत घेतला असतां ऐतिहासिक दृष्ट्या प्रस्तुत विषयाचें शास्त्रशुद्ध विवेचन करावयाचें म्हटलें म्हणजे खालीं दर्शविलेल्या तीन कालविभागांतील या विषयाच्या स्वरूपाचें दिग्दर्शन करावें लागेल.

१. शातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव इत्यादि क्षत्रिय घराण्यांच्या राजसत्तेचा काळ.
२. मुसलमानी राजकीय सत्तेचा काळ.
३. शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याचा काळ.

या तिन्ही काळांत महाराष्ट्र देशांत वसति करणाऱ्या मानवी समाजाचें नियंत्रण कोणत्या धर्मानें केलें जात असे, प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निर्णय कोणत्या विशिष्ट पद्धतीस अनुसरून केला जात असे, या संबंधाचें साधार विवेचन या लेखांत करावें लागेल हें उघड आहे.

वर दर्शविल्याप्रमाणें विषय-विवेचनास सुरवात करण्यापूर्वी मथळ्यांतील धर्म व व्यवहारनिर्णयपद्धति या दोन संज्ञांचे अर्थ प्रथम विशद करणें जरूर आहे. धर्म ही संज्ञा प्रस्तुत लेखांत जो अर्थ व्यक्त करण्याकारितां वापरली आहे, तो अर्थ प्रस्तुतच्या महाराष्ट्रीयांच्या विशेष परिचयाचा नाहीं. मानवी प्राण्यांचें पारलौकिक कल्याण साध्य करण्याचा मार्ग हा धर्म शब्दाचा प्रस्तुतचा अर्थ सर्वत्रांस परिचित आहे. त्याचप्रमाणें दान देणें हा अर्थ व्यक्त करण्याकारितां धर्म शब्दाची योजना हल्लीं करण्यांत येते. हा अर्थ हि सर्वत्रांस परिचित आहे. हे दोन्ही अर्थ व्यक्त करण्याकारितां धर्म हा मथळ्यांतील शब्द वापरलेला नाहीं. धर्म शब्दाच्या अर्थाची यथार्थ कल्पना व्यक्त करण्याकारितां मथळ्यांत इंग्रजी शब्द Laws = कायदे हा मुद्दाम वापरला आहे. धर्म शब्दाचा वास्तविक अर्थ व व्याप्ति समजण्याकरितां याज्ञवल्क्य स्मृतीवरील विज्ञानेश्वरांनीं केलेल्या मिताक्षरा टीकेंत दिलेली धर्माची व्याख्या आह्मी येथें नमूद करितों. “ धर्म या शब्दावरून सहा हि प्रकारचे स्मार्तधर्म घ्यावे. वर्णधर्म आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, गुणधर्म, निमित्तधर्म व साधारण धर्म असे हे सहा प्रकारचे धर्म होत. ब्राह्मणांनीं कधींहि मद्य पिऊं नये, हा वर्णधर्म. ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याचा दंड पळसाचा असावा, हा वर्णाश्रम धर्म. शास्त्रीय अभिषेकादि गुणांनीं युक्त असलेल्या राजानें प्रजेचें पालन करावें; हा गुणधर्म. शास्त्रानें

ज्याचें विधान केलें असेल तें न करणें व शास्त्रानें ज्याचा निषेध केला असेल तें करणें या दोन दोषाकरितां करावें लागणारें जें प्रायश्चित्त तो निमित्तधर्म व अहिंसा, सत्यभाषण इत्यादि ब्राह्मणापासून चांडालापर्यंत सर्व मनुष्यांस एक लागूं असणारा जो धर्म तो साधारणधर्म होय." या व्याख्येंत धर्म या शब्दाचा अर्थ व व्याप्ति बरोबर रीतीनें व्यक्त केली गेली असून मथळ्यांतील धर्म शब्द हा च अर्थ व्यक्त करण्याकरितां योजण्यांत आलेला आहे. धर्म शब्दाची व्याख्या व व्याप्ति दर्शविल्यावर त्याच्या स्थूल भागांचें प्रस्तुत स्थळीं दिग्दर्शन करणें जरूर आहे. आचार, व्यवहार, प्रायश्चित, राजधर्म, स्त्रीपुरुषधर्म, यतिधर्म आपद्धर्म इत्यादि धर्मांचें याज्ञवल्क्यादि स्मृतींत दिग्दर्शन केलें आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार प्रमुख वर्णांचे लोक व या चार प्रमुख वर्णांतर्गत निर्माण झालेल्या अनेक जातींचे लोक यांचें जीवनव्यवसाय व यांचीं कर्तव्यें यांचा समावेश अचारधर्मांत होतो. व्यवहारधर्मांत खालील प्रमुख अठरा बाबींचा समावेश होतो. " १ ऋणदान, २ निक्षेप, ३ जो स्वामी नव्हे अशा पुरुषानें वस्तूचा केलेला विक्रय, ४ संभूयसमुत्थान, ५ दिलेलें धन अपात्र बुद्धीनें किंवा क्रोधानें परत घेणें, ६ सेवकांचें वेतन न देणें, ७ केलेल्या संकेताचें उल्लंघन करणें, ८ विकत दिलेली किंवा घेतलेली वस्तु पसंत न पड- ल्यामुळें देणारास किंवा घेणारास पश्चात्ताप होऊन त्यामुळें उत्पन्न होणारा वाद, ९ स्वामी व पशुपाल यांच्यामधील पशूविषयीं होणारा वाद, १० ग्रामादि सीमांचा वाद ११ शिव्यागाळी देणें हें वाग्पारुष्य व ताडनादि दंडपारुष्य १२ स्तेय ( चोरी ) १३ साहस ( बलात्कारानें धन ग्रहण करणें ) १४ स्त्री व पुरुष यांच्या समागमापासून उत्पन्न होणारा वाद १५ स्त्रिया व पुरुष यांची धर्मामध्यें व्यवस्था १६ पितृसंबंधी धनाचा विभाग १७ द्युतादि क्रीडांचे धर्म निश्चित करणें १८ पक्षी, बकरें इत्यादिकांची लढाई."

प्रस्तुत काळीं ज्यास दिवाणी व फौजदारी कायदा म्हणतात, त्यांत अंतर्भूत होणाऱ्या सर्व बाबींचा वरील अठरा स्थानांत समावेश होतो.

आतां मथळ्यांत वापरलेल्या व्यवहार निर्णय या संज्ञेचा अर्थ आम्ही स्पष्ट करून दाखवितों. वर नमूद केलेल्या अठरा व्यवहारस्थानांत अंतर्भूत होणाऱ्या स्वरूपाचा एकादा वाद प्रजेपैकीं दोन निरनिराळ्या व्यक्तींत उपस्थित झाल्यास त्याचा निर्णय करणें यासच व्यवहार निर्णय असें म्हणतात. प्रस्तुत- काळीं सर्वत्रास समजेलशा भाषेंत या संज्ञेचा अर्थ करावयाचा म्हणजे न्याय करणें हा होय. व्यवहार निर्णय अथवा न्याय करण्याची जी विशिष्ट प्रकारची पद्धति ती व्यवहारनिर्णयपद्धति होय.

## शातवाहन, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव इत्यादि घराण्यांच्या राजसत्तेचा काल.

शालीवाहन शके १२०० पावेतों शातवाहन, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव इत्यादि क्षत्रिय राजघराण्यांची राजकीय सत्ता महाराष्ट्रांत नांदत होती. या काळांत महाराष्ट्रांतील मानवी समाजांचे नियंत्रण कोणत्या धर्मानें राजे करीत असत हा महत्त्वाचा प्रश्न आहे. उपलब्ध झालेल्या पुराव्याचे अधारें या प्रश्नाचें विवेचन प्रथम करणें अवश्य आहे. महाराष्ट्र देश हा भरतखंडाचा एक भाग आहे. फार प्राचीन काळापासून भरतखंडांत वास्तव्य करणारा मानवी समाज श्रुतिस्मृतिप्रणतिधर्म आचारण करणारा आहे. वेद अगर श्रुति त्याचप्रमाणें स्मृति इत्यादि ग्रंथांत ग्रथित केलेल्या धर्मानें या समाजाचें नियंत्रण होत आलें आहे. भरतखंडांतील इतर प्रांतांतील मानवी समाजाप्रमाणें महाराष्ट्रांतील मानवी समाजाचें नियंत्रण हि श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मानेंच होत आलें आहे. तथापि श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मान्वयें भरतखंडांत वास्तव्य करणाऱ्या मानवी समाजाचें नियंत्रण खरोखर केलें जात असे कीं काय याविषयीं पाश्चात्य पंडितांकडून शंका प्रदर्शित करण्यांत आली आहे. याकारणाकरितां या शंकेंत कितपत तथ्य आहे या संबंधाची चर्चा प्रस्तुत स्थळीं करणें प्राप्त आहे.

थेट वेदकालापासून तों शिवकालापावेतों भरतखंडांत निर्माण झालेल्या धर्मवाङ्मयाचा विचार केला असतां त्याचप्रमाणें महाराष्ट्र देशांत पुरातन कालापासून शिवकालापावेतों स्मृतिग्रंथावरील टीकारूप वाङ्मयाच्या विकासाचा विचार केला असतां वर नमूद केलेली शंका निराधार आहे असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. ख्रिस्ती शतकापूर्वी १०० ते २०० वर्षांपासून ख्रिस्ती शकोत्तर १०० ते २०० वर्षाच्या दरम्यानच्या काळांत मनुस्मृति ग्रंथाची रचना झाली असें तज्ञांचें मत आहे. मनुस्मृतिच्या रचनाकालापासून ८ व्या शतकापावेतोंच्या काळांत याज्ञवल्क्य, नारद, विष्णु, बृहस्पति, वसिष्ठ इत्यादि स्मृतिग्रंथ भरतखंडांत रचण्यांत आले. या व इतर स्मृतिग्रंथावर शिवकालापावेतों खुद्द महाराष्ट्र देशांत व भरतखंडाच्या इतर प्रांतांत अनेक टीकाग्रंथ रचिले गेले. टीकाग्रंथाशिवाय धर्माच्या निरनिराळ्या भागांवर अनेक निबंधग्रंथ आठव्या शतकापासून शिवकालापावेतों रचण्यांत आले. धर्मवाङ्माचा वर दर्शविल्याप्रमाणें भरतखंडांत जो प्रचंड विकास झाला, त्या विकासापैकीं बऱ्याच भागाचें कर्तृत्व महाराष्ट्रांतील विद्वान् धर्मज्ञ ब्राह्मणाकडे असल्याचें दिसून येतें. विस्तार भयास्तव या मुद्याचें साग्र व तपशीलवार विवेचन प्रस्तुत स्थळीं करितां येत

नाहीं; त्यास निरुपाय आहे. मानवी समाजांत कोणत्याहि बाबीचा, ती बाब त्या समाजांतील लोकांच्या प्रत्यक्ष आचारांत असल्याविना, विकास होणें संभवत नाहीं. मानवी समाजाच्या निरीक्षणावरून प्रत्ययास येणाऱ्या या नियमाच्या आधारें दुसऱ्या कोणत्याहि पुराव्याच्या अभावीं श्रुतींत व मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत ग्रथित केलेल्या धर्मान्वयें महाराष्ट्रांतील मानवी समाजाचें नियंत्रण केलें जात असे हा सिद्धान्त काढण्यास प्रत्यवाय नाहीं. प्रस्तुत काळीं महाराष्ट्रांतील मानवी समाजाचें नियंत्रण ज्या मिताक्षरा नांवाच्या ग्रंथांत ग्रथित केलेल्या धर्मानुसार केलें जातें, त्या ग्रंथाचा कर्ता विज्ञानेश्वर यति हा चालुक्य वंशांतील विक्रमादित्य राजाच्या कल्याणी नांवाच्या राजधानींत शालिवाहन शक ९९१ ते १०४८ च्या दरम्यानच्या काळांत होऊन गेला. याज्ञवल्क्य स्मृतींत ग्रथित केलेल्या धर्मास अनुसरून महाराष्ट्रीय मानवी समाज आचरण करीत असल्यामुळें मिताक्षरा टीकाग्रंथ रचण्याची आवश्यकता विज्ञानेश्वरास भासली असावा हें उघड आहे.

आमच्या सिद्धान्ताच्या पुष्टीकरणार्थ दुसरीं कांहीं प्रमाणें आह्मी येथें नमूद करितों. गेल्या ७५--१०० वर्षांत भरत खंडाच्या निरनिराळ्या प्रांतांत सांपडलेलीं अनेक दानपत्रें अथवा ताम्रशासनें छापून प्रसिद्ध झालीं आहेत. सूर्यचंद्रग्रहणातिथि, संक्रांत्यादि पर्व इत्यादि प्रसंगीं वैदिक धर्मानुयायी राजे भूमि अगर इतर दानें ब्राह्मणांस देत. त्या संबंधाचे लेख ह्मणजे हीं ताम्रशासनें होत. दान देणाऱ्या राजांची प्रशंसा, दान केलेल्या वस्तूचें वर्णन, दान ज्यास दिलें असेल त्याचें नांव, गोत्र, प्रवर इत्यादिकांचा उल्लेख व दान दिल्याचा शक, मास, तिथि इत्यादि बाबींचा उल्लेख या दानपत्रांत असतो. दान देणाऱ्या राजाची मुद्रा दानपत्रावर केलेली असते. एका विशिष्ट पद्धतीनें तयार केली गेलेली ही अनेक राजांचीं शेंकडों ताम्रशासनें जीं आढळतात तीं तयार करण्याचा प्रचार केव्हां व कोठून उदयास आला याचा शोध केला असतां स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या धर्मास अनुसरून भरतखंडांतील मानवी समाजाच्या व्यवहाराचें नियंत्रण केलें जात असे, ही गोष्ट दिसून येते. हीं ताम्रशासनें करण्याचा प्रघात स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या नियमास अनुसरून अस्तित्वांत आल्याचें याज्ञवल्क्यस्मृतीपैकीं राजधर्म प्रकरणांतील खालील श्लोकावरून सिद्ध होतें.

पटे वा ताम्रपटे वा स्वमुद्रोपरिचिन्हितम् ।
अभिलेख्यात्मनो वंश्यानात्मानं च महीपतीः ॥ ३१९ ॥

मिताक्षरा टीका, राजधर्म प्रकरण.

**अर्थः**—राजानें कापसाच्या वस्त्रावर अगर ताम्रपत्रावर दानपत्र लिहावें, व त्यावर त्यानें स्वकुलाचिन्हसहित आपली मुद्रा करावी.

स्मृतिग्रंथांत आढळणाऱ्या वरील वचनांवरून दानपत्र करण्याची जी विशिष्ट पद्धति दिसून येते तिला अनुसरून शेंकडों ताम्रशासनें गेल्या दीड दोन हजार वर्षांपासून बनविलीं गेलीं आहेत, हें सिद्ध होतें. प्रस्तुत काळीं तयार करण्यांत आलेलीं शेंकडों बक्षिसपत्रें व ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपरटी ॲक्टांची दानासंबंधाचीं कलमें यांचें निरीक्षण करून ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपरटीच्या कलमास अनुसरून इंग्रजी रियासतींत बक्षिसपत्रें तयार करण्यांत येत, हा सिद्धान्त भाविष्य काळचा इतिहासकार जसा काढील त्याचप्रमाणें स्मृतिग्रंथांत ग्रथित केलेल्या नियमांस अनुसरून पूर्वकालीं दानपत्रें करण्यांत येत असत हा सिद्धान्त स्मृतिग्रंथांतर्गत दानासंबंधाचे नियम व पूर्व कालीन दानपत्रें यांचें निरीक्षण करून कोणीहि काढील. या प्रमाणावरून प्राचीन काळीं दानादि व्यवहार महाराष्ट्र देशांतील व भरत खंडाच्या इतर प्रांतांतील लोक स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या धर्मास अनुसरून करीत असत हें सिद्ध होतें.

प्राचीन काळीं महाराष्ट्रांतील मानवी समाजाचें नियंत्रण स्मृतिप्रणीत धर्मास अनुसरून होत असे, हा मुद्दा पुरातन दानपत्रांतील दुसऱ्या कांहीं उल्लेखावरूनहि सिद्ध होतो. *

दान पत्रांतील या उल्लेखांवरून निघणाऱ्या कांहीं अनुमानांचे आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. प्रत्येक ताम्रशासनांत सुरवातीस दान देणाऱ्या राजाचें वर्णन केलेलें असतें. या वर्णनांत दान देणाऱ्या राजाचें शौर्य, दातृत्व, विद्वत्ता इत्यादि नानागुणांचा उल्लेख आढळतो. " मनु, याज्ञवल्क्य इत्यादि ऋषिप्रणित शास्त्रांत सांगितलेल्या धर्मास अनुसरून आचारण करणारा व प्रजेचीं अंतःकरणें आकर्षणारा " अशा अर्थाचें विशेषण राजास दिल्याचें कांहीं

---

* **टीपः**—इंडियन ॲंटिकवरी जून १८७५
,, ,, एप्रिल ,,
,, ,, जुलई १८७८
,, ,, सप्टेंबर १८७८
,, ,, जानेवारी १८७७
,, ,, मार्च १८७०

या अंकांतील अनुक्रमें:—गुहसेन, ध्रुवसेन, मंगलीश्वर, सत्याश्रय, धारासेन, व विक्रमादित्य पहिला यांचीं ताम्रशासनें पाहा.

उल्लेखांत आढळतें यावरून त्या काळीं मनु, याज्ञवल्क्य इत्यादि ऋषिप्रणीत धर्मास अनुसरून प्रजेचें नियंत्रण करणारा राजा जनतेच्या दृष्टीनें श्रेष्ठ समजला जात असे हें उघड होतें. "वर्णाश्रमधर्माचें पालन करणारा" असें हि एक विशेषण कांहीं उताऱ्यांत आढळतें. यावरून हि मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत ग्रंथित केलेल्या धर्माचें आचरण प्रजेकडून करवून स्वतः त्या धर्मास अनुसरून त्या कालचे राजे वागत असत हें सिद्ध होतें. " अग्निष्टोम, वाजपेय, पौंड्रिक, अश्वमेध इत्यादि यज्ञ करणारा व ते यज्ञ केल्यानंतर केल्या जाणाऱ्या अवभृत स्नानानें ज्याची काया पुनीत झाली आहे " अशा प्रकारचे एका राजाचें वर्णन केलेलें एका दानपत्रांत आढळतें.यावरून हि मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत राजधर्म प्रकरणीं यज्ञादि कर्मे करण्याचा जो धर्म सांगितला आहे तो त्या काळचे राजे पाळित असत हें सिद्ध होतें. अशा प्रकारचे यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणास दान देणें हा राजाचा धर्म असल्याचें व त्या धर्मास अनुसरून त्या काळचे राजे अशा प्रकारचीं दानें देत असल्याचें एका ताम्रशासनांत अग्निष्टोमादि यज्ञ करणाऱ्या अथर्ववेदी ब्राह्मणास एक गांव दान दिल्याचा उल्लेख आहे, त्यावरून दिसून येतें. राजानें दान कोणास व कोणत्या कारणाकरितां द्यावें याविषयीं याज्ञवल्क्यस्मृतींतील नियम पाहिले म्हणजे दानासंबंधीं सर्व व्यवहार त्याकाळीं स्मृतींत सांगितलेल्या नियमांस अनुसरून होत असत हें सिद्ध होतें. स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या पंचमहापातकांचा उल्लेख एका दान पत्रांत आहे. याशिवाय कृच्छ्र, अतिकृच्छ्र चांद्रायण इत्यादि प्रायश्चित प्रकरणीं जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, तीं आचरणारे ब्राह्मण त्या काळीं होते व अशा ब्राह्मणांना दान देणें हा श्रेष्ठ धर्म आहे, असें त्या काळचे राजे समजत असत हें कांहीं दानपत्रांतील उल्लेखावरून सिद्ध होतें. दानविषयक व्यवहारासंबंधीं स्मृतींत सांगितलेले धर्म पाळण्यांत येत असत ही गोष्ट सिद्ध झाल्यावर त्या काळीं इतर बाबतींत हि स्मृतींत सांगितलेले धर्म पाळिले जात असले पाहिजे असें अनुमान करणें ओघानेंच प्राप्त होतें.

हाच मुद्दा सिद्ध करणारें दुसरें एक महत्वाचें तत्कालीन प्रमाण आम्ही येथें नमूद करितों. सिंधप्रांतावर मुसलमानांच्या स्वाऱ्या शके ८०० च्या सुमारास होऊं लागला. त्या नंतर १० व्या शतकाच्या सुमारास गजनीच्या महमदानें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. त्या काळीं, अरबस्थान पार्शिया वगैरे प्रांतांतील मुसलमान विद्वानांचें दळणवळण हिंदुस्थानाशीं सुरु होऊन त्या प्रांतांतील कित्येक विद्वान प्रवासी हिंदुस्थानांत जाऊं येऊं लागले. अशा प्रवाशांपैकीं अलबेरूनी या नांवाचा एक प्रसिद्ध विद्वान खिस्ती शक १०१७

ते १०३० च्या दरम्यान हिंदुस्थानांत आला होता. हिंदुस्थानच्या निरनिराळया प्रदेशांत प्रवास करून त्यानें कांहीं दिवस या देशांत वास केला. या त्याच्या वास्तव्यांत हिंदी मानवी समाजाच्या निरीक्षणावरून त्या समाजाच्या नानाविध विषयांसंबंधीं ज्या गोष्टी त्याच्या निदर्शनास आल्या, त्या त्यानें अरबी भाषेंत ग्रंथरूपानें लिहून ठेविल्या आहेत. अलबेरूनीस संस्कृत भाषा चांगली अवगत होती; व हिंदी ज्योतिषशास्त्राचा त्यानें विशेष अभ्यास केला होता. अलबेरूनीनें केलेल्या अरबी भाषेंतील इंडिया या नांवाच्या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर झालें असून त्या ग्रंथाच्या ६०-६१-६२-६४ इत्यादि भागांत फिर्यादी, दिव्य, शिक्षा, प्रायश्चित्तें, दायविभाग, उपवास, व्रतें या व दुसऱ्या अनेक विषयांसंबंधीं अलबेरूनीच्या अवलोकनांत आलेली माहिती त्यानें नमूद करून ठेविली आहे. अलबेरूनीनें दिलेल्या या माहितीवरून त्याच्या काळीं हिंदू समाजांतील लोक मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत सांगितलेल्या धर्मास अनुसरून आपलें आचरण करीत असत, ही गोष्ट सिद्ध होते, येथपावेतों केलेल्या विवेचनावरून मुसलमानी राजकीय सत्ता महाराष्ट्रांत स्थापन होण्यापूर्वी महाराष्ट्रांतील मानवी समाजाचें नियंत्रण मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत सांगितलेल्या धर्मास अनुसरून होत असे ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होत.

## शातवाहनादि राजघराण्यांच्या काळांतील व्यवहारनिर्णय पद्धति.

आतां याच काळांत महाराष्ट्रांत व्यवहारनिर्णय पद्धति कोणत्या स्वरूपांची अस्तित्वांत होती, याच्या चर्चेकडे आम्ही वळतों. या मुद्यासंबंधीं पुरावा म्हणण्यासारखा उपलब्ध नाहीं. मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत सांगितलेल्या धर्मास अनुसरून महाराष्ट्रांतील मानवी समाजाचें नियंत्रण होत असे, ही गोष्ट सिद्ध झाल्यावर त्याच ग्रंथात सांगितलेल्या पद्धतीस अनुसरून व्यवहारनिर्णय करण्यांत येत असला पाहिजे असें अनुमान करण्यास प्रत्यवाय नाहीं परंतु या काळांत प्रत्यक्ष व्यवहारनिर्णयपद्धति कशा प्रकारची होती हें दर्शविणारे त्या काळच्या न्यायाधिशानें केलेले निवाडे अगर दुसरे लेख, ज्याच्या आधारें या मुद्याविषयीं निश्चित अनुमान काढता येईल अशा स्वरूपाचे उपलब्ध नाहींत. खिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या सुमारास रचण्यांत आलेलें मृच्छकटिक नाटक सर्व प्रसिद्ध आहे. या नाटकाच्या ९ व्या अंकास व्यवहार अंक ही संज्ञा नाटककर्त्यानें दिली आहे. वसंतसेनेस ठार मारून तिचे दागिने चोरल्याचा आरोप चारुदत्तावर राजशालक शकार यानें केला होता. या व्यवहाराचा निर्णय न्यायाधिशानें ज्या पद्धतीनें केला, त्याचें वर्णन या अंकांत नाटकी

कर्त्यानें केलें आहे. मनुस्मृतींत ज्या स्वरूपांत व्यवहारनिर्णयपद्धति वर्णिलेली आढळते, त्या पद्धतीस अनुसरून न्यायाधिशानें चारुदत्तावरील आरोपाचा निर्णय केल्याचें दिसून येतें. चारुदत्तावरील आरोप सिद्ध झाल्याचें ठरल्यावर न्यायाधिशानें खालील उद्गार काढिले.

अयं हि पातकी विप्रेन वध्यो मनुरब्रवीत्।
राष्ट्रादस्मातु निर्वास्यो विभवैरक्षतैःसह ॥

**अर्थः**—हा पापी (गुन्हेगार] ब्राह्मण आहे. त्याचा वध करणें अयोग्य आहे असें मनूनें सांगितलें आहे. त्याला त्याच्या संपूर्ण मालमत्तेसह ह्या राष्ट्रांतून घालवून द्यावें.

न्यायनिरूपण नांवाच्या मनुस्मृतीच्या ८ व्या अध्यायांत खालील वचन आहे.

न जातु ब्राह्मणं हन्यात् सर्व पापेष्वपि स्थितम्।
राष्ट्रादेनं बहिः कुर्यात्समग्रधनमक्षतम् ॥ ३८० ॥

**अर्थः**—सर्व पापें करणाऱ्या ब्राह्मणास कधीं हि मारूं नये. तर त्यास त्याच्या सर्व धनासह शरिरास पीडा न करितां राष्ट्रांतून घालवून द्यावें.

मनूचें हें वचन व न्यायधिशाचे वरील उद्गार लक्षांत घेतले असतां मनुस्मृतींत ग्रथित केलेल्या धर्मास अनुसरून त्या काळचे राजे व त्यांच्या प्रजा वागत असत ही गोष्ट सिद्ध होते.

याज्ञवल्क्यस्मृतींत व्यवहाराचा निर्णय करणाऱ्या संस्थांचें वर्णन पुढील प्रकारचें आढळून येतें. विशिष्ट प्रकारचे गुण ज्यांच्या ठिकाणीं आहेत अशा सभासदांच्या साह्यानें राजानें व्यवहार पाहावा, असें प्रथम सांगितलें आहे. राजकार्यांत व्यग्र असल्यामुळें ज्या राजास स्वतः व्यवहारनिर्णय करतां येत नसेल, त्यानें प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या व्यवहारांचा निर्णय करण्याकरितां विशिष्ट प्रकारचे गुण ज्यांच्या ठायीं आहेत, अशा ब्राह्मणास, क्षत्रियास अगर वैश्यास प्राड्विवाक नेमावा. प्राड्विवाक ह्मणजे हल्लीं ज्यास न्यायाधिश ह्मणतात तो व त्याची नेमणूक वर सांगितल्याप्रमाणें राजानें करावयाची असते. राजा व राजानें अधिकृत केलेला प्राड्विवाक या खेरीज व्यवहारनिर्णय करण्याचा अधिकार आणखी कोणत्या संस्थांकडे होता, या संबंधाचा उल्लेख अप्रत्यक्ष रीतीनें याज्ञवल्क्यस्मृतींत व्यवहारनिर्णण करणाऱ्या निरनिराळ्या संस्थांच्या अधिकारांचें बलाबल दर्शण्यासाठीं ग्रथित केलेल्या खालील श्लोकांत आलें आहेः—

नृपेणाधिकृता पूगाः श्रेणयोऽथ कुलानि च।
पूर्वं पूर्वं गुरुज्ञेयं व्यवहारविधौ नृणाम् ॥ ३० ॥

असाधारण मातृका प्रकरण २

**अर्थः**—राजानें व्यवहारनिर्णय करण्याकरितां अधिकृत केलेला अधिकारी, पूग, श्रेणी आणि कुल या चार प्रकारच्या व्यवहार पाहाणारामध्यें पूर्व पूर्व व्यवहारदर्शी व्यवहारकर्त्यांच्या व्यवहाराचा निर्णय करण्यांत बलवान् समजाव्या.

याज्ञवल्क्य स्मृतींतील या श्लोकावरून राजानें नेमलेल्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या अधिकाऱ्याखेरीज पूग, श्रेणि आणि कुल अशा प्रकारच्या तीन व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था त्याकाळीं अस्तित्वांत होत्या असें दिसतें आतां पूग, श्रेणि, कुल ह्मणजे काय याचें स्पष्टीकरण विज्ञानेश्वरांनीं मिताक्षरा टीकेंत केलेलें आह्मीं पुढें देतों.:—

**पूगः**—पूगाः समूहाः भिन्न जातीनाम् भिन्नवृत्तीनाम् एकस्थाननिवासीनाम् यथा ग्रामनगरादयाः । ह्मणजे भिन्न जातींच्या, भिन्न वृत्ती करणाऱ्या पण एकाच स्थानीं निवास करणाऱ्या लोकांचा समूह उदाहरणार्थ ग्राम, नगर इत्यादि.

**श्रेणीः**—नानाजातीनामेकजातीनामप्येक जातीयकर्मोपजीविनी संघाताः यथा। हेडबुकादीनां तावूलिक कुविंद चर्मकारादिनां च । ह्मणजे नाना जातींच्या किंवा एकाच जातीच्या एकाच कर्मावर निर्वाह करणाऱ्या लोकांचा संघ. जसे; तांबोळी, तेली, चांभार इत्यादि

**कुलः**—कुलानी ज्ञातिसंबंधी बंन्धूनां समूहाः ॥ ह्मणजे ज्ञाति बांधवांचा समूह. विज्ञानेश्वरांच्या वरील संज्ञांच्या स्पष्टीकरणावरून शहरांतील अगर ग्रामांतील रहिवासी, निरनिराळे धंदे करणारे लोक, ज्ञातिबांधव यांच्या सभा त्याकाळीं अस्तित्वांत असून व्यवहारानिर्णयाचें काम त्या सभा करीत असत असें दिसतें.

बृहस्पति स्मृतींत व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थांची आढळणारी खालील माहिती अधिक विस्तृत आहे.

न्याय करणाऱ्या सभा चार प्रकारच्या असतात.एक स्थायी, दुसरी चल तिसरी राजमुद्रांकित व जीवर न्यायाधिशाची देखरेख आहे अशी व चौथी जी मध्यें राजा स्वतः हजर राहातो ती.

शेतकरी, सुतार, लोहार इत्यादि कारागीर, चित्रकार कर्जाऊ पैसे देणारे सामाइक भांडवलावर व्यापार करणारे, विशिष्ट धर्मपंथाची चिन्हें धारण करणारे आणि चोर या सर्वांनीं त्यांच्यामध्यें उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय त्यांच्या धंद्यांच्या नियमांस अनुसरून करावा.

साधु, जादुटोणे करणारे लोक यांच्यांत उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय फक्त तीन वेद जाणणाऱ्या लोकांकडून करवावा. त्यांच्या कोपास बळी पडण्याचा संभव असल्याकारणानें राजानें स्वतः त्यांच्या व्यवहाराचा निर्णय करूं नये.

नातेवाईक, धंदेवाईक, ग्रामस्थांचा संघ आणि राजानें नेमलेला अधिकारी यांनीं साहसासारख्या भयंकर गुन्ह्याखेरीज बाकीच्या व्यवहाराचा निर्णय करावा

नातेवाईक, धंदेवाईक, ग्रामस्थांचा संघ व मुख्य न्यायाधिश हे एकाहून एक श्रेष्ठ आहेत. झालेल्या व्यवहाराचा निर्णय उभयता वाद्यापैकीं कोणाएकास मान्य नसल्यास त्यानें व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थेहून श्रेष्ट असलल्या संस्थेकडे व्यवहाची फेर चौकशी करऱ्याबद्दल मागणी करावी.

जेव्हां एकाद्या व्यवहाराचा निर्णय नातेवाईकांनीं योग्य केला नसेल तेव्हां त्याच व्यवहाराचा निर्णय धंदेवाईकांच्या संघानें करावा. धंदेवाइकांच्या संघानें व्यवहाराचा केलेला निर्णय योग्य प्रकारें केला नसल्यास याच व्यवहाराचा निर्णय ग्रामस्थांच्या संघानें फिरून करावा. ग्रामस्थांच्या संघानें कोणत्याहि व्यवहाराचा निर्णय योग्य तऱ्हेनें न केल्यास राजानें नेमलेल्या न्यायधिशानें त्या व्यवहाराचा फिरून निर्णय करावा.

गोत, धंदेवाईक आणि ग्रामस्थ यांच्या संघाहून न्यायाधिशाचा अधिकार श्रेष्ट आहे. मुख्य न्यायाधिश त्याच्याहून श्रेष्ट व या सर्वांहून राजा श्रेष्ट आहे.

व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था किती प्रकारच्या अस्तित्वांत होत्या व आधिकार दृष्ट्या त्या परस्परांचें श्रेष्टत्व अगर गौणत्व कोणत्या प्रकारचें होतें, हें याज्ञवल्क्य स्मृतींतील वरील श्लोक व त्या श्लोकांवर विज्ञानेश्वरांनीं केलेली टीका व बृहस्पतिस्मृतींतील वरील वचनें यावरून स्पष्ट होत आहे. व्यवहार-निर्णयाच्या या स्थूल बाबींशिवाय ज्या दुसऱ्या अनेक बाबी आहेत, त्यापैकीं मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत निरनिराळ्या प्रकारचीं जीं दिव्यें सांगितलीं आहेत, तीं दिव्यें मानुषी प्रमाणाच्या अभावीं करण्याचा प्रघात त्या काळीं अस्तित्वांत होता, असें अल्बेरूनीनें केलेल्या दिव्याच्या वर्णनावरून सिद्ध होतें. याज्ञल्क्य स्मृतींत तुला, अग्नि, जल, विष व कोश हीं पांच दिव्यें सांगितलीं आहेत. अल्बेरूनीच्या ग्रंथांत दिव्याची जीं वर्णनें आढळतात तीं स्मृतींत आढळणाऱ्या दिव्या सारखीच आहेत.

## मुसलमानी राजकीय सत्तेचा काळ.

महाराष्ट्रांतील देवगिरी येथील यादव राजघराण्याचे उच्चाटन करून

मुसलमानांनीं आपलें राजकीय वर्चस्व शालिवाहनाच्या तेराव्या शतकाच्या सुमारास महाराष्ट्रांत स्थापित केलें. मुसलमानांचें हें राजकीय वर्चस्व सोळाव्या शतकांत शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना करीपावेतों टिकलें. या तिनशें वर्षांच्या काळांत प्रथम बहामनी राजघराण्याची सत्ता महाराष्ट्रांत नांदत होती. बहामनी राजसत्तेचा ऱ्हास झाल्यावर आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही, बरीदशाही व इमादशाही इत्यादि पांच निरनिराळया मुसलमान राजघराण्यांची सत्ता महाराष्ट्राच्या निरनिराळया भागावर चालूं लागली. मुसलमानी राजसत्तेखालीं महाराष्ट्रीय समाज नांदत असतां या समाजाचें नियंत्रण कोणत्या धर्मानें होत असे, त्याच प्रमाणें व्यवहारानिर्णयपद्धति कोणत्या स्वरूपाची अस्तित्वात होती याचें आतां आह्मी दिग्दर्शन करितों.

मुसलमानी धर्म व श्रुतिस्मृतिप्रणीत धर्म या उभयतांमध्यें अत्यंत विरोध असल्या कारणानें व मुसलमानी धर्माचा प्रसार हें मुसलमानी राज्यकर्त्यांचें मुख्य धोरण असल्याकारणानें हिंदुलोकांवर धार्मिक बाबतींत मुसलमान राज्यकर्त्यांकडून अत्यंत जुलूम झाला, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु मुसलमान राज्यकर्त्यांनीं ज्या श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मानें महाराष्ट्रीय समाजाचें नियंत्रण केलें जात असे, त्या धर्माचें उच्चाटन करून नवीन असे धर्म महाराष्ट्रांतील प्रजेवर लादण्याचा प्रयत्न त्यांनीं केला नाहीं. त्याच प्रमाणें व्यवहारानिर्णयपद्धतींतहि मुसलमान राज्यकर्त्यांनीं ह्मणण्यासारखी ढवळाढवळ केली नाहीं. हिंदुधर्मानुयायी पुरातन राजे स्मृतिधर्मास अनुसरून व्यवहारनिर्णय करण्याकरितां वेद व स्मृति यांत निष्णात असलेल्या विद्वान न्यायाधिशाची नेमणूक करीत असत, त्याच्या ऐवजीं मुसलमान राज्यकर्त्यांनीं काजी या नांवाचे न्यायाधीश नेमण्यास सुरवात केली. मुसलमानी राजसत्ता महाराष्ट्रांत स्थापन झाल्यानंतर उत्तर हिंदुस्थानांतून किलेक मुसमान धर्मानुयायी लोक मुसलमान राजघराण्याबरोबर महाराष्ट्रांत येऊन कायमचे राहूं लागले. महाराष्ट्रांतील कित्येक हिंदु लोकांनीं मुसलमानी धर्माचा स्वीकार करून ते मुसलमानी धर्माचे अनुयायी बनले. अशा रीतीनें बनलेल्या मुसलमान प्रजेचे व्यवहार कुराणांत ग्रथित केलेल्या धर्मास अनुसरून चालत. मुसलमानी प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय करणें हें काजीचें मुख्य काम असे. महाराष्ट्रीय प्रजेपैकीं कोणत्याहि दोन इसमांत कोणताहि व्यवहार उत्पन्न झाल्यास त्या व्यवहाराचा निर्णय काजीखेरीज दुसऱ्या कोणासहि करण्याचा अधिकार नव्हता, अशा प्रकारचा निर्बंध त्या काळचे जे कागदपत्र उपलब्ध झाले आहेत, त्यावरून अस्तित्वांत असल्याचें दिसत नाहीं.

मुसलमानी सत्ता स्थापित होण्या पूर्वी राजानें नेमलेला व्यवहारनिर्णय करणारा अधिकारी अथवा प्राडविवाक, पूग, श्रेणी आणि कुल या ज्या व्यवहार-निर्णय करणाऱ्या संस्था त्यापैकीं प्राडविवाकच्या जागीं मुसलमानीं राजांनीं काजीची स्थापना केली. या शिवाय पूर्वापार चालत आलेल्या पद्धतींत त्यानीं कांहीं फेर फार केला नाहीं. कुराणांत व्यवहारनिर्णय करण्याचा सर्व श्रेष्ठ अधिकार राजाचा समजला जातो, व तो अधिकार मुसलमान बादशहा चालवीत असत, असें त्या काळच्या लेखावरून दिसून येतें. आतां मुसलमानी सत्ता स्थापित होण्यापूर्वीच्या पूग, श्रेणी आणि कुल या ज्या व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था त्या मुसलमानी राजकीय सत्ता अस्तित्वांत आल्यानंतर हि पूर्वी प्रमाणेंच व्यवहारनिर्णयाचें कार्य करीत राहिल्या किंवा कसें हा महत्वाचा प्रश्न उपस्थित होतो. पूग, श्रेणी आणि कुल या संस्थांचें मुसलमानी राजसत्ता स्थापन होण्यापूर्वींच गोत, देशक इत्यादि नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या संस्थांत रूपांतर झालें होतें. या संस्था मुसलमानी राजवटींत व्यवहारनिर्णयाचें कार्य करीत असत, असें ह्या संस्थांनीं केलेले निवाडे, जे हल्लीं उपलब्ध झाले आहेत, त्यावरून सिद्ध होतें. गोत, देशक या खेरीज मोठ मोठ्या व्यापारी पेठांतून व्यापार विषयक व्यवहाराचा निर्णय श्रेणी या नांवाच्या व्यापारी लोकांच्या सभा करीत असत. मुसलमान राज्यकर्त्यांनीं पूर्वापार चालत आलेल्या या संस्थांच्या अधिकारांत हात न घालण्याचें कारण झटलें ह्मणजे धर्म वाङ्मय ज्या संस्कृत भाषेंत ग्रथित केले गेले आहे त्या भाषेचें ज्ञान करून घेण्याची दुर्घटता हें होय या कारणामुळें माहाराष्ट्रांत पूर्वापार चालत आलेल्या पूग, श्रेणी, कुल अथवा गोत व देशक इत्यादि व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थांचे जीवित कायम राहिलें. या काळच्या प्रसिद्ध झालेल्या या संस्थांच्या निवाड्या वरून गोत व देशक या सभांत काजीचा समावेश करण्यांत येत असे, ही गोष्ट दिसून येते. काजीच्या नांवापुढें ' हकीमशरा असें विशेषण आढळतें. 'मुसलमानी धर्मशास्त्रांत प्रवीण' असा या विशेषणाचा अर्थ आहे. न्याय करण्याकरितां मुसलमानी राजकर्त्यांनीं नेमलेल्या अधिकाऱ्याचा दाब व देखरेख या संस्थांच्या काम करण्याच्या पद्धतीवर राहावी, या दृष्टीनें या संस्थांत काजीचा समावेश करून घेण्याचा प्रघात अस्तित्वांत आला असावा असें दिसतें.

पुरातन ऐतिहासिक कागदपत्रांचें संशोधन महाराष्ट्रांत सुरू झाल्यापासून व्यवहारनिर्णय विषयक जे कागदपत्र उपलब्ध होऊन प्रसिद्ध झाले आहेत, त्यापैकीं सर्वांत पुरातन असा दुर्गादेवीच्या दुष्काळानंतरचा एक निवाडा छापून प्रसिद्ध झाला आहे. ( महाराष्ट्र सरस्वती मंदिरांत प्रसिद्ध झालेला राजवाड्यांचा ' दुर्गादेवीचा दुष्काळ ' हा लेख पाहा. )

या निवाड्या विषयीं थोडे फार विवेचन येथें करणें जरूर आहे. हा निवाडा इ. स. १४७५साला मधील आहे. बहामनी राजघराण्यापैकीं हुमायुन बादशहा गादीवर असतां दुर्गादेवीचा दुष्काळ महाराष्ट्रांत पडला होता दुष्काळ संपून सुबत्ता झाल्यावर दुष्काळामुळें देशोधडीस गेलेले लोक आपापल्या गांवावर परत येऊं लागले.अशा लोकांपैकीं भवानजी बीन लखमोजी तापकीर हा खटाव परगण्यांतील दरुज व करोली गांवचा एक पाटील होता.तो आपल्या गांवावर आल्यावर त्याची पाटिलकी रामणा बिन तिमणा यानें बळकावल्याचें त्यास आढळलें. त्यावरून त्यानें आपली पाटीलकी परत मिळविण्याबद्दल व्यवहार सुरू केला. वरील लेख हा या व्यवहाराचा निवाडा आहे. आतां या निवाड्यावरून त्या काळच्या व्यवहारनिर्णयासंबंधीं कोणत्या स्वरूपाचीं अनुमानें निघतात, याचें प्रस्तुत स्थळीं आह्मी थोडेंबहुत विवेचन करितों.

अग्रवादी भवानजी तापकीर यास त्याची पाटीलकी रामणा बिन तिमणा यानें बळकावल्याचें निर्देशनास येतां च त्यानें मुसलमान अधिकाऱ्यापाशीं फिर्याद केली. त्या अधिकाऱ्यानें स्वतः या व्यवहाराचा निर्णय न करितां देशमूख, देशकुळकर्णी, परगण्याचे मोकादम यांची एक सभा करून त्या सभेनें या व्यवहाराचा निकाल केला, असें महजरांत नमूद केलें आहे. यावरून असल्या व्यवहाराचा निर्णय देशमूख, देशकुळकर्णी व मोकादम यांच्या सभेनें करावयाचा असा प्रघात त्याकाळीं अस्तित्वांत असल्याचें दिसतें. ज्या अधिकाऱ्याकडे भवानजीनें फिर्याद केली, त्यानेंच या व्यवहाराचा निर्णय करावा असा निर्बंध त्याकाळीं अस्तित्वांत असता तर या व्यवहाराचा निर्णय देशमूख देशकुळकर्णी व मोकादम यांच्या सभेनें केल्याचें आपल्या निदर्शनास आलें नसतें. महाराष्ट्रांत व्यवहारनिर्णय करणाऱ्या ज्या पूर्वापार संस्था अस्तित्वांत होत्या, त्यांचा मुसलमान राजकर्त्यांनीं नायनाट न करितां पूर्वीप्रमाणेंच व्यवहारनिर्णयाचे अधिकार या संस्थेकडे कायम ठेविले, हा जो सिद्धांत आह्मी मागें नमूद केला आहे, तो खरा असल्याचें या निवाड्यावरून सिद्ध होत आहे. देशमूख, देशकुळकर्णी, मोकादम यांच्या सभा व्यवहारनिर्णयाचें काम कोणत्या पद्धतीनें करीत असत याचें दिग्दर्शन या महजरांत नमूद करण्यांत आलें आहे, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. व्यवहाराची चौकशी करण्यापूर्वी इनसफिची पुरशीस हरदो जणास सभेनें केली; त्याचप्रमाणें उभयतां वाद्यापासून जामीन तकरीरा व मुचलके घेतले. या प्रमाणें पुरशिस, तकरीरा, जामीन, मुचलके घेतल्यावर सभेनें व्यवहाराचा निर्णय केला. या दोन मुद्यांखेरीज महजरांतील लक्षांत ठेवावयाची गोष्ट ह्मणजे आपलें ह्मणणें खरें आहे असें सिद्ध करून देण्या-

करितां उभयतां वाद्यांपैकीं कोणास हि दिव्य करून आपला पक्ष खरा ठरविण्याची देण्यात आलेली सवलत ही होय. मराठी भाषेंत कायद्याच्या म्हणी अगर वाक्प्रचार किती आहेत. ह्याविषयीं निश्चित विधान करतां येणें शक्य नाहीं. कारण धर्म विषयक लेखांचा संग्रह महाराष्ट्रांत अफाट असून अद्याप पावेतों त्याचें संशोधन व प्रकाशन विस्तृत प्रमाणावर झालेलें नाहीं. प्रस्तुत काळीं या निवाड्यांत असणारा एक वाक्प्रचार हा एकमेवाद्वितीयम् या अपूर्व कोटींपैकीं असून वाक्प्रचाराचे श्रेष्ठत्व ठरण्यास जे गुण लागतात, ते सर्व या वाक्प्रचाराच्या ठायीं असल्याचे दिसतात. कोणत्याहि वादग्रस्त व्यवहाराचा निर्णय ज्या प्रमाणांच्या आधारावर करावयाचा, तीं प्रमाणें श्रुतिस्मृतिशास्त्रानुसार दोन प्रकारचीं मानलीं आहेत. एक मानुषी प्रमाण व दुसरें दैवी प्रमाण. मानुषी प्रमाण म्हणजे वादग्रस्त मुद्यासंबंधीं लेख, भोगवटा व साक्षी हें होय. कोणत्या हि व्यवहाराचा निर्णय या तीन प्रकारच्या प्रमाणाच्या आश्रयानें करावा, असें स्मृत्यादि ग्रंथांत सांगितलें आहे. मानुषी प्रमाणाच्या अभवीं व्यवहारनिर्णयार्थ दैवी प्रमाणाचा आश्रय करावा, असें त्याच श्लोकांत सांगितलें आहे.

प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितम् ।
एषामन्यतमाभावे दिव्यान्यतममुच्यते ॥ श्लोक २२
[ याज्ञवल्क्यस्मृति अ. मा.२ ].

**अर्थः**—लेख, भोगवटा व साक्षी ही प्रमाणें आहेत. याच्या अभावी दैवी प्रमाणाचा आश्रय करण्यांत यावा. याज्ञवल्क्य स्मृतीच्या या श्लोकांत जें तत्त्व ग्रथित केलें आहे, तेंच तत्त्व " दिवस असतां दिवा नाहीं व गोही असता रवा नाहीं " या वरील निवाड्यांतील मराठी म्हणींत अगर वाक्प्रचारांत ग्रथित केले आहे. त्याकाळीं सामान्य प्रतीच्या लोकांस हि धर्माचीं तत्त्वें वाक्प्रचाराच्या रूपानें विदित असत व त्या तत्त्वांचा योग्य समयीं उपयोग करण्यात येत असे, असें वरील निवाड्यावरून सिद्ध होतें. कोणत्याही व्यवहाराचा निर्णय सभेनें केला म्हणजे त्या व्यवहाराचा लेख करीत असत, हें वरील निवाड्यावरून दिसतें. अशा प्रकारच्या निवाड्यास महजर ही संज्ञा होती.महजर म्हणजे निवाडा. निवाडापत्र ही संज्ञा हि अशा प्रकारच्या लेखास त्या काळीं देत असल्याचें, उपलब्ध झालेल्या कागदपत्रावरून दिसून येतें. वरील महजरांत दिव्याचा जो प्रकार वर्णिला आहे, त्या विषयीं विस्तृत विवेचन आम्हीं पुढें करणार आहों. अल्बेरूनीनें दिव्याचे जे प्रकार वर्णिले आहेत त्या प्रकारासारखा एक प्रकार महजरांत वर्णिला आहे, हें निवाडा वाचल्यानें सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

वरील महजर ज्या सालचा आहे, त्यानंतरचा शके १५२२ म्हणजे

इ. स. १६१० सालांतील दुसरा एक महत्वाचा महजर त्या काळच्या व्यवहार निर्णय पद्धतीवर प्रकाश पाडणारा मराठ्यांच्या इ. सा. खंड १५ पान २२ वर छापला आहे तो जिज्ञासु वाचकांनीं वाटल्यास वाचून पाहावा.

मुसलमानी राजकीय सत्तेखालीं महाराष्ट्रीय समाज नांदत असतां महाराष्ट्रांत व्यवहार निर्णयपद्धति कोणत्या स्वरूपाची अस्तित्वांत होती याची बरीचशी कल्पना येथपावेतों केलेल्या विवेचनावरून वाचकास झाली असेल.

# शिवकाल.

स्वराज्याची स्थापना करण्यांत छत्रपती शिवाजी महाराजांचे मुख्य ध्येय श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माची उर्फ महाराष्ट्रधर्माची स्थापना करणें हें असल्याचें सिद्ध झालें आहे. स्वराज्याची स्थापना केल्यावर या ध्येयास पोषक अशा प्रकारच्या योजना राज्ययंत्रांत शिवाजी महाराजांनीं कोणत्या प्रकारच्या अस्तित्वांत आणल्या याचें आह्मीं प्रथम दिग्दर्शन करितों.

छत्रपती शिवाजी महाराजांनीं स्वराज्याच्या नियंत्रणाकरितां अष्टप्रधान संस्था निर्माण केली. मोगल राज्यपद्धतीचें अनुकरण ह्मणून ही संस्था निर्माण न करितां मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृति व शुक्रादि नीतिग्रंथ यांत ग्रंथित केलेल्या राजधर्मास अनुसरून त्यांनीं ती बनविली ही गोष्ट सिद्ध झाली आहे.* श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचे मुख्य भाग तीन. आचार, व्यवहार व प्रायश्चित्त. या तीन भागांपैकीं व्यवहारधर्म रक्षणार्थ छत्रपति शिवाजी महाराजांनीं न्यायाधीश या नांवाच्या एका स्वतंत्र प्रधानपदाची अष्टप्रधानपद्धतींत योजना केली. मल्हार रामराव चिटणीसकृत राजनीतींत न्यायाधीश प्रधानपद धारण करणाऱ्यानें करावयाचीं कामें खालीं दर्शविल्याप्रमाणें नमूद केलीं आहेत.:—

" दंड नीति ह्मणजे न्याय-अन्याय-विचार-युक्त याचें नांव दंडविद्या होय. याचें फळ. न्याय, अन्याय पाहून शासन केलें असतां अधोगतिप्रति न जातां उत्तम गतीनें राजा पावतो. आणखीहि तर्क, शास्त्र, वेदांत, मिमांसा, मनुस्मृति या सर्व अभ्यांत असाव्या. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण, यांचे धर्म व ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, सन्यासी हे चारी आश्रम, यांचे धर्म सांगितल्या विद्या यांत आहेत, ते जाणोन वर्णाश्रमधर्म ज्याचे त्याजपासून करवून धर्म संरक्षण करावा. संपूर्ण विद्या व आश्रमधर्म यांची प्रवृत्ति करणारा भूपति याणें या विद्यांचा अनादर केल्यास सर्वही धर्मांचा लोप होतो. धर्म नाश पावला असतां वर्णसंकर होऊन सर्वही अधःपात पावतात. या करितां वर्णाश्रम धर्म

* टीपः—महाराष्ट्रधर्म पा. २४४

जाणून रक्षण करणारा राजा याणें सांगितलें प्रकारें करून वर्णाश्रमधर्म रक्षण केले असतां इच्छिलें फळ पावतो. ”

( चिटणीसकृत राजनीति पान १८ )

---

× महाराष्ट्रधर्म पान २४४ पाहा.

श्रुतिस्मृतिधर्मान्वयें माहाराष्ट्रीय समाजाचें नियंत्रण योग्य प्रकारें व्हावें एतदर्थ अष्टप्रधान संस्थेंत शिवाजी महाराजांनीं न्यायाधीश प्रधानाची नेमणूक केल्याचें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे. आतां शिवकालीन धर्म व व्यवहारनिर्णयपद्धति यांच्या दिग्दर्शनाकडे आम्ही वळतों.

## शिवकालीनधर्म

शातवाहन, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव इत्यादि श्रुतिस्मृतिप्रणितधर्मानुयायी राजांच्या, त्याच प्रमाणें मुसलमानी राजकर्त्यांच्या कारकीर्दींत महाराष्ट्रीय लोक–समाजाचें नियंत्रण श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास अनुसरून होत असे, हें मागें केलेल्या विवेचनावरून सिद्ध झालें आहे. शिवाजी महाराजांच्या काळीं याच धर्मास अनुसरून महाराष्ट्रीय समाजाच्या पूर्वपरंपरेनुसार महाराष्ट्रीय समाजाचें नियंत्रण होऊं लागलें. छत्रपति शिवाजी महाराज हे श्रुतिस्मृति-प्रणीत धर्माचे अनुयायी व अभिमानी असल्या कारणानें मुसलमान राजकर्त्यांच्या राजवटींत धर्माच्या नियंत्रणाच्या बाबतींत आलेलें शैथिल्य नष्ट होऊन त्या ऐवजीं धर्माच्या नियंत्रणाचा सक्तशीरपणा अस्तित्वांत आला. शिवकालचे जे धर्म विषयक लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्या लेखांतहि विज्ञानेश्वरांच्या मिताक्षरा ग्रंथाची धर्मग्रंथ या नात्यानें महति किती श्रेष्ठ प्रकारची समजली जात होती हें दिसून येतें. शके १५८५ आश्विन शुद्ध २ ( इ० स० १६६३ ) चे ब्राह्मण-सभेचें व राजसभेचें एक निवाडापत्र सावजी बीन सूर्याजी मोकादम कसबे तलबीड व नेताजी बीन धारोजी मोकादम यांच्या दरम्यान पाटीलकीच्या वादा संबंधाचे प्रसिद्ध झाले आहे. [Sanads and letters by Wad and parasnis पान११५ ] या वादाचा निवाडा ब्राह्मणसभा व राजसभा या उभयतांनीं केला. या लेखांत आढळणाऱ्या खालील उल्लेखावरून विज्ञानेश्वराच्या याज्ञवल्क्य स्मृतींवरील मिताक्षरा टिकेचें महत्व कशा प्रकारचें त्या काळीं मानलें जात असें हें दिसून येतें.

“ आजि मजालसीस लोक ज्यास वृत्ति आहेत व वृत्तींचे व्यवहार जी ही निवडले आहेत, देखिलें ऐकिलें ऐसे लोक मजालसी सभेस बैसविले होते. त्यास स्वतंत्र वादें एक एकास पुशिले. ज्या ज्याची बुद्धि जैसी चालली, तैसी

अवघीयांनीं सांगितली. ते राजश्री नेताजी राजे पालकर येहीं मनींच ठेऊन मग महाबळेश्वरास मनुष्य पाठवून विज्ञानेश्वर आणविला, आणि पंडित विद्वंस यांच्या मुखांतरें विज्ञानेश्वरामध्यें वृत्तीच्या विशेष विवंचना ज्या होत्या त्या संपूर्ण मनास आणून धर्मशास्त्राचा मतितार्थ काढून व सकल गोत व सभानायक मिळोन धर्मता आपले पूर्वज स्मरोन बर हक्क निवाड केला बिा तपशील:—

यावरी सभासदीं विज्ञानेश्वराचा शास्त्रार्थ पाहिला. तेथें आज्ञेनें धाकटा होऊन वृत्तोंस कस्त करून रक्षील तर त्यास ही भाग द्यावा आणि समाजाविशी करावी. या विचारें धर्मता बरहक्क हरदो वादी यांचा निवाडा केला. " या उल्लेखवारून वादग्रस्त धर्मप्रश्नांचा निर्णय करण्याच्या बाबतींत विज्ञानेश्वराचा मिताक्षरा ग्रंथ आधारभूत मानण्यांत येत असे हें सिद्ध होतें. दादोजी कोंडदेव हे ज्या मजालशीचे एक सभासद होते अशा सभेनें एका पाटीलकी वतनाच्या मिळकतीबद्दल केलेल्या निवाड्याचें निवाडपत्र प्रसिद्ध झालें आहे. ( म. इ. सा. ख. १८ पा. २४ ) दोघा भावांत वडिलोपार्जित मिळकतीचे वाटेहिस्से पडून जो तो आपल्या हिश्याच्या मिळकतीचा उपभोग घेत असतां एका भावाचा मुलगा मयत झाला. त्यानंतर त्याच्या हिश्शाचा उपभोग त्याची आई घेऊं लागली. तिनें तिच्या नवऱ्याच्या वाट्यास आलेली मिळकत लहानपणापासून मुलगा म्हणून वाढविलेल्या ( पालकपुत्रास ) एका इसमास दिली. विभक्त झालेल्या भावाच्या मुलानें पालकपुत्रास दिलेल्या मिळकतीबद्दल वाद उपस्थित केला. या स्वरूपाच्या वादाचा ज्या सभेनें निकाल केला, त्या सभेचे दादोजी कोंडदेव हे एक सभासद होते. गोत सभेनें पालकपुत्रास मिळालेल्या मिळकतीबद्दल वाद उपस्थित करण्याचा हक्क विभक्त झालेल्या भावाच्या मुलास नाहीं व पालकपुत्र त्या मिळकतीचा मालक आहे असा निवाडा दिला. या निवाड्याचा निकाल, विभक्त झालेल्या भावाची बायको त्याच्या पश्चात् तीस मिळालेल्या हिश्शाची पूर्ण मालकीण होते तिला मिळालेला हिस्सा वाटल्यास स्वतः उपयोग घेण्यास अगर तिच्या इच्छेस येईल त्यास देण्याचा तीस पूर्ण अधिकार आहे, या तत्त्वावर सभेनें केला. हें तत्त्व विज्ञानेश्वरांनीं मिताक्षरा ग्रंथांत प्रतिपादिलें आहे, असें नमूद करून गोतसभेच्या निवाड्यांत खालील वचनें आधार म्हणून नमूद करण्यांत आलीं आहेत.

पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा ।
तत्सुतो गोत्रजो बन्धुः शिष्यः सब्रह्मचारिणः
पिण्डादौऽशहरश्चैषां पूर्वाभावे परः परः

वृद्धमनुः—अपुत्रा शयनं भर्तुः पालयंती व्रते स्थिता ॥
पत्न्यैव दध्यात्तंपिंड कृत्स्नअंश लभेचेति

बृहस्पतिः—कल्येषु विद्यमानेषु पितृभातृसनाभिषु ।
असुतस्य प्रमीतस्य पत्नी तद्भागहारिणी ॥

या वचनांचे आधारावर विज्ञानेश्वरांनीं खालील सिद्धांत ग्रथित केला आहे.

तस्मादपुत्रस्य स्वर्यातस्य विभक्तास्यासंसृष्टिनः
परिणीता स्त्री संयता सकलमेव धनं गृण्हातीति स्थितम्

या निवाड्यावरून हि मिताक्षरा ग्रंथांत ग्रंथित केलेले धर्म शिवकालीं शिरसावंद्य मानण्यांत येत असत व त्या धर्मास अनुसरून सर्व व्यवहारांचें धर्माधर्मत्व ठरविलें जात असे हें सिद्ध होतें. मिताक्षरा ग्रंथाखेरीज मनुस्मृति, मयूख, दानकमलाकर हे हि ग्रंथ प्रमाणभूत मानण्यांत येत असत, असें त्या काळच्या कांहीं लेखांवरून दिसून येतें. ( Sanads and letters by Parasnis and Wad पान २१७ वरील निवाडापत्र पहा. )

## शिवकालीन व्यवहारनिर्णयपद्धती

आतां शिवछत्रपति–कालीं व्यवहारनिर्णयपद्धति कोणत्या स्वरूपाची होती या संबंधाच्या विवेचनाकडे वळूं. व्यवहारनिर्णयपद्धति संबंधीं विवेचनाचा महत्वाचा भाग ह्मणजे व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्था व त्यांचे व्यवहार-निर्णय करण्याचे अधिकार हा होय. व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थाची व्यवहाराचा निर्णय करण्याची पद्धति–हल्लींच्या भाषेंत बोलावयाचें ह्मणजे ज्यास प्रोसीजर ( Procedure ) ह्मणतात ती कशी होती हा व्यवहार-निर्णयपद्धतीचा, महत्वाच्या दृष्टीनें दुय्यम प्रतीचा भाग होय. या भागातच व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थेनें व्यवहारनिर्णय केल्यानंतर तो निर्णय अमलांत आणण्याच्या पद्धतीचा समावेश होतो. आतां या [illegible]नें आह्मी दिग्दर्शन करितों.

छत्रपति शिवाजी महाराजांच्या काळीं व्यवहारनिर्णय करणाऱ्या एकंदर संस्था किती प्रकारच्या होत्या, त्यांचे अधिकार कोणत्या स्वरूपाचे होते या विषयींचा भरपूर पुरावा उपलब्ध झाला आहे. मौजे सोनारी परगणें पुणें येथील कुळकर्णी वतनाबद्दल वाद उपस्थित झाला. शिवाजी महाराजांकडे त्याबद्दल फिर्याद झाली. या व्यवहाराचा निर्णय शिवाजी महाराजांनीं शकें १५९० मध्यें केला. सदर व्यवहाराच्या निर्णयाचा निवाडा प्रसिद्ध झाला आहे. त्या निवाड्यांतील खालील उल्लेख महत्त्वाचा आहे. " तुह्मी गोतास राजी असाल तर गोतांत पाठवूं. परस्थळास राजी असाल तर परस्थळास पाठवूं अगर हमशाई

गांवचे मोकादम ...... व मौजे मजकूरचे मोकदम व बारा बलुते यांशीं राजी असाल तर त्याचे गोष्टीवरून मुनसफी करून जे गोष्टी तुह्मास मानलि ते सांगणें." शिवकालीं व्यवहारानिर्णय करणाऱ्या संस्था कोणत्या प्रकारच्या अस्तित्वांत होत्या, याचें दिग्दर्शन वरलि उताऱ्यांत झालें आहे. गोत, परगांवचें गोत, हमशाई गांवचे मोकदम, मौजे मजकूरचे मोकदम व बारा बलुते यांची सभा ह्मणजे च देशक सभा यांपैकीं व्यवहाराचा निर्णय कोणाकडून करून घेण्याची मर्जी आहे, अशी पृच्छा फिर्यादीस करण्यांत आल्याचें वरलि उताऱ्यांत नमूद आहे. आतां आह्मी गोत, परगांवचे गोत, देशक इत्यादि संस्थांच्या स्वरूपाचें व रचनेचें दिग्दर्शन करितों.

## गोत सभा

प्रत्येक गांवांतील रहिवाशांत कोणत्या हि स्वरूपाचा वाद उपस्थित झाल्यास त्या वादाचा निर्णय गांवांतील सभेनें करावयाचा प्रघात महाराष्ट्रांत फार पुरातन काळापासून होता. या सभेची रचना कशा प्रकारची असे हें पुढें दर्शविण्यांत येईल. गांवच्या या सभेस गोत सभा असें ह्मणतात. थळ [स्थळ] सभा असें दुसरे नांव या सभेस असे. मायस्थळ असें तिसरें नांव या सभेस असे. या सभेनें केलेल्या निवाड्यास गोतनिवाडा अगर थळपत्र असें ह्मणतात. एकाद्या गांवीं उत्पन्न झालेल्या वादावर त्या गांवच्या गोतसभेनें ( मायसभेनें ) निकाल न करितां दुसऱ्या गांवच्या सभेनें करावा, असें......वाद्यापैकीं कोणी मागणें केल्यास त्या वादाचा निर्णय करण्याकारितां दुसऱ्या गांवच्या गोतसभेकडे ह्मणजे परस्थळाकडे अगर दूरस्थळाकडे तो वाद पाठविण्यांत येत असे. गांवची गोतसभा एका वाद्याचा पक्षपात करून वादाचा निकाल न्यायानें करणार नाहीं, अशी भीति एकाद्या वाद्यास वाटत असल्यास तो वाद निर्णयासाठीं परस्थळाकडे पाठवावा अशी मागणी त्यास करतां येत असे, व गोतसभा त्याच्या मागणीप्रमाणें त्या वादाचा निर्णय करण्याचें काम परस्थळाकडे सोपवीत असे. प्रस्तुत काळीं "गावपंचायत" हा शब्द ज्या संस्थेचा दर्शक ह्मणून वापरला जातो, त्या संस्थेचें शिवकालीन नांव "गोत" हें होय. आतां या गोताची रचना कशा प्रकारची होती व गोताचे अधिकार कोणत्या स्वरूपाचे होते यांचें दिग्दर्शन करूं. महाराष्ट्रांतील प्रत्येक खेड्यांत गांवचा पाटील व कुळकरणी अगर ग्राम लेखक हे प्रमुख वतनदार व या शिवाय ग्रामाचे बारा वृत्तींवंत अगर बारा बलुतेदार हे असत. कांहीं गांवास वृत्तिवंत बारापेक्षां कांहीं कमी असत. पाटील, कुळकरणी हे प्रमुख वतनदार, बलुतेदार, शेटे, महाजन ह्मणजे उदीमा अगर

व्यापारी व गांवांतील जमिनीचे मालक ह्या सर्वांचीं मिळून गोतसभा बनत असे. बारा बलुते यासंज्ञेंत पुढील वृत्तीवंतांचा समावेश होतो. १ सुतार २ लोहार ३ चांभार ४ महार ५ मांग ६ कुंभार ७ न्हावी ८ धोबी ९ गुरव १० जोशी ११ भाट १२ मुलाणा. या प्रकारें बनलेल्या सभेस गोत अगर गोतसभा ह्मणत. गोतसभेंत कमींत कमी अगर जास्तींत जास्ती अमुक इतके सभासद असले पाहिजे असा निर्बंध अस्तित्वांत असल्याचें दिसत नाहीं. या सभेपुढें कोणताहि व्यवहार अगर वाद निर्णयार्थ आला, ह्मणजे त्या व्यवहाराचा निर्णय गांवच्या गोतसभेनें च करावा अगर त्या वादाचा निर्णय करण्याकरितां तो दुसऱ्या गांवच्या सभेकडे पाठवावा. या विषयीं उभयतां वाद्यांची मर्जी काय आहे, याचा खुलासा गोत सभेचे सभासद प्रथम करून घेत. गांवच्या गोतसभेनें च निर्णय करावा अशी इच्छा उभयतां वाद्यांनीं दर्शविल्यास त्या वादाचा निर्णय उभयतां वाद्यांच्या हकीकती लिहुन घेऊन त्या च प्रमाणें पुरावा घेऊन गोतसभा करीत असे हा निर्णय अथवा निवाडा लेखी असे. उभयतां वाद्यांच्या हकीकती, त्या उभयतां-मध्यें उपस्थित झालेल्या वादाचें स्वरूप, उभयतां वाद्यातर्फे गोतसभेपुढें मांडण्यांत आलेल्या लेखी व तोंडी पुराव्याचा सारांश व गोतसभेनें केलेला निर्णय या सर्व बाबी गोतसभेच्या निर्णयांत अगर निवाड्यांत नमूद करण्यांत येत असत. गोतसभेच्या निवाड्यांत सुरवातीस गोतसभेस हजर असलेल्या लोकांनीं आपलीं नांवें लिहिण्याचा प्रघात होता. बलुतेदारांपैकीं फार थोड्यांना लिहितां येत असे. त्यांच्या निशाण्या त्यांच्या नांवापुढें करण्यांत येत असत. उदाहरणार्थ महाराची निशाणी ह्मणून विळा व दोराचें चित्र काढण्यांत येत असे. चांभाराची निशाणी ह्मणजे रापीचें चित्र, गुरवाची निशाणी धुपाटणें व पाटलाची निशाणी नांगराचें चित्र काढण्याचा पारिपाठ होता. याप्रमाणें तयार करण्यांत आलेल्या निवाड्याच्या लेखास, गोतनिवाडा, गोतनिर्णय, गोत महजर अगर थळपत्र या संज्ञा असत. गोतानें अमुक एका व्यवहाराचा निर्णय करावा आणि अमुक एका व्यवहाराचा निर्णय करूं नये असा प्रकारचा निर्बंध अस्तित्वांत असल्याचें दिसत नाहीं. जो कोणता वाद दोन गांवकऱ्यांत उत्पन्न होईल त्या वादाचा निकाल, ते लोक ज्या गांवांत राहात असतील त्या गांवच्या लोकांच्या सभेनें ह्मणजे गोतसभेनें अगर गोतानें करावयाचा हा निर्बंध होता. प्रचलित राजसत्ता धारण करणाऱ्यांनीं नेमलेल्या अधिकाऱ्यानें च त्या व्यवहाराचा निर्णय करावयाचा, दुसऱ्या कोणीं करावयाचा नाहीं असा प्रस्तुत काळच्या निर्बंधासारखा निर्बंध त्या काळीं अस्तित्वांत नव्हता.

गोतसभेची रचना व तिचा अधिकार या संबंधाची माहिती प्रसिद्ध झालेल्या लेखांत वरील स्वरूपाची असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. पूर्व परंपरेच्या दृष्टीनें पूर्व कालीन कोणत्या संस्थांचें रूपांतर होऊन या संस्था उदयास आल्या, याचें मागें विवेचन केलें च आहे. स्मृत्यादि ग्रंथांत ' कुलसभा ' ही संज्ञा ज्या संस्थेस होती त्या च संस्थेचें रूपांतर गोतसभेंत होऊन कुलसभेकडील व्यवहार निर्णयाचे अधिकार गोतसभेकडे आले असावे असा तर्क होतो. कुल ह्मणजे ज्ञाति बांधव. प्रस्तुत स्वरूपाची ग्रामसंस्था आपल्या दृष्टोत्पत्तीस येते तशा स्वरूपाची ग्रामसभा अस्तित्वांत येण्यापूर्वी एक एक कुलाची एक सभा असे. कुलामध्यें दूर दूरचे नातेवाईक व त्यांच्यावर अवलंबून राहाणारे लोक यांचा समावेश होत असे. अशा प्रकारच्या कुलांचा विस्तार मोठा असे, व या कुला-पैकीं कोणत्याहि दोन माणसांत वाद उपस्थित झाला तर त्या वादाचा निर्णय कुलांत अंतर्भूत होणाऱ्या सर्व लोकांनीं ह्मणजे ज्ञातिबांधवांनीं करावयाचा, असा प्रघात फार प्राचीन काळापासून होता. कुळाचें रूपांतर ग्रामसंस्थेंत झालें. ज्ञातिबांधवाच्या अथवा कुलसभेच्या ठिकाणीं व्यवहारनिर्णय करणारी गोत-संस्था अस्तित्वांत आली; व कुलसभेचा व्यवहारनिर्णय करण्याचा अधिकार गोतसभा चालवूं लागली. गोतसभेची व तिनें केलेल्या निवाड्याची कल्पना वाचकांस मराठ्यांच्या इतिहासाची साधनें खंड पंधरा ते एकविस यामध्यें प्रसिद्ध झालेल्या निवाड्यावरून होण्यासारखी आहे.

गोत सभेपेक्षां श्रेष्ठ दर्जाची व्यवहारनिर्णय करणारी संस्था ह्मटली ह्मणजे देशकसभा ही होय. देशकसभेची रचना व आधिकार यांचें प्रथम दिग्दर्शन करितों. ज्या सभेंत देशाचे वतनदार ह्मणजे देशमूख, देशपांडे हे सभासद असत व या सभेस देशकसभा ही संज्ञा होती. परगण्याच्या ठिकाणीं देशमूख, देशपांडे हे वतनदार असत; व त्या ठिकाणीं देशकसभा भरत असे. देशकसभेंत परगण्याच्या वरील वतनदारांखेरीज परगण्यांतील निरनिराळया गांवचे वतनदार पाटील व शेटे महाजन हेहि सभासद असत. गोतसभेप्रमाणेंच देशकसभेच्या सभासदांची संख्या ठरलेली नव्हती. जितके लोक येतील तितक्या सर्वांना सभेंत भाग घेतां येत असे. गोतसभा ज्या पद्धतीनें व्यवहारनिर्णय करीत असे त्याच पद्धतीनें देशकसभा व्यवहाराचा निर्णय करीत असे. देशकसभेकडे कोणकोणत्या व्यवहाराचा निर्णय करण्याचा अधिकार असे हा प्रश्न महत्वाचा आहे. गोतसभेनें एकाद्या व्यवहाराचा निर्णय केला, परंतु तो निर्णय बरोबर झाला नाहीं, असें उभयतां वाद्यांपैकीं एकाद्यास वाटल्यास त्याच व्यवहाराचा निर्णय देशकसभेकडून करून घेतां

येत असे. या शिवाय देशकसभेकडून एकाद्या व्यवहाराचा निर्णय करून घ्यावा ह्मणून एकाद्या वादीनें आपला व्यवहार देशकसभेकडे आणला तर त्या व्यवहाराचा हि निर्णय देशकसभेस करितां येत असे. देशकसभेनें व्यवहाराचा निर्णय केला ह्मणजे ती त्याबद्दल लेख देत असे. त्या लेखावर हजर असलेल्या सभासदांच्या सह्या घेण्यांत येत. देशकांनीं केलेल्या निवाड्यास देशक महजर देशक निवाडा असें ह्मणत. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथांत देशक निवाडे बरेच प्रसिद्ध झाले आहेत.

देशकसभेचें पूर्वरूप कोणतें होतें याचें दिग्दर्शन मागें केलें आहे. विज्ञानेश्वरांनीं नाना जातीच्या व निरनिराळा धंदा करणाऱ्या लोकांची सभा ह्मणजे "पूग" अशी व्याख्या दिली आहे. ही व्याख्या देशकसभेस लागू पडते. पूग सभेस च देशकसभा ह्मणण्याचा प्रघात पडला असावा असें दिसतें.

व्यवहारनिर्णय करणाऱ्या या दोन संस्थांखेरीज शिवकालीं **ब्राह्मणसभा** हि अस्तित्वांत होत्या. एकाद्या ब्राह्मणानें स्मृतिविहित आचाराविरुद्ध वर्तन केल्यास त्याचा निर्णय ब्राह्मणसभेनें करण्याचा परिपाठ असे. या शिवाय कोणीं एकाद्यानें आपला व्यवहार ब्राह्मणसभेकडे निर्णयार्थ नेला तर त्या व्यवहाराचा निर्णय हि ब्राह्मणसभेनें करण्याचा प्रघात असे. कऱ्हाड, माहुली, वाई, नाशिक, कोल्हापूर, पैठण इत्यादि महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध क्षेत्रांच्या ठिकाणीं स्मृती शास्त्राचा अभ्यास करणारे ब्राह्मण असत. या ब्राह्मणांच्या सभांकडे कित्येक लोक आपले वाद निवडण्याकरितां नेत असत. पंधराव्या खंडांतील ज्या निवाड्याचा मागें उल्लेख केला आहे, त्यावरून ही गोष्ट दिसून येते. कऱ्हाड येथील धर्माधिकारी गिजरे घराण्याचे जे कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत ( म. रा.इतिहासाचीं साधनें खंड २१ ) व अद्याप कित्येक प्रसिद्ध व्हावयाचे आहेत त्यांत ब्राह्मण सभेकडे निर्णयाकरितां आलेले निवाडे आढळतात. ब्राह्मण सभेंत अमुक इतके सभासद असले पाहिजेत असा निर्बंध नव्हता. अमुक एका विशिष्ट प्रकारच्या व्यवहाराचा निर्णय करण्याचा अधिकार ब्राह्मण सभेस होता, अशा प्रकारचा निर्बंध अस्तित्वांत असल्याचें दिसत नाहीं.

ब्राह्मणसभेखेरीज मोठमोठ्या शहराच्या व्यापारी पेठेंतील व्यापाऱ्यांपैकीं दोघा इसमांत वाद उपस्थित झाल्यास त्या वादाचा निवाडा त्या पेठांतील व्यापाऱ्यांच्या सभा करीत असाव्या, असें त्या काळच्या वर दर्शविलेल्या व्यवहारनिर्णयपद्धतीचें आतां पावेतों जें आह्मीं वर्णन केलें आहे त्यावरून अनुमान करण्यास हरकत नाहीं. याज्ञवल्क्यस्मृतींत श्रेणी सभेचें " नाना जाती- च्या किंवा एका च जातीच्या एका च कर्मावर निर्वाह करणाऱ्या

लोकांचा संघ. जसें तांबोळी, तेली, चांभार इत्यादि " असें वर्णन केलें आहे. या वर्णनावरून याज्ञवल्क्यस्मृतिकाळीं धंदे करणाऱ्या लोकांच्या सभा, तो धंदा करणाऱ्या दोन व्यक्तींमध्यें वाद उपस्थित झाल्यास त्या वादाचा निकाल करीत असत असें सिद्ध होतें. बृहस्पतिस्मृतिमध्यें व्यवहार-निर्णय करणाऱ्या निरनिराळ्या संस्थांचें जें वर्णन दिलेलें आहे त्यांत शेतकरी, सुतार, लोहार इत्यादि कारागीर, चित्रकार, कर्जाऊ पैसे देणारे, समायिक भांडलावर धंदा करणारे, विशिष्ट धर्मपंथाचीं चिन्हें धारण करणारे आणि चोर या सर्वांनीं त्यांच्यामध्यें उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय त्यांच्या धंद्याच्या नियमास अनुसरून करावा असें झटलें आहे. या बृहस्पति वचनास अनुसरून पूर्वकाळीं श्रेणी सभा व्यवहारनिर्णय करीत असत. या च पुर्वापार पद्धतीस अनुसरून शिवकालीं व्यापाऱ्यांत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निकाल मोठमोठ्या व्यापारी पेठांतील व्यापारी सभा करीत असल्या पाहिजेत असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

शिवकालीं व्यवहारनिर्णय करणाऱ्या निरनिराळ्या संस्था कोणत्या प्रकारच्या होत्या, त्यांची रचना कशा प्रकारची होती आणि व्यवहारनिर्णयाच्या बाबतींत त्यांचे अधिकार कोणत्या स्वरूपाचे होते याचें दिग्दर्शन केल्यावर त्या सभापुढें येणाऱ्या व्यवहारांचा निर्णय या संस्था कोणत्या पद्धतीनें करीत असत याचें स्थूलभूतः दिग्दर्शन करण्याकडे आतां आह्मीं वळतों. या सर्व सभांची व्यवहारनिर्णय करण्याची सर्वसाधारण पद्धति एकाच स्वरुपाची होती. प्रसिद्ध झालेल्या व्यवहार विषयक लेखांच्या आधारें या पद्धतीचें वर्णन पुढील प्रमाणें थोडक्यांत करितां येईल. गोत; देशक, ब्राह्मण इत्यादि सभांकडे फिर्याद निर्णयाकरितां आली ह्मणजे अग्रवादी ( Plff ) आणि पाश्चिम वादी ( Deft ) या उभयतांना सदर सभा अगर पंचाईत जो निवाडा करील तो मान्य करण्यास ते कबूल आहेत किंवा नाहींत या बद्दलचा खुलासा विचारण्यांत येत असे. पंचाइतीचा निकाल मान्य करण्याचें उभयतां वादी-प्रतीवादींनीं केल्यावर त्यांच्याकडून तकरीरा लिहून घेण्यांत येत असत. या तकरीरामध्यें अग्रवादी व पाश्चिम वादी, उत्पन्न झालेल्या वादीचें स्वरूप नमूद करीत असत. या प्रमाणें तकरीरा दिल्यावर जरूर वाटल्यास अग्रवादी कडून पुरवणी तकरीर लिहून घेण्याचा प्रघात होता. या प्रमाणें पक्षकारांकडून तकरीरा लिहून घेतल्यावर वादग्रस्त मुद्यासंबंधीं कागदपत्र अग्रवादी व पाश्चिमवादी यांच्यापाशीं कोणकोणते आहेत, याचा खुलासा त्यांच्याकडून सभासद करून घेत असत. याप्रमाणें कागदपत्रांचा खुलासा घेतल्यावर

अग्रवादी व पश्चिमवादी यांच्याकडून पंचाईत मुखें जो निवाडा होईल तेणें प्रमाणें अग्रवादी अगर पश्चिमवादी यास वर्तावयास लावूं असा जामीन उभयतांकडून घेण्यांत येत असे. (म. इ. सा. खंड २१ पान १५६). या शिवाय ज्या मिळकतीबद्दल वाद असेल त्या संबंधाचे कागदपत्र उभयतां पक्षकारांच्या ताब्यांत काय काय आहेत याबद्दल पक्षकारांकडून कतबे लिहून घेण्यांत येत असत. (म. इ. साधनें खंड २१ पान १५५). कागदपत्र हजर करून ते खरे करून देण्याविषयीं कतबे घेतल्यावर उभयतां पक्षकार तर्फे ज्या इसमांची साक्ष घ्यावयाची असेल, त्यांचा खुलासा करून घेऊन साक्षीदारांच्या साक्षी प्रतिज्ञेवर घेण्यांत येत असत. याप्रमाणें कागदपत्र व साक्षीदारांच्या जबान्या यास अनुसरून सभेकडे निर्णयाकरितां सोपविण्यांत आलेल्या वादाचा निकाल करण्यात येत असे. प्रसंगोपात सर्व पुराव्याचा विचार करून पंचांनीं वादग्रस्त प्रश्नासंबंधीं आपलें मत ठरविल्यावर उभयतां पक्षकारांस सभेकडून पंचाईत जो निवाडा करावा त्यास पक्षकार राजी आहेत किंवा नाहींत, पक्षकार पंचायतीच्या निवाड्यास राजी नसल्यास उभयतां पक्षकारास पसंत असलेल्या दुसऱ्या गावच्या सभेकडे निवाड्याचें काम सोपावण्यांत येईल, असें कळविण्यांत येत असे. याप्रमाणें सभेनें पक्षकारांस कळविल्यावर पंचांनीं केलेल्या निवाड्यास पक्षकार राजी असल्याचें त्यांनीं कळविल्यास त्यांच्याकडून राजीनामे लिहून घेण्यांत येत असत [म इ. सा खंड २१ पान १५५]. कोणत्या हि व्यवहाराच्या निर्णयाचें काम गोत इत्यादि सभेपुढें चालू असता अग्रवादी अगर पश्चिमवादी यांनीं दिव्य करून त्यांचें ह्मणणें शाबीत करण्याची मागणी केल्यास व ती मागणी मान्य करून दिव्य करण्याचें ठरल्यास दिव्याबद्दलचा लेख करण्यांत येत असे. त्याचप्रमाणें दिव्य करण्याच्या बाबतींत दिव्य करणाराचा लेख व त्यास जामीन राहिलेल्या जामीनदाराचा लेख घेण्यांत येत असे. [शिवचरित्र साहित्य पान ५५-१६, ले. ३४-३५ व ३६]. येथपावेतों दर्शविलेल्या पद्धतीप्रमाणें सभेनें व्यवहाराचा निर्णय केल्यानंतर तो निर्णय एका कागदावर लिहिण्यांत येत असे. व्यवहाराचा निर्णय ज्या सभेनें केला असेल त्या सभेंत हजर असणाऱ्या सभासदांच्या सह्या अगर त्यांना लिहितां येत नसल्यास त्यांच्या निशाण्या या लेखावर सुरवातीस करण्यांत येत. नंतर व्यवहारासंबंधीं दोन्ही पक्षकारांचें ह्मणणें, उभयतां पक्षकारातर्फे पुढें आलेला लेखी व तोंडीं पुरावा या संबंधींची चर्चा नमूद करून शेवटीं वादग्रस्त प्रश्नाविषयीं सभेचा निवाडा नमूद करण्यांत येत असे. गोतसभेनें निवाडा केला असल्यास त्या निवाड्यास गोत निवाडा, थळपत्र, गोत महजर व देशक सभेनें निवाडा केला असल्यास देशक महजर या संज्ञा देण्याचा परिपाठ होता,

व्यवहारनिर्णय करणाऱ्या या सभांखेरीज छत्रपति शिवाजी महाराजांनीं निर्माण केलेल्या अष्टप्रधानांपैकीं न्यायाधिश हा व्यवहारनिर्णय करणारा अधिकारी असे. मुख्य राजधानीच्या ठिकाणीं न्यायाधिशाचें वास्तव्य असे; व राज्यांतील कोठलाहि वाद निर्णय करितांना त्यास त्यांचा निर्णय न्यायाधिश करीत असे.

मुख्य राजधानीच्या ठिकाणाखेरीज इतरत्र व्यवहारनिर्णय करण्याकरितां स्वतंत्र अधिकाऱ्यांच्या नेमणुका करण्यांत येत असत किंवा नाहीं याविषयीं निश्चितपणें मत प्रदर्शित करण्या इतका पुरावा शिवकालीन लेखांत अजून उपलब्ध झाला नाहीं. गोतसभा, देशकसभा, ब्राह्मणसभा इत्यादि व्यवहारनिर्णय करणाऱ्या निरनिराळ्या संस्था प्रत्येक गांवीं व प्रत्येक परगण्याच्या ठिकाणीं असल्याकारणानें व्यवहारनिर्णयाकरितां मुख्य राजधानीच्या ठिकाणीं राहाणाऱ्या न्यायाधीशाखेरीज इतरत्र व्यवहारनिर्णयार्थ स्वतंत्र अधिकाऱ्यांच्या नेमणुकी करण्यांत येत नसाव्या असें दिसतें.

व्यवहारस्थानांचे एकंदर अठरा प्रकार असल्याचें मागें नमूद केलें आहे. या व्यवहारस्थानांत वाक्पारुष, दंडपारुष इत्यादि व्यवहारस्थानें [ ज्यास हल्लीं फौजदारी ही संज्ञा आहे. ] नमूद केलेलीं आढळतात. गोत, देशक, ब्राह्मण इत्यादि सभांनीं व्यवहारनिर्णय केल्या संबंधाचे शिवकालीन जे लेख प्रसिद्ध झाले आहेत त्या लेखांत वाक्पारुष, दंडपारुष इत्यादि व्यवहाराचा निर्णय अशा संस्थांनीं केल्याचीं उदाहरणें क्वचित् आढळतात.

आतां शिवकालीन व्यवहारनिर्णय पद्धतीसंबंधीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या एका विशेष बाबीचें प्रस्तुत स्थळीं दिग्दर्शन करणें जरूर आहे. व्यवहारनिर्णय विषयक जे शिवकालीन लेख प्रसिद्ध झाले आहेत त्या लेखांवरून गोतसभा, देशकसभा, ब्राह्मणसभा इत्यादि व्यवहारनिर्णय करणाऱ्या संस्थाकडे अग्रवादी अगर पश्चिम-वादी यांपैकीं कोणीं त्याच्या तक्रारीच्या समर्थनार्थ दिव्य करण्याचें मागणें केल्यास त्याजला दिव्य करण्याची परवानगी सरसहा देण्यांत येत असल्याचें दिसतें. याज्ञवल्क्य स्मृतींतील मागें नमूद केलेल्या वचनानुसार दिव्याचा आश्रय क्वचित् प्रसंगीं पुराव्याच्या अभावीं करावयाचा असतो. पण हा नियम बाजूस सारून सरसहा दिव्य करण्याचा प्रघात त्याकालीं सुरू असल्याचें दिसतें.

याज्ञवल्क्य स्मृतींत तुला, अग्नि, जळ, आणि कोश असे दिव्याचे पांच प्रकार सांगितले आहेत. या प्रकारांपैकीं सर्व प्रकार शिवकालीं अस्तित्वांत असल्याचें दिसत नाहीं. रवा काढणें हा दिव्याचा प्रकार त्या काळीं सर्व साधारण अस्तित्वांत असल्याचें दिसतें. या दिव्याच्या प्रकाराची व शिवकालीन व्यवहारनिर्णय पद्धतीची कल्पना व्हावी एतदर्थ खराडे व काळभोर यांच्या

मधील पाटिलकीच्या व्यवहाराचा निर्णय छत्रपती शिवाजी महाराज ज्या एका सभेचे सभासद होते अशा सभेनें दिलेला निवाडा × देऊन हा लेख आम्ही समाप्त करितों.

श्री मार्तंड भैरव.

प्रतिपच्चंद्र

लेखेव वर्धिष्णु र्वि

श्ववंदिता ॥ शाहसूनोः

शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते.

स्वस्ति श्री नृप शालवाहन शके १५९७ वर्षे राक्षस नाम संवछरे माघ मासे बहूल पक्षे भोमवारे त्रीयोदशी तिथौ तदिने महजर ब तेरीखछ २६ माहे जिलकाद बी हुजूर हजीर मज्यालसी स्मस्थान श्री देव मोकाम मौजे पाली पा कऱ्हाड

राजमुद्रा

हुजरती

हरजी राजे बीन परसोजी राजे माहाडिक

मोरो त्रिमल पेशवे

वार्धिष्णु

वामन ++++

वंशोद्भवोविभु +

माहाडी ++

हरमुद्रा विराजते

श्री

शिवचरणी

तत्पर त्र्यंबक

सुत मोरेश्वर

रघुनाथ नारायेण

नीरजी राउजी

नागो नीलकंठ मजमुदार

दत्ताजी त्रिमल वाकेनीस

शामजी नाईक पुंडे

नागोजी गुजर

आनदराऊ

श्री शिवसेना

धिपमुद्रेज

यति सुभद्रा

प्रताप रायस्य

खंडोजी बाघ

अस्पष्ट

बालबोध

हादजी ककडे

सताजी जगथाप

कृष्णाजी नाइक बंकी

जैतजी काटकर

सोमाजी नाईक बंकी

---

× टीपः—श्री सांप्रदायिक विविध विषय तृतीय खंड पान २० वर हा निवाडा छापला आहे. मज्यासीतील हजर असलेल्या सर्व सभासदांचीं नांवें छापलीं नाहींत. स्थलाच्या अभावीं पन्नास पाउणशें नांवें गाळलीं आहेत.

सुरा सीत सबैन व अलफ कारणे जाहला महजर ऐसा जे खंडोजी बिन मालोजी खराडे व कानोजी खराडे व मलजी खराडे व नरसोजी खराडे अग्रवादी व नागोजी बिन बाबाजी पटेल कालभार व मलारजी बिन विजाजी पटेल कालभार व विजाजी बिन संबाजी गोरा पटेल व दावलजी बिन बापाजी पटेल कालभार व मलारजी बिन सूर्याजी कालभार पटेल व चौगुला मौजे पाली पश्चमवादी या हरदु वादी यामधे मौजे मा चे पटलगीचे गगगश लागला या बदल हरदुवादीये माहराज साहेबापसी फिर्यादी जाहले माहराज साहिबानी स्वारी फर्माउन मौजे मा श्री देव याचे देउली बैसोन हकजवार देसमुख देस कुळकर्णी व गावगाना मोकदम आणविले धर्मसभा करून हरदु वादीयाची मुनसीफी मनास आणीता खंडोजी खराडे व कानोजी खराडे व मलजी खराडे व नरसोजी खराडे अग्रवादी केली तकरीर येसी जे मौजे माची पटलगी अपले वडिलांची अहे अपले वडिल कानोजी बिन कह्याजी व कह्याजी बिन बालोजी खराडे खात होते त्या उपरी अपले वडील चाकरीया करात होते पटेलगीस मुतालकि पोल ठेवीला होता तो मेला त्या उपरी गोन्हे व कालभार पाटीलकीस जडले आहेती हाली अपण अपली पटेलगी ह्मणोन उभा राहिलो अहो या उपरी साहेब सदर व माहाप्रश्नीक मिलोन निवाडा धर्मता करून दिले पाहिजे ह्मणोन तकरीर केली या उपरी नागोजी बिन बाबजी पटल व मलारजी बिन विजोजी पटेल व विजोजी बिन संबाजी पटेल गोरा व दावलजी बिन बापाजी पटेल व मलारजी बिन सूर्याजी पटेल व चोगला कालभार पश्चमवादी केली तकरीर येसी जे मौजे माची पटेलगी अपले पिढी चालिली अहे अपण हाली खात असो या उपरी हाली खराडे उभे राहिले तरी साहेब सदर समस्त गोत पुण्याचे मायेबाप अहा मिरासीदारांचे लेकरूं जे तुह्मास व हकजवारेस होये येसे द्रष्टिस पडले ते हाती धरणे गैर मिरासी झोंड पणें गली पडत असेल तो दूर करणे धर्मता निवाडा केला पाहिजे अपण तरी अपले पाढरीस कुसुर येकिला नाहीं अगर अमची नवी वृत्ति नव्हे आमची वृत्ती पूर्वापार अहे खराडे लायानी झोंडपणे उभे राहिले अहेती धर्मता केले पाहिजे ह्मणउनु तकरार केली बाजद सदर साहेबी व गोतानें खंडोजी खराडे व कानोजी खराडे व मलजी खराडे व नरसोजी खराडे यास वाजी पुसी केली जे तुह्मी अपली मिरासी पटेलगी ह्मणतात तरी ये

बाबेची गोही साक्ष काही असेल हकजवार मिळाली अहे तुमचे वडील कोणा ए दखल असतील तरी गोही साक्ष दाखवणे ह्मणउनी फर्माविता बोली जे असले वडील बहुत दिवस चाकरी करावयास गेले ते तिकडेच राहिले इकडे अमची हमशाइ कोण गोही देतील बलुते गावींचे अहेत त्यास साहेबी गोही विचारिली पाहिजे ते अपले सत्य स्मरोन सांगतील ते खरे त्यावरून मौजे माचे बलुत यास बोलाउन वाजी पुसी करीता बलुते त्यानी गोहा दिलीया जे

बाजी मुसलमान सुतार केली तकरीर येसी जे मौजे माचे पटेलगी काल भाराची ऐसे आपले वडील सांगत अले हाली हि तेच खात अहेतां ख-राडे अपण योफिले नाही हे कां गला पडताती ते न कले ह्मणउनु तकरीर केली.

गुरवानी, नागोजी जनाजी केली तकरीर येसी जे पहिले काही ठाऊके नाही गोन्हे व कालभार खात अहेतां हे ठाऊके अहे अपले वडील दिवाणे मारिले येक बाईको पोटेसी होती ते पलोन वाईस गली होती तीची संतती आपण मागील काही अपणास दाखल नाही ह्मणोन तकरीर केली.

वडजा परीट केली तकरार येसी जे सुतारे तकरीर केली ते खरीच असे ह्मणउनु तकरार केला.

मलजी चांभार केली तकरीर येसी जे अपले बाप अजे पणजपासून अईकोले की कालभार व गोन्हे पटेलगी खात अहता हे खर खराडे अपले वडलांनी आकले नाही ह्मणउन तकरीर केली

सोना वा धारा माहर केली तकरीर येसी जे अधी खराडे खात होते त्याचे भक्षीम देव अला त्या वरी पोल मुतालिक होता ते निपुत्रिक मरोन गला त्यावरी गोरे त्यावरी कालभार येसे वडील सांगत अले ह्मणोन तकरीर केली.

ऐणे प्रमाणे बलुते यानी गोहींचे तकरीरा केलिया त्यावरी सदर साहेबी व गोताने बलुतेदाचे तकरीरा मनास आणिता माहर खेरीज करून बरकड बलुत यानी कालभार व गोन्हे पटेलगी खातात या खरीज दुसरा कोणी अकीले नाही ह्मणोन तकरीरा केली येक माहाराने खराडे अधी त्याचे मुतालिक पोल मेला मग गोरे व कालभार जडले ह्मणोन बोलती तेव्हां खरा कोण बोलतो व खोटा कोण बोलतो हे न कले येसे जाहले तेव्हां गोतने बलुते यास फर्माविले जे खराडे याचे व कालभाराचे निवाडे याचे देठा खराडे जाहलेल्या माहर बलुता खरा बारकड बलुते खोटे कालभार खरे जाहलेया बरकड बलुते खरे माहर बलुता खोटा ह्मणउन बोलिलेवरी सदर साहेबी व गोताने खंडोजी खराडे व कानोजी खराडे व मलजी खराडे व नरसोजी

खराडे यास पुसिले जे तुमचे गोहं हकजगार हमराई कोणी नाहींत अगर तुह्मा बलुत याचे गोही प राजी जहलेस ते बलु यांनीं कालभर गोरे पटेल ऐकने व हली खतात खराडे आपले वडली सांगितले नाहीं अगर एकले नाहीं म्हणताती माइर येक बोलतो त्याची गोही खरी काश्या वरून म्हणावी अणी अवघे बलुते खोटे कैसे म्हणावे तुमची गाहे नाही साक्ष नाही अता तुह्मी काश्यावरून ओबता हे न केले एसयास काये ह्मणतात त्यास खराडे बोलिल जे बरे अपली गोही कोणी देणार नाहीं तरी अपण दिव्य देउनु दिव्य मुखे खरे जाहालो तरी पटलगी खाऊन खोटे जहलो तरी आले मार्गें जाउनु ह्मणउनु बोलिले या उपरी नागोजी पटेल व मलारजी पटेल व विसोजी गारा पटेल व दावलजी पटेल व मलारजी बिन सूर्याजी चैगुला व पटेल कालभार मौजे म॥ पश्चनवादी यास पुसिले जे खराडे यांची गोही साक्ष मनास आणिता गोही रुजू पडत नहीं अगर हक जवारेस तरी दखल नाही अपण दिव्य घउनु दिव्यी खरे उतरलो तरी पटेलगी खाऊन खोटे जाहलो तरी अपले आले वाटे जाऊन ह्मणताती तुह्म हे गोष्टीस राजी आहां ह्मणौन पुसता बोलिले जे आपण खरे आपली वृत्ती खरी अहे खराडे झोंडपणे गला पडताती तरी तुह्मी गोत अहां गोतमुखे निवाडा कराल त्यास राजी तुह्मी दिव्य घाल त्यास राजी अन्नो देवद्वरी अग्निमुखे खर होऊन तरी हाती धरणे जो खोटा होईल त्यास बाहीर घालणें ह्मणउनु बोलिले बाजद सदर साहेबा व समस्त गोतने खराडे कुप्रवादी अहेती खराडे त्यास दिव्य द्यावे यैसे नमिलेवरी हरदू वादी याचे राजीनामे लेहून घेउन दिव्याचे तह दिला छ २३ जिलकादी अशेंन्ने रोजी खंडोजी खराडे याचे हातांची नखे काढून हातास साबण निबुवे लाऊन हात धुनले हातास खलीती करून राखिले व कालभार व गोरे यास हि राखले छ २४ जिलकादी येकशंबेचे रोजी पहिले ताीख्रा चे

देउली देवा सन्मुख रवा मांडिला तेल ४४॥ व लोणी वजन ४४॥ देऊन तेल व लोणी कडविल मोईने प्रमाणें कढतांच खंडोजी खराडे यास व कालभाराम गोरे यास ारलींचे स्नाने करून आणविले खंडोजी याने श्रीं देव पाठीसी घलून श्री सूर्यनारायेण सन्मुख करून सात मडले कढिली होती ती उल्हून सातवे मंडली उभे राहिला पुढे रवे पात्र मांडले खडोजी खराडे याचे डोईस पत्र बाधले तेल व लोणी चरवी मधील कडविले त्यामध्ये खराडे याचे नावे पान घातले ते कोमाइले कोलभाराचे नावे पान घातले ते साबीत निघाले वरी चरवी मधील तेल व तूप खेपात्रांत ओतीले त्यामधे रवा टाकिला सवेच खंडोजी खराडे याने रवा काडेले कालभर व गोरे यानी साउली केली खंडोजी याचे हातास खलिती करून मागती खंडोजी खराडे व कालभार व गोरे येक

जागा राखिले त्यावरी छ २६ जालकादी सीसंबेचे रोजी पहिले तासी श्री चे देउली धर्मसभा करून माहाराज राजे साहेब व कारकून व समस्त माहप्रश्नक हकजवार गोत भेलउनु खंडोजी खराडे व कालभार व गोरे राखिले होते ते अणविले व कानोजी खरडे व मलजी खराडे व नरसोजी खराडे हेही असे समस्ता देखता खंडोजी खराडे याचा हातीचा खलिती काढिली. तो हातीचे बोटास पांच फोड असे फेडून पाहाता पाणी निघाले ते तमाम माहप्रश्नक माहाराज साहेब अदीकरून समस्तानी पाहिले वरी सदर साहेबा गोतास व खरडे यास पुसीले जे हातास फोड असे पाणी निघाले या वरी काये ह्मणतात ह्मणौन पुसिले तेव्हा गोताने सांगितले जे खराडे दिव्यास लागल खोटे जाहले अता पटेलगी कालभाराची व गोरे याची खरी ते दिव्य मुखे हि खरे जाहले साहेबी धर्म रवा दिला आहे खोटे यास गुनेगारी घेउ नये अगर खरे यास सरिणी घेउ नये हरदु जणास ही माफ करून कलभार व गोरे खरे जाहले याची पटेलगी चौगलकी त्याचे दुमाले केली पाहिजे व खराडे खोटे जाहले त्यास ही गुन्हेगारी माफ करून रजा दिली पाहिजे ह्मणौउन गोताने अर्ज केला माहराज साहेबा गुनेगारी खराडेस माफ केली व सीरणी कालभारास व गोरे यास माफ केली यावरी खराडे रवा लागले ऐसे ऐकतांच माहाराने खोटी गही दिली होती तो पलोन गेला यावरून माहाराने गोही खोटी दिली ऐसे तहकीक कले आले या उपेरी माहाराज राजेश्री साहेबी व समस्त गोताने कालभाराची पटेलगी व चौगलकी व गोरे याचे पटेलगा दुवाले केले असे सालाबाद कालभार पटेलगी व चौकलगी जैसे खाताती तैसे लेकराचे लेकरी खाऊन असणे गोरीयाचे तकसीम सालबाद वडिलापसून खात आले ते खऊन असणे खराडियास मौजे मजकूर चे पटेलगीस अर्थ अर्थ समध नाही खराडे खोटे जाहाले त्यासी निसबत नाही पुढे जो कोणी या निवाडीयास हिला हरकत करील तो दिवाणचे गुन्हेगार व गोताचा अन्याई हा जाहाला महजर सही मोर्तब सुद.

मर्या
देयं विरा
जते

हा निवाडा वाचला असता अग्रवादी व पश्चिमवादी यांचा वादग्रस्थ प्रश्नाबद्दल थोडा फार पुरावा होता, परंतु सभेस तो पुरावा समाधान कारक न वाटल्यामुळे खराडे यास दिव्य करण्याची परवानगी सभेने दिली व दिव्यांत तो खोटा ठरल्यामुळे वादाचा निकाल त्याचे विरुद्ध केला.

शिवकालीन धर्म व व्यवहारनिर्णय पद्धती या विषयींचें विवेचन उपलब्ध असलेल्या साधनांच्या आधारें आह्मीं थोडक्यांत केलें आहे. इंग्रजी राज्याची महाराष्ट्रांत स्थापना झाल्यापासून आपल्या एतद्देशीय व्यहारनिर्णय पद्धतीचें-ज्या पद्धतीच मुसलमान राज्यकर्त्यांनीं उच्चाटन केलें नव्हतें-इंग्रजांनीं उच्चाटन करून प्रस्तुत काळीं अस्तित्वांत असलेलीं त्यांच्या धर्तीची व त्यांना परिचित असलेली व्यवहारनिर्णय पद्धति त्यांनीं स्थापित केली. स्वराज्याच्या कल्पनेंत अंतर्भूत होणाऱ्या अनेक बाबींपैकीं प्रजेपैकीं दोन व्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या वादाचा अगर व्यहाराचा निर्णय त्यांच्या पैकींच चार लोकांच्या विद्यमानें करून घ्यावयाचा, ही एक अत्यंत महत्वाची बाब आहे. ही महत्वाची बाब इंग्रज राज्यकर्त्यांनीं लोकांच्या हातची काढून घेऊन त्यांनीं या कार्याकरितां निर्माण केलेल्या त्यांच्या अंकीत असणाऱ्या एका मोठ्या अधिकारी वर्गाच्या तीं हवालीं केली.

आतां पावेतों वर्णिलेल्या स्वरूपाची व्यवहार निर्णय पद्धती आपल्या या देशांत अस्तित्वात होती याची जाणीव हि जेथें आपल्यांतून नष्ट झाली तेथें या पद्धतीस अनुसरून आपल्यांतील वादांचे निकाल करण्याची आकांक्षा आपल्यांत उत्पन्न होणें व या पद्धतीस अनुसरून वादांचे निकाल करण्याची पात्रता आपल्या लोकांत दृष्टिस पडणें या गोष्टी स्वप्नांत देखील दृष्टोत्पत्तीस पडणें दुरापास्त आहे व या मुळेंच विद्यमान व्यवहार निर्णयपद्धती झाणून पाडण्याचे माहात्माचे प्रयत्न निष्फळ ठरतात.

# शिवाजीमहाराजांची कौटुंबिक माहिती

( लेखक—शिवराम काशिनाथ ओक, धार. )

शिवाजीमहाराजांचें चरित्र सांगोपांग होण्यास चरित्राच्या राजकीय अंगाप्रमाणेंच सांसारिक अथवा कौटुंबिक अंगाचीहि आवश्यक माहिती त्यांत येणें इष्ट असल्यानें प्रस्तुत निबंधांत " महाराजांच्या स्त्रिया व परिवार " यांविषयीं मिळाली तेवढी माहिती ग्रथित करण्याचा, साधकबाधक प्रमाणांनीं ती निश्चित करण्याचा व महाराजांच्या निर्मल चारित्र्यावर थोडया वर्षांपूर्वी एका प्रसिद्ध इतिहासकारानें व त्याचे अनुयायांनीं जे आक्षेप उपस्थित केले, त्यांचें खंडन करण्याचा यथामति प्रयत्न करण्याचें योजिलें आहे.

हल्लींच्या उपलब्ध ऐतिहासिक वाङ्मयांत छत्रपती शिवाजीमहाराज यांचीं किती लग्नें कोणकोणत्या घराण्यांतील मुलींशीं, कोणकोणत्या सालांत झालीं व त्यांच्या सर्व राण्यांचीं नांवें काय यासंबंधाची पूर्ण व निश्चित माहिती एकत्र कोठें दिलेली आढळत नाहीं. निरनिराळ्या बखरी वगैरेंतून जी माहिती आलेली आहे, ती ज्या लेखकास जितकी व जशी उपलब्ध झाली, तशीच त्यानें विशेष चौकशी न करितां दिली असल्यानें ती अपुरी आहे. या बखरींतून स्त्रियांची संख्या तर निरनिराळी दिलीच आहे, पण कांहीं राण्यांच्या नांवांत व कांहींच्या माहेरच्या घराण्यांच्या नांवांतहि फरक झालेला आहे; असें उपलब्ध बखरी वगैरेंची तुलना केली असतां दिसून येतें.

ग्रँट डफ यास छत्रपतींच्या तीन स्त्रियांचीं नांवें माहीत होतीं. शिवचरित्रकर्ते मल्हार रामराव चिटणीस यांस तीन स्त्रियाच ठाऊक होत्या. रामदासस्वामींचे एके बखरींत व चरित्रांत छत्रपतींच्या चार स्त्रियांचीं नांवें दिलीं आहेत ( राजवाडे, संकीर्ण लेख ). दुसऱ्या एका बखरींत पांच स्त्रिया असल्याचें म्हटलें आहे ( चांदोरकर संग्रह, अप्रकाशित). जेधे शकावलींत सहा स्त्रियांचे उल्लेख आले आहेत. सभासदविरचित शिवछत्रपतींचे चरित्रांत संभाजीचे मातेशिवाय छत्रपतींनीं सहा स्त्रिया केल्या होत्या असें म्हटलें आहे. भिडेकृत अष्टप्रधानांचा इतिहास व किंकेड व पारसनीस यांच्या मराठ्यांचे इतिहासांत छत्रपतींच्या सात स्त्रियांचीं नांवें दिलीं आहेत. कै. राजवाडे यांनीं त्यांना तंजावर शहरीं एका गृहस्थाचे दप्तरांत एक टिपण मिळालें त्यावरून आपल्या संकीर्ण लेखसंग्रहांत छत्रपति शिवाजीमहाराजांना आठ स्त्रिया होत्या असें दाखविलें आहे. व तंजावर येथील बृहदीश्वर शिलालेखांतहि याचप्रमाणें

छत्रपतींच्या आठ राण्यांची व त्यांच्या माहेरच्या घराण्यांची आणि संतति वगैरेंची नोंद दिली आहे, पण त्यांत सर्व राण्यांचीं नांवें दिलेलीं नाहींत. तेव्हां आपणांस अगोदर छत्रपतींच्या राण्यांची संख्या व त्यांचीं नांवें निश्चित केलीं पाहिजेत.

शेडगांवकर भोसले यांचेकडील वंशावळीवरून रा. ब. पारसनीस यांनीं आपल्या मराठ्यांचे इतिहासांत छत्रपती शिवाजीमहाराजांस सात राण्या होत्या असें सांगून त्यांचीं नांवें ( १ ) सईबाई ( २ ) सोयराबाई ( ३ ) पुतळाबाई ( ४ ) सगुणाबाई ( ५ ) सकवारबाई ( ६ ) लक्ष्मीबाई व ( ७ ) गुणवंताबाई अशीं दिलीं आहेत. हींच नांवें रा. भिडेकृत " छत्रपतींचे वंशाचे व अष्टप्रधानांचे इतिहासांत " आहेत.

राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या टिपणांत व बृहदीश्वर शिलालेखांत छत्रपती शिवाजीमहाराजांच्या राण्यांचीं पुढील प्रमाणें नांवें दिलीं आहेत. " पुणें प्रांतीं सकल दिग्विजय करून राहिलेले शिवाजीराजे यांस अष्ट नायिका त्यांचीं नांवें:—

१. सौ. सईबाई, निंबाळकरांची. २. काशीबाई, जाधवरावांची. ३. सकवारबाई, गायकावाडांची. ४. पुतळाबाई, पालकरांची. ५. सगुणाबाई, शिरक्यांची. ६. सोयराबाई, मोहित्यांची. ७. मालड्याची लेक ( टिपणांत " फर्जंदाची लेकी " असें आहे. ) ८विचाऱ्यांची लेक ( टिपणांत ' लेकी ' असें आहे. )

यांत महाराजांच्या आठ राण्यांपैकीं फक्त साहींचीं नांवें, त्यांच्या माहेरघराण्यांचे नांवांसह दिलीं असून, दोघींविषयीं त्या कोणाच्या मुली एवढेंच सांगितलें आहे. तथापि यांतील सहा नांवांत आरंभीं शेडगांवकर भोसले यांचे वंशवृक्षावरून दिलेल्या सात नांवाहून " काशीबाई " हें एक निराळें नांव आलें आहे व ती जाधवरावांची कन्या असल्याचें सांगितलें आहे. महाराजांच्या या काशीबाई नामक राणीचा उल्लेख अन्यत्रहि आढळत असून ( राज्याभिषेक कल्पतरु, पृ. ३१ ) जाधवरावांचे कन्येशीं महाराजांचा विवाह झाल्याचा उल्लेख जेधे शकावलींत आहे. तेव्हां शेडगांवकर भोसल्यांचे वंशवृक्षांत दिलेल्या सात राण्यांशिवाय 'काशीबाई' ही महाराजांची आठवी राणी होती याविषयीं शंका राहात नाहीं. तसेंच बृहदीश्वर शिलालेखांत व राजवाडे यांचे टिपणांत जीं दोन राण्यांचीं नांवें दिलीं नाहींत, तीं नांवें (१) लक्ष्मीबाई व (२) गुणवंताबाई असावींत असें शेडगांवकर भोसल्यांचे वंशवृक्षावरून दृढ अनुमान होतें.

येथपर्यंत झालेल्या विवेचनावरून महाराजांस आठ राण्या होत्या व त्यांचीं नांवें ( १ ) सईबाई ( २ ) सगुणाबाई ( ३ ) सोयराबाई ( ४ ) पुतळाबाई ( ५ ) काशीबाई ( ६ ) सकवारबाई ( ७ ) लक्ष्मीबाई व ( ८ ) गुणवंताबाई अशीं होतीं हें वाचकांचे लक्षांत येईल.

आतां या सर्व राण्यांशीं छत्रपतींचीं लग्नें कोणकोणत्या वर्षीं झालीं व त्या कोणकोणच्या घराण्यांतून आल्या याविषयीं काय निश्चय करतां येतो तें पाहूं. जेधे शकावली व शिवापूरचे दप्तरांतील दोन शकावल्या यांवरून छत्रपतींचीं पांच लग्नें शके १५७८ पूर्वीं झालीं असावींत असें दिसतें. या शकावल्यांत शके १५७८ नंतरच्या लग्नांचे उल्लेख मात्र सालवार मित्यांसुद्धां दिले असून बाकीचे थोडे अप्रत्यक्ष आहेत. जेधे शकावलींतील त्यासंबंधाचा आवश्यक उतारा येणेंप्रमाणें:—

शके १५७८ दुर्मुख सवछर.

१. माघ शुद्ध पक्षीं गायेकवाडाशीं सोयरीक केली. सकवारबाईचें लग्न जाले.

शके १५७९ हेमलंबी संवत्छर.

२. वैशाख शुद्ध पंचमीस जाधवरायासी सोयरीक केली.

३. वैशाख शुद्ध द्वादशीस इंगळियांची सोयरीक केली.

४. ज्येष्ठ शुद्ध द्वादशीस राजश्री शिवाजीराजे यांस संभाजीराजे पुत्र जाले. पुरंदरीं उपजले.

शके १५८१ विकारी संवछर,

५. भाद्रपद वद्य चतुर्दसीस शिवाजीराजे यांची स्त्री सईबाईस देवाज्ञा जाली.

१५९१ सौम्य संवछरे,

६. फाल्गुन शुद्ध १५ रायगडीं राजाराम उपजले.

पुरवणी शके १५९६ आनंद संवछर,

७. ज्येष्ठ शुद्ध ४ घटी ५ अवल सालीं राजश्रींची मुंज जाली. ज्येष्ठ शुद्ध ६ शनिवारीं समंत्रक विवाह केला.

या उताऱ्यांत प्रत्यक्ष लग्नांचे क्रमांक १, २, ३ व ७ असे जे चार उल्लेख आहेत त्यांतील शेवटच्यांत 'ज्येष्ठ शुा ४ स राजश्रींची मुंज झाली व ज्येष्ठ शुा ६ स समंत्रक विवाह केला' असें म्हटलें आहे, पण त्यांत कोणाशीं सोयरीक झाली हें सांगितलें नाहीं. दुसऱ्या शकावल्यांतूनहि हा समंत्रक विवाहाचा उल्लेख असाच मोघम आहे. तेव्हां हा उल्लेख महाराजांच्या नवीन विवाहाचा द्योतक असेल असें वाटत नाहीं. क्षत्रियत्वसिद्धीकरितां गागाभट्टाकडून मौंजीबंधनाचा विधी करविला गेल्यावर पूर्वींच्या असलेल्या राण्यांसंबंधानेंच हा कांहींतरी समंत्रक विधी करविला गेला असावा असें दिसतें. भारत इतिहास सं. मंडळाचे त्रैमासिकांत (वर्ष १० अंक १) नुकताच राज्याभिषेक कल्पतरुनामक एक शिवकालीन संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्यांत महाराजांच्या या विवाहाविषयीं,

गायत्रीमुक्तवान् गागा राज्ञो गुरुमुखेन वै
दोषाक्रांते महुर्तेऽपि भक्तितः श्रीशिवोऽगृहित् ॥
एवं धृतव्रतो राजा योषिद्भिस्ताभिरेव हि ।
विवाहितो नराणां तु पश्यतां परमोत्सवम् ॥

असा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हां जेधे शकावलींतील विवाहविषयक चौथा उल्लेख महाराजांच्या नवीन विवाहाविषयींचा नाहीं हें स्पष्ट होतें. मौंजीबंधनानंतर समंत्रक विधीनें महाराजांनीं एखाद्या नवीन स्त्रीशीं विवाह केला असता तर राज्याभिषेक-समयीं पट्टराज्ञीपदाचा विशिष्ट अधिकार धर्मशास्त्रदृष्ट्या तिलाच मिळाला असता; पण राणी सोयराबाई इलाच राज्याभिषेकसमयीं पट्टराज्ञीपदाचा मान मिळाला. महाराजांचा जो समंत्रक विवाहविधी झाला तो नवीन स्त्रीशीं झाला नसून पूर्वीच्या स्त्रीशींच झाला असला पाहिजे, हेंच सिद्ध होतें. शकावलींतील हा शेवटचा विवाहविषयक उल्लेख वगळला म्हणजे शके १५७८ नंतर महाराजांचे तीन विवाह झाले असून त्यापूर्वी त्यांचे पांच विवाह झाले असले पाहिजेत हें उघड दिसतें.

या शके १५७८ पूर्वीच्या पांच लग्नांपैकीं दोघी राण्या सईबाई व सोयराबाई यांचीं लग्नें जरी शकावलींत स्पष्ट उल्लेखिलेलीं नाहींत, तरी संभाजी व राजाराम यांच्या जन्मांच्या उल्लेखांवरून त्यांच्या मातांचीं लग्नें स्पष्ट अनुमित होतात. शिवापूरकर दप्तरांतील ज्या दोन शकावल्या आहेत, त्यांत हे सर्व उल्लेख आले असून, एकींत पुतळाबाई शिवाजीचे मृत्यूनंतर सती गेल्याचा उल्लेख अधिक आहे. याशिवाय आणखी दोघी राण्यांसंबंधानें शकावलीकारांच्या मतें नमूद करण्यासारख्या विशेष गोष्टी झालेल्या नसल्यानें अर्थात्च त्यांचे उल्लेख वरील शकावल्यांतून येण्याचें कारण नाहीं.

या पांच राण्यांचीं लग्नें कोणकोणत्या सालीं झालीं व त्या कोणकोणच्या घराण्यांतल्या होत्या, हें नक्की सांगण्यास कांहीं अस्सल साधन उपलब्ध नाहीं. बखरकारांनीं त्यांच्या लग्नांविषयीं दिलेली माहिती अपुरी असून तींत नांवांचा तर बराच घोंटाळा झालेला आहे; तेव्हां बखरकारांनीं दिलेल्या माहितीवरून त्यांच्या लग्नांचीं सालें निश्चित करणें कठीण आहे; तथापि एतद्विषयक बखरींतील उल्लेखांवरून त्यांविषयीं आपणखी काय काय अनुमानें बसूं शकतात, हें थोडक्यांत येथें पाहूं.

( १ ) महाराजांचा प्रथम विवाहसमारंभ पुण्यास शके १५६२ विक्रम नाम संवत्सरीं वैशाख शुद्ध ५ ( ता. १७ एप्रील १६४० इ. ) या दिवशीं शहाजीराजे यांच्या आज्ञेप्रमाणें दादोजी कोंडदेवानें केला. ( शिवदिग्विजय पृ. ९८–९९ ).

(२) या पुण्यांतील पहिल्या लग्नानंतर 'उभयतां वधूवरें पहावीं म्हणोन त्यांस शहाजी राजे यांनीं विजापुरीं आणविलीं. तें वर्तमान पादशहापावेतों पोंचून त्यांनीं 'तुम्हीं आम्हीं नसतां लग्न केलें तें लग्न काय, खेळ जाला! दुसरें. लग्न येथें करावयाचें, असा इष्ट धरला. तेव्हां बादशहाच्या आग्रहास्तव शहाजी राजे यांनीं महाराजांचें दुसरें लग्न विजापुरास (इ. स १६४१ च्या बहुधा एप्रिलांत) केलें (शिवदिग्विजय पृ. १११).

(३) शके १५७२ मध्यें रायगडीं महाराजांनीं स्मरण करतांच समर्थ आले, त्या प्रसंगीं तेथें सईबाई, सोयराबाई व सगुणाबाई या तीन राण्या होत्या. (रामदासस्वामींचें चरित्र व बखर) यावरून शके १५७२ म्हणजे इ. स. १६५० पूर्वीं महाराजांचा तिसरा विवाह झाला होता, हें स्पष्ट आहे.

(४) शके १५७५ (इ. स. १६५३) मध्यें रायगडीं महाराजांचा विवाह झाल्याची नोंद शेडगांवकर बखरींत पृ. २० वर आहे तो चौथा विवाह होय.

(५) यानंतर शके १५७८ पूर्वीं महाराजांचा आणखी एक विवाह झाला असला पाहिजे.

२—सभासदी बखर व बृहदीश्वर शिलालेख यांचे मतानें सईबाई ही निंबाळकरांची कन्या असून फलटणकर निंबाळकरांचे कैफियतींतहि तसाच उल्लेख आहे. आणि तिचा विवाह हिजरी सन * १०५१ (इ. स. १६४१) या वर्षीं विजापुरास झाला, त्या वेळीं लग्नांत महंमद आदिलशाह बादशाह यांनीं येऊन सन्मान केल्याचें वृत्तहि सदर कैफियतींत नमूद आहे (इ. सं. वर्ष २ रें, अंक ९, प्राचीन मराठे सरदार पृ. २९). तेव्हां सईबाईशीं झालेला विवाह हा महाराजांचा दुसरा विवाह असून तिला ज्येष्ठ पत्नीचा मान कसा मिळाला हें थोडें चिंतनीय आहे. कदाचित् बादशहाचे संमतीनें झालेला हा पहिला विवाह म्हणून ती ज्येष्ठ पत्नी मानली गेली असल्यास नकळे!

१ व ३—प्रथम विवाह पुण्यास झाला तो शिर्के यांच्या कन्येशीं झाला, असें शिवदिग्विजयकाराचें म्हणणें आहे. मल्हार रामरावानेंहि प्रथम विवाह शिर्के यांचे कन्येशीं झाला असेंच म्हटलें आहे व तिचें नांव सईबाई दिलें आहे. सईबाई ज्येष्ठ

---

* या कैफियतींत हिजरी सन चुकीनें दिला गेला आहे; तो मागील संदर्भाप्रमाणें १०५१ असला पाहिजे, हें सहज कोणाचेहि लक्षांत येण्यासारखें आहे.

समजली जात असल्यानें उभय लेखकांनीं प्रथम पत्नीचें नांव तेंच दिलें आहे. परंतु सईबाई ही शिर्क्यांची कन्या नसून ती निंबाळकरांची होती व तिचा विवाह विजापुरास इ. स. १६४१ त झाला. तेव्हां प्रथम पत्नी सईबाई नसून दुसरी कोणी असली पाहिजे हें उघड आहे. बृहदीश्वर शिलालेखाप्रमाणें सगुणाबाई ही शिर्क्यांची असून ग्रँट डफचे मतानें सोयराबाई शिर्क्यांची कन्या होती. तेव्हां या दोघींपैकीं एकीचा–बहुधा सगुणाबाईचा–विवाह प्रथम पुण्यास इ. स. १६४० त झाला असावा व दुसरीचा–सोयराबाईचा–शके १५७२ ( इ. स.१६५० ) पूर्वीं केव्हां तरी झाला असावा. कारण या दोघींचीं नांवें शके १५७२ मधील रामदासस्वामींचे चरित्रांतील प्रसंगांत आलीं आहेत.

४–यानंतर शके १५७५ ( इ. स. १६५३ ) मध्यें रायगडास महाराजांचा जो विवाह मोहित्यांचे कन्येशीं झाला ( शेडगांवकर बखर पृ. २० ). तो अर्थात् चौथी राणी पुतळाबाई इजशीं झाला असला पाहिजे. कारण पुतळाबाई ही मोहित्यांची कन्या होती ( ग्रँट डफ व चिटणिसकृत सप्त प्र. चरित्र ). शेडगांवकर व चित्रगुप्त बखरींत या मोहित्यांचे कन्येचें नांव " सईबाई " असें दिलें आहे. पण, ' सईबाई ' निंबाळकरांची होती हें वर दाखविलेंच आहे. कदाचित् पुतळाबाईचेंहि दुसरें नांव ' सईबाई ' असल्यास नकळे ! धार येथील भिकाजीराजे भोसले भांबोरकर यांचे येथील यादींतहि पुतळाबाईस मोहित्यांची कन्याच म्हटलें आहे.

हा विवाह रायगडास झाला तेव्हां येथें रायगडसंबंधीं एका शंकेचें निरसन केलें पाहिजे. जेधे शकावलींत शके १५७८ मध्यें " वैशाखमासीं शिवाजी राजे यांणीं रायरी घेतली " असें म्हटलें आहे. त्यावरून शके १५७८ पूर्वी रायरी ऊर्फ रायगड छत्रपति शिवाजीमहाराजांचे ताब्यांत नव्हता असें कोणी म्हणतात व त्यामुळें वरील रामदासस्वामींचे बखरींतील शके १५७२ मधील व शेडगांवकर बखरींतील १५७५ मधील प्रसंग तेथें घडणें शक्य नाहींत असें कोणास वाटेल. पण, जेधे शकावलींतील रायरी घेण्याचा हा प्रसंग दुसरे वेळचा आहे. प्रथमतः शिवाजीमहाराजांनीं रायरी सिद्दी याजपासून शके १५६८ (इ. स. १६४६) त घेतली असें मल्हार रामराव यानें आपले बखरींत स्पष्ट म्हटलें असून वरील रामदासस्वामींचें चरित्र व बखर आणि शेडगांवकर बखर यांतील शके १५७२ व १५७५ मधील उल्लेख त्यांशीं जुळणारेच आहेत. यानंतर कदाचित् रायरीगड चंद्रराव मोरे यानें बळकाविला असेल अथवा शके १५७७ त जावळीहून पळून गेल्यावर बचावासाठीं रायरीस येऊन कोठें दडून बसला असेल असें संभवतें. त्यानें अशा रीतीनें रायरीचा आश्रय केला तेव्हां रायरी

डोंगरास वेढा घालून महाराजांनीं मोऱ्यांस काढून दिलें व डोंगर पुनः ताब्यांत घेतला. जेधे शकावलींतील शके १५७८ ( इ. स. १६५६ ) खालीं दिलेला प्रसंग या दुसऱ्या वेळचा आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे वरील रायगडविषयक शंका राहणार नाहीं.* असो.

५—आतां पांचवा विवाह शके १५७८ ( इ. स. १६५६ ) पूर्वीं झाला असला पाहिजे असें वर दाखविलेंच आहे. पण तो खास कधीं, कोणत्या वर्षीं, कोणाच्या कन्येशीं झाला व या पांचव्या राणीचें नांव काय, हें तूर्त साधनांच्या अभावीं स्पष्ट रीतीनें सांगतां येत नाहीं. महाराजांच्या लक्ष्मीबाई व गुणवंताबाई या नांवाच्या दोन राण्या होत्या. त्यांपैकीं एकीचा विवाह या वेळीं झाला असला पाहिजे. या दोघींपैकीं एक विचाऱ्यांची कन्या असून दुसरी इंगळ्यांची होती असें बृहदीश्वर शिलालेख व जेधे शकावली यांवरून दिसतें. परंतु त्यांतील विचाऱ्यांची कोण व इंगळ्यांची कोण हें सांगतां येत नाहीं. पण इंगळ्यांच्या कन्येशीं पुढें शके १५७९ हेमलंबी संवत्सरीं विवाह झाल्याचें म्हटलें आहे. तेव्हां या वेळीं झालेला विवाह विचाऱ्यांच्या कन्येशीं झाला असावा.

६—यापुढील तिघींच्या विवाहांच्या मित्या व त्यांच्या माहेरच्या घराण्यांचीं नांवें जेधे शकावली व शिवापूरकर दप्तरांतील शकावल्या यांत स्पष्टच दिलीं आहेत त्याप्रमाणें महाराजांचा सहावा विवाह गायकवाडांची कन्या सकवारबाई इजशीं शके १५७८च्या माघ शुद्ध पक्षीं ( इ. स. १६५७ च्या जानेवारींत ) झाला.

७—सातवा जाधवरावांची कन्या काशीबाई इजशीं शके १५७९ वैशाख शुद्ध ५ ( ता. ८ एप्रिल १६५७ इ. ) रोजीं झाला.

८—आठवा शके १५७९ वैशाख शुद्ध १२ ( ता. १५ एप्रिल १६५७ इ. ) या दिवशीं इंगळे यांच्या कन्येशीं झाला. बृहदीश्वर शिलालेखांतील, कदाचित् दगड फुटल्यामुळें हें नांव नीट लागलें नसावें असें दिसतें. कारण या शिलालेखाचे प्रतिलिपींत " मालहोची लेक " असें म्हटलें आहे. पण हें नांव मराठ्यांच्या आडनांवांत कोठें आढळत नाहीं. राजवाडे यांच्या टिपणांत याबद्दल फर्जंदाची लेकी असें म्हटलें आहे. परंतु जेधे शकावली व शिवापूरकर देशपांडे यांच्या वहींतील शकावलींत इंगळे यांचे सोयरिकीबद्दल स्पष्ट खुलासा आहे. तेव्हां महाराजांची आठवी राणी इंगळे यांची कन्या होती याविषयीं शंका नाहीं. तिच्या नांवाचा मात्र निश्चय साधनाभावीं नीट करतां

* सदर विवेचन उत्तर ( पेशवे ) कालीन बखरीच्य आधारें केलें असल्यामुळें चिंत्य आहे—संपादक.

येत नाहीं. तिचें नांव लक्ष्मीबाई अथवा गुणवंताबाई या दोन नांवांपैकीं एक असावें इतकें मात्र सांगतां येतें.

याप्रमाणें महाराजांचे आठहि विवाह शके १५७९ (इ. स. १६५७) पावेतों झाले. यापुढें महाराजांनीं नवी राणी केली नाहीं. प्रो. जदुनाथ सरकार (हल्लीं सर) यांनीं आपल्या शिवचरित्रविषयक ग्रंथांत शिवाजीमहाराजांस आठ राण्या होत्या असेंच दाखविलें आहे; पण महाराजांचे दोन विवाह शके १५९६ (इ. स. १६७४) या वर्षीं, एक राज्याभिषेकापूर्वीं व दुसरा राज्याभिषेकानंतर—झाल्याचें म्हटलें आहे (पहा Shivaji and his Times, 3rd Ed. 1929 P. 341.) तेव्हां सर जदुनाथ यांच्या या विधानाच्या ग्राह्याग्राह्यतेविषयींहि येथें थोडक्यांत विवेचन केलें पाहिजे.

सर जदुनाथ सरकार यांचें हें विधान सर हेन्री आक्सिंडन् नांवाच्या इंग्लिश वकिलाचे पत्रांतील उल्लेखावर रचलेलें आहे. आक्सिंडन हा रायगडास छत्रपती शिवाजीमहाराज यांच्या राज्याभिषेकासाठीं मुंबईच्या इंग्लिश व्यापाऱ्यांतर्फे आलेला होता. त्याच्या ता. २७ मे १६७४ च्या पत्रांत "The Raja was and is still so busy about his coronation and marriage with two other women that it was yesterday before we had audience" याप्रमाणें महाराज दोन लग्नें करण्याच्या विचारांत असल्याची बातमी दिली असून त्यापुढील ता. ८ जूनच्या पत्रांत The Raja was married to a fourth wife without any state or ceremony. असें त्यानें म्हटलें आहे. आक्सिंडनच्या या दोन्हीं पत्रांतील मजकुरांची संगती लावण्याकरितां सर जदुनाथ सरकार यांनीं ता. २७ मे १६७४ नंतरची जेधे शकावलींतील समंत्रक विवाहाची मिती ग्राह्य धरून तो एक विवाह मानला व ता. ८ जूनच्या पत्रांत विवाह झाल्याचें त्यानें लिहिलें म्हणून त्या दिवशीं एक विवाह झाला असें मानिलें. पण थोडा विचार केला असतां आक्सिंडन यांच्या लिहिण्यावरूनच या वेळेस महाराजांचे नवे विवाह झाले नाहींत हें लक्षांत येईल. पहिले पत्रांत नुसती दोन विवाह होणार असल्याची बातमी आहे. त्या वेळीं हयात असलेल्या राण्यांशींच पुनः समंत्रक विवाह होण्याचें घाटत होतें. समंत्रक रीतीनें एकाच राणीशीं विवाह करावा अथवा अधिक राण्यांशीं करावे या गोष्टीचा पूर्ण निश्चय झाला नसेल अशा वेळीं एक दोन विवाहांची अशी मोघम बातमी त्यास लागणें स्वाभाविक होतें. पण पुढें निश्चय होऊन हा विवाहविधि ता. ३० मे १६७४ रोजीं झाला. तेव्हां त्यानें ता. ८ जून रोजीं लिहिलेल्या आपल्या पत्रांत महाराजांचा विवाह झाल्याची नुसती बातमी कळविली. यांतील ८ वी तारीख

ही त्यानें पाठविलेल्या पत्राची आहे, विवाहाची नाहीं, हें त्यानें The Raja was married अशा भूतकाळवाचक प्रयोग केला आहे, यावरूनच लक्षांत येईल. दुसरें त्या दिवशींच विवाह झाला असें दाखविणारे today किंवा अशा अर्थाचे दुसरे शब्दहि त्यांत त्यानें योजिलेले नाहींत. शिवाय त्यानें या विवाहप्रसंगीं कांहीं थाटमाट अथवा समारंभ झाले नाहींत असें without any state or ceremony या शब्दांनीं स्पष्ट सांगितलें आहे. राज्याभिषेकसमयीं मौंजीबंधन झाल्यावर महाराजांचा जो समंत्रक विवाहविधि झाला तो कशा प्रकारचा होता हें वर आलेंच आहे. हा विधि केवळ एका विशिष्ट हेतूनें *पूर्वीच्या राण्यांशींच पुनः झाला असल्यानें त्या विधी शिवाय दुसरे लौकिक समारंभ होण्याची त्या वेळीं गरजच नव्हती व म्हणूनच त्या-बद्दल विशेष समारंभ झाले नाहींत. पण या विवाहाचें हें रहस्य त्या विदेशीय लेख-कास कसें कळणार ? त्यानें नुसतें विवाहासंबंधानें समारंभ झाले नाहींत येवढेंच लिहिलें, त्यावरून आक्झिडन याच्या लिहिण्याचा रोख वाचकांच्या लक्षांत येऊन, त्यानें हे राज्याभिषेकापूर्वी महाराजांच्या झालेल्या समंत्रक विवाहविधीविषयींच लिहिलें आहे याबद्दल त्यांची खात्री होईल.

आक्झिडनप्रमाणेंच डॉ. फ्रायर नांवाचा एक प्रवासीहि त्या वेळीं§ रायगडास आला होता. त्यानेंहि आपले प्रवासवृत्तांत "महाराजांनीं राज्याभिषेकसमयीं चौथी बायको केली असें म्हटलें आहे. आक्झिडनहि Raja was married to a fourth wife असेंच म्हणतो. तेव्हां या दोन्हीं विदेशीय लेखकांचे उल्लेख एकाच विवाहास अनुलक्षून आहेत व डॉ. फ्रॉयर यानें तो विवाह राज्याभिषेकसमयीं झाल्याचें म्हटलें आहे. तेव्हां सर जदुनाथ यांनीं राज्याभिषेकानंतर विवाह झाल्याचें जें अनुमान काढिलें आहे तें निराधार आहे.

सर जदुनाथ यांस विदेशी लेखकांचे आधार तेवढे विशेष ग्राह्य वाटतात व देशी आधारांविषयीं त्यांची धरसोडीची वृत्ती असते यामुळेंच त्यांनीं जेधे शकावलीं-तील आम्ही आधारभूत मानलेल्या दोन विवाहविषयक मित्या प्रमुखपणें ग्राह्य न

---

* सर जदुनाथ यांनीं आपल्या 'शिवाजी'मध्यें "राज्याभिषेककल्पतरू" ग्रंथाचें नांव दिलें आहे. सदर ग्रंथ कलकत्ता येथील सरकारी ग्रंथालयांत असूनहि तो त्यांनीं काळजीपूर्वक पाहिल्याचें मात्र दिसत नाहीं.

§ डॉ. फ्रायर इ. स. १६७५ मध्यें हिंदुस्थानांत आला. त्यानें राज्याभिषेका-बद्दल लिहिलेली माहिती ऑक्झिडेनच्याच माहितीवरून लिहिली हें आतां सिद्ध झालें असल्यामुळें त्याचा पुरावा स्वतंत्र धरण्याची आवश्यकता नाहीं. —संपादक

धरितां आक्झिडनच्या पत्रावरून अनुमानानें त्यांस वाटलेल्या मित्या त्यांनीं ग्राह्य धरल्या. पण त्यांनीं ग्राह्य मानलेल्या दोन्ही मित्यांस महाराजांचा नवीन स्त्रीशीं विवाह झाल्याचें सिद्ध होत नाहीं. तेव्हां राज्याभिषेकानंतर महाराजांचा विवाह झाल्याचें जें विधान सर जदुनाथ यांनीं आपले ग्रथांत केलें आहे तें त्याज्य आहे हें निराळें सांगण्याची गरज नाहीं.

महाराजांचे आठ विवाह झाले असें आम्हीं वर विस्तारानें दाखविलें असून सर जदुनाथ महाराजांचे आठ विवाह झाले असेंच मानतात; असें असतां डॉ. फ्रायर व आक्झिडन् हे दोघेहि विदेशीय लेखक महाराजांनीं या वेळीं ( राज्याभिषेकसमयीं ) चौथी बायको केली असें म्हणतात तें कां, याविषयीं खुलासा सर जदुनाथ यांनीं करावयास पाहिजे होता पण तसा त्यांनीं केला नाहीं.

आमच्या मतें महाराजांच्या राज्याभिषेकसमयीं चारच राण्या हयात असाव्यात. सईबाई इ. स.१६५९ त वारल्याचा जेधे शकावलींतील उल्लेख वर आलाच आहे. शिवाय महाराजांचे मागें एकटी सोयराबाई राहिली असून राज्याभिषेकसमयीं पट्टराणीचा मान तिलाच मिळाला होता. तेव्हां तिच्याहून वडील असलेली सगुणाबाई त्या वेळीं (राज्याभिषेकसमयीं) हयात नव्हती हें स्पष्ट आहे. इ. स. १६७४ मार्च महिन्यांत महाराजांची एक स्त्री निवर्तल्यामुळें महाराज अशौचांत आहेत असा उल्लेख हेन्री आक्सिडनचा दुभाषा नारायण शेणवी यानें आपल्या तारीख ४ एप्रिल १६७४इ. चे पत्रांत केला असून नुकत्याच प्रकाशित झालेल्या ''राज्याभिषेककल्पतरू'' ग्रंथांत महाराजांच्या काशीबाई नामक राजपत्नीचा मृत्यु झाल्याचें वृत्त " तस्या गमनतः कैश्चित् दिवसैस्वामिवल्लभा ॥ काशी त्यक्त्वा निजं रूपं स्वरूपेण व्यवस्थिता ॥" अशा प्रकारें दिलें आहे. गागाभट्टाचे आगमनानंतर काशीबाईचा मृत्यु झाला. तेव्हां नारायण शेणवी याचे पत्रांतील उल्लेख कदाचित् काशीबाईसंबंधानेंच असावा व तो तसा असल्यास राज्याभिषेकापूर्वी आणखी एकादी महाराजांची राणी गत झाली असावी. याप्रमाणें पूर्वी महाराजांच्या चार स्त्रिया गत झाल्यामुळें राज्याभिषेकसमयीं चारच हयात असाव्या व या विदेशीय लेखकांस या वेळचे समंत्रक विवाहाची बातमी मिळून महाराजांस चार स्त्रिया असल्याचें समजलें. तेव्हां त्यांनीं राज्याभिषेकसमयीं महाराजांनीं चौथी बायको केली असें सरळ म्हटलें " उघड दिसतें. असो.

येथपर्यंत महाराजांच्या मुख्य राण्यांचीं नांवें, त्यांचे विवाह-काल, त्यांचीं पितृघराणीं इत्यादि ऐतिहासिक साधनांचे आधारें साधकबाधक प्रमाणांनीं निश्चित केलीं. आतां या मुख्य राण्यांशिवाय महाराजांस आणखी दोन स्त्रिया असल्याविषयीं

एक दोन ठिकाणीं उल्लेख आहेत व तेथें त्या स्त्रियांस " उपस्त्रिया " असें म्हटलें आहे. त्यावरून महाराजांच्या निर्मल चारित्र्याविषयीं पुष्कळांची विपरीत भावना होऊन अनेक तर्ककुतर्क रचले गेले व चार वर्षांपूर्वीं मुंबई येथील टाइम्स नामक इंग्रजी दैनिकांत त्यासंबंधानें दोन चार महिने सारखा वादविवाद चालला होता. तेव्हां त्या विधानांचाहि येथें थोडक्यांत परामर्ष घेणें अवश्य आहे.

महाराजांस उपस्त्रिया असल्याचा उल्लेख प्रथमतः कै. राजवाडे यांस रामदासांचे चरित्रांत आढळला. तेव्हां त्यांनीं आपल्या " मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ४ था " या ग्रंथांचे प्रस्तावनेंत पृष्ठ ५३ वर " शिवाजीस + + दोन उपस्त्रिया होत्या असें रामदासांच्याच चरित्रावरून दिसतें. " असें मोघम म्हटलें. पण पुढें ऐतिहासिक लेखकांत मान्य समजले जात असलेले अधिकारी लेखक प्रो. जदुनाथ सरकार ( हल्लीं सर ) यांनीं केवळ राजवाड्यांचे लेखांचे आधारावर महाराजांस दोन उपस्त्रिया अर्थात् रक्षा ( Concubines ) होत्या असें आपल्या " Shivaji and His Times " या ग्रंथांत लिहिलें ( पहा 2nd ed. page 381 footnote ) आणि त्या आधारावर मुंबईचे माजी विद्वान् पोलीस कमिशनर मि. एस्. एम. एड्वर्डस् ( हल्लीं परलोकवासी ) यांनीं आपल्या Crime in India या ग्रंथांत ( पृ. ७८ ) शिवाजीमहाराज वेश्या ठेवीत असत असें बेधडक विधान केलें आणि त्यावरून पुढें टाइम्स पत्रांत इ. स. १९२५ या वर्षीं हा वाद उत्पन्न होऊन त्यावर अनेक कुकल्पनांची रचना केली गेली. टाइम्समधील कित्येक लेखकांनीं तर अखेरीस महाराजांच्या आठ राण्यांस रखेल्या ठरविण्यापर्यंत मजल नेऊन पोंचविली, व इतिहाससंशोधकांनीं त्यावर प्रकाश पाडावा म्हणून आव्हान केलें. त्याप्रमाणें त्या वेळीं धार संस्थानचे इतिहासभक्त अधिपती कै. श्रीमन्महाराज उदाजीराव पवार यांचे अनुज्ञेनें यासंबंधानें आवश्यक माहिती मिळवून एक खंडनात्मक लेख लिहून पुणें येथील ज्ञानप्रकाश दैनिकांत छापून प्रसिद्ध केला ( पहा दैनिक ज्ञानप्रकाश ता. ४ ऑगस्ट १९२५ ). व त्यांत या नवीन उपस्थित केलेल्या दोषारोपांचें सयुक्तिक खंडन केलें असल्यानें त्याची एक प्रत या नवीन कुत्सित प्रवादाचे मूळ उत्पादक प्रो. सरकार यांजकडे पाटना येथें विचारार्थ पाठविली. त्यांचे उत्तरांत त्यांनीं ता. २१ ऑगस्ट १९२५ रोजीं "Your article is full and judicious " असें लिहून कळविलें. तेव्हां, ते आतां आपल्या शिवछत्रपतीविषयक ग्रंथाचे पुढील आवृत्तींत या आपल्या बेजबाबदार विधानाची दुरुस्ती करतील असें वाटलें व त्याचें थोडें प्रत्यंतर त्यांनीं इ. स. १९२८ चे मार्च

महिन्याचे ९ वे तारखेस मद्रास येथें झालेल्या शिवजन्मोत्सव-प्रसंगीं जें भाषण केलें त्यांतील पुढील वाक्यांवरूनहि दिसून आलें. त्यांनीं आपल्या भाषणांत महाराजांविषयीं " He was devoted to his mother, loving to his children, true to his wives and scrupulously pure in his relations with other women " असे उद्गार काढले होते. परंतु हल्लीं त्यांच्या शिवचरित्रविषयक ग्रंथाची नवी आवृत्ति ( तिसरी ) नुकतीच प्रसिद्ध झाली आहे, ती पाहतां मात्र सर साहेबांचा शिवाजीमहाराजांविषयीं झालेला गैरसमज अद्याप पूर्णपणें नाहींसा झाला नाहीं, असेंच दिसून आलें. नाहीं म्हणावयाला सर जदुनाथांच्या ज्या टीपेच्या आधारावर मि. एडवर्डस् यांनीं आपल्या " Crime in India " नामक ग्रंथांत शिवाजीमहाराज वेश्या ठेवीत असत असें विधान केलें तेवढी टीप मात्र आपल्या ग्रंथाच्या नव्या आवृत्तींतून सर साहेबांनीं गाळली आहे. पण पुढें पृ. ३९८–९९ मध्यें महाराजांचे चारित्र्याविषयीं लिहितांना त्यांनीं " Shivaji's private life was marked by a high standard of morality. " असें लिहून पुढें "He was a devoted son, a loving father and an attentive husband, though he did not rise above the ideas and usage of his age which allowed plurality of wives and the keeping of concubines even among the priestly caste, not to speak of warriors and kings. असें संशयात्मक लिहिलें त्यांत त्यांनीं महाराजांच्या नैतिक आचरणाविषयीं संशय तर व्यक्त केलाच, पण आणखी जातां जातां तत्कालीन महाराष्ट्रीय समाजावर–विशेषत ब्राह्मणवर्गावर व त्याबरोबर सैनिक व राजे ह्यांवर त्या अनैतिक दोषाचें खापर फोडिलें आहे. तेव्हां त्यांनीं महाराजांचे चारित्र्यावर केलेला हा दोषारोप किती निराधार व अज्ञानमूलक आहे हें दाखवून त्याचें पुनः साधार व यथायोग्य खंडन येथें करणें अवश्य वाटतें.

टाइम्स पत्रांत हा दोषारोप उपस्थित केला गेल्यापासून कै. राजवाडे यांच्या ऐतिहासिक साधनांच्या चौथ्या खंडाचे प्रस्तावनेंत उल्लेखिलेल्या रामदासस्वामींचे चरित्राचा शोध पुण्यास व अन्य ठिकाणींहि केला. परंतु तें उपलब्ध झालें नाहीं. या मुळें त्या वेळचे खंडनात्मक लेखांत त्याबद्दल विशेष खुलासा करतां आला नाहीं. पण तें कोठें तरी मिळावें, यासाठीं शोधाचा प्रयत्न चाललाच होता. इतक्यांत दोन वर्षांपूर्वीं धार येथें त्याची एक लेखी प्रत प्रसिद्ध इतिहाससंशोधक गु. काशिनाथ कृष्ण लेले यांचे संग्रहांत अचानक मिळाली. ही प्रत थोडी त्रुटित आहे. तिचे प्रत्येक प्रकरणाचे शेवटीं लेखकाचें नांव, लेखनवर्ष ( संवत् १९१० ) व लेखनस्थान मंदो-

सर दिलें आहे. तिसरें प्रकरण व आणखी एक दोन पृष्ठें गहाळ असून, सहाव्या प्रकरणानंतरचा भाग उपलब्ध नाहीं. मात्र पांचवें प्रकरण—ज्याचे आधारावर कै. राजवाडयांनीं वरील विधान केलें—तें पूर्ण आहे. त्यांत आरंभींच पुढील गोष्ट दिली आहे :—

श्रींचे चरित्रास पांचवे प्रकरणास पारंभ चतुर्थ प्रकरणाचे अंतीं श्री पंढरीस जाऊन, श्रींचें दर्शन करून, श्री कृष्णातीरीं आल्यानंतर कोणे येके दिवशीं रायगडीं छत्रपति असतां महाराज निद्रास्थानीं त्रिवर्ग राण्या जेष्ठ पत्नी सईबाईसाहेब, दुसरी सोयराबाई-साहेब, तिसरी सगुणाबाईसाहेब व उपस्त्रिया लावेरसी लग्न लाविलेल्या मनोहर व मनसंतोष§ असे पांच जणे बसले आहेत; गोमांतकी आंबे आले होते. त्याचे कापे करून त्रिवर्ग राण्यांनीं व उभयतांनीं तार्टे भरून पुढें ठेवलीं. महाराजांनीं चित्तांत आणोन बोलिले कीं, हे आंबे बहुत चांगले आहेत, या समई स्वामी समर्थ असते तरी समर्पण करून नंतर प्रसाद घेतो; असें राण्यांशीं महाराज बोलतात, तो कवाडास धक्का देऊन दार उघडा म्हणोन समर्थ बोलिले, शब्द ऐकून महाराज त्वरेनें उठोन कवाड उघडून पाहतात तों स्वामी उभे ! दंडवत करून समर्थांचा हात हात-वर घेऊन, खोलींत नेऊन आसनावर बसवून, पादप्रक्षालन करून पूजा केली. आंबे स्वामीस अर्पण केले ! नंतर प्रसाद राजश्रींनीं सेवन करून राण्यास प्रसाद दिल्यानंतर समर्थास महाराजांनीं तांबूल देऊन चार घटका स्वाभाविक भाषणें जाहालीं. समर्थ जाण्यास निघाले. महाराज रात्रीचा समय येणें कसें झालें. आणि जाण्याचे कोठें ? बाहेर ये, दाखवितो, म्हणोन महाराजांचा हात धरून किल्ल्याच्या तटावर आले. खालीं एक पाय वरता एक पाय असा चढून आलो, असा उतरून जातो. विद्युलतेसारखा प्रकाश पडून स्वामी अदृश्य झाले ! हें पाहून महाराज विचार करितात, जें स्वामींचें करणें तें परम आश्चर्यकारक पाहून संतोष मानिते झाले. हें चरित्र शके १५७२ विकृति नाम संवछरी जाहाले.

वरील गोष्टींत शके १५७२ पूर्वी दोन लावेरसी (अनाथ) कन्यांशीं श्री शिवाजी-महाराजांनीं लग्नें लाविलीं असून त्यांचीं नावें मनोहारी व मनसंतोष हीं होतीं हें नमूद

§ हीं नांवें विलक्षण आहेत. मराठा स्त्रियांचीं अशीं नांवें आढळत नाहींत. तेव्हां या नांवांत कांहीं वैशिष्ट्य असावें, बहुधा हीं स्मारक नांवें असावींत असें वाटतें. महाराजांचे ताब्यांत जे अनेक डोंगरी किल्ले होते त्यांतील अगदीं जवळजवळ असलेल्या दोन किल्ल्यांचीं हींच आहेत. त्यांतील मनोहरगड अतिशय मजबूत व दुर्गम असून तेथून मनसंतोषगड हा अगदीं जवळ आहे. या दोहोंत एका २०० फूट खोल दरीचें मात्र अंतर आहे. (पहा शिवाजी सोव्हनीर मराठी विभाग पृ. ८३). तेव्हां या दोन किल्ल्यांशीं या दोन स्त्रियांचा कांहीं संबंध असेल काय ?

आहे व चरित्रलेखकानें त्या स्त्रियांना मुख्य राण्यांपासून निराळें दाखविण्याचे हेतूनें त्यांजबद्दल उपस्त्रिया लावेरसी लग्न लाविलेल्या हे शब्द मुद्दाम योजिले आहेत. यावरून या स्त्रिया लग्न लाविलेल्या होत्या, रखेल्या (Concubines) नव्हत्या ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे. अवतारी पुरुषांच्या मुख्य राण्यांस नायिका व इतर स्त्रियांस उपस्त्रिया म्हणण्याचा परिपाठ जुनाच असल्यानें बृहदीश्वर शिलालेखांत व वरील रामदास स्वामींचे चरित्रांत 'अष्ट नायिका व उपस्त्रिया' हे अनुक्रमें योजलेले शब्द तशाच अर्थाचे द्योतक आहेत. तेव्हां समर्थांचे चरित्रांतील 'उपस्त्रिया' हा शब्द निंदाव्यंजक नाहीं. हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. असो, आतां अशा लावेरसी कन्यांशीं महाराजांनीं स्वतः लग्नें कां लाविलीं हा एक प्रश्न उपस्थित होईल. त्याचें बिनचूक उत्तर या संबंधाचा तत्कालीन परिस्थिती दर्शविणारा कांहीं पुरावा उपलब्ध झाल्यावांचून देतां येणें शक्य नाहीं. तथापि तें उत्तर थोड्या अनुमानानेंहि उलगडतां येईल. तें असें कीं, तत्कालीन कांहीं राष्ट्रीय आपत्तीमुळें या बालिका निराश्रित झालेल्या असतील व तशाच कांहीं अपरिहार्य कारणांमुळें महाराजांस त्यांच्याशीं विवाह-संबंध करण्याचा प्रसंग आला असेल. परंतु अशा निराश्रित मुलींचा देखील महाराजांनीं विवाहविधीवांचून अंगिकार केला नाहीं, ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. तीवरून महाराजांची शिस्त व शास्त्रविधिपालनाविषयीं आस्था आणि प्रवृत्ति हीं दिसून येतात. या बालिका लावेरसी म्हणजे निराश्रित होत्या. यामुळें साहजिकच त्यांचे कुल-शीलाविषयीं नक्की माहिती मिळणें संभवनीय नसेल व म्हणूनच त्यांना मुख्य राण्यांचा दर्जा मिळणें केव्हांहि शक्य नव्हतें. चरित्रकारासहि त्यांना मुख्य राण्यांपासून निराळें दाखविण्यास हेंच कारण झालें आणि त्यासाठीं त्यानें उपस्त्रिया हा शब्द योजिला. व कै. राजवाड्यांनींहि त्याविषयीं कांहीं स्पष्टीकरण न करितां तो शब्द तसाच मोघम योजिल्यामुळें त्याचा परिणाम असा झाला कीं, सर जदुनाथांसारख्या लेखकास पराचा कावळा करण्यास सवड सांपडली. खरी स्थिती एक असून ती विपरीत भासविली गेली. कै. राजवाडे यांनीं ज्या आधारावर शिवाजीमहाराजांस उपस्त्रिया होत्या असें म्हटलें तो मूळ आधार पाहून तपासून त्याविषयीं योग्य विधान सर जदुनाथ यांनीं आपले ग्रंथांत करावयास पाहिजे होतें. पण तसें त्यांनीं केलें नाहीं, इतकेंच नव्हे तर, हा रामदास स्वामींचे चरित्रांतील मूळ आधाराचा आवश्यक उतारा बडोदें येथील सहविचार द्वैमासिकाचे एप्रिल—जून १९२७चे अंकांतील आमच्या छत्रपतींच्या विवाहविषयक लेखांत दिला असतांहि त्याकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. आंग्ल इतिहासकारांना महाराजांच्या चरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांचें रहस्य नीट न कळल्यामुळें व त्यांचे इतिहास

विशेषत: मुसलमानी तवारिखांचे आधारावर रचिले गेल्यामुळें शत्रुपक्षांकडून द्वेषबुद्धीनें लाविलेल्या विशेषणांची अथवा केलेल्या दोषारोपांची पुनरावृत्ती त्यांचे ग्रंथांतून झाली आहे. पण तसाच प्रकार आपल्या देशी इतिहासकारांकडूनहि व्हावा हें मोठें विलक्षण आहे ! महाराजांची राज्यकारभाराची व्यवस्था मोठी नमुनेदार असून त्यांची शिस्त फारच कडक असे. लष्करांत बटीक बायको कलावंतीण कलाल नेऊं नये. ++ लुटींत बायको पोर धरूं नये. ब्राम्हणाचे वस्तीस व देवास उपद्रव न लावावा, गाई धरूं नये इत्यादि महाराजांच्या शिस्तीचे नियम सुप्रसिद्ध असून यांविरुद्ध वागणारांस तत्काल शिक्षा होत असे. स्वत: महाराजांची परस्त्रियांविषयीं अत्यंत पवित्र व उदार भावनेची वर्तणूक होती. आबाजी सोनदेवानें कल्याणचा सुभा काबीज केला, त्या वेळीं हातीं लागलेल्या स्त्रीरत्नाची परत रवानगी महाराजांनीं किती आदरानें व थोरपणानें केली हें इतिहासप्रसिद्ध आहे. अशीच दुसरी गोष्ट गोळेवाडी (प्रांत वाई)येथील स्वारींत बंडखोर गोळ्यांची सून हस्तगत झाली तिजविषयींची आहे. तिला महाराजांनीं लुगडें चोळी नेसवून मोहरांनीं तिची ओटी भरवून बरोबर जासूद देऊन घरीं पोंचती करविली. (शेडगांवकर बखर पृ. २२) अशीं महाराजांच्या उज्वल नीतिमत्तेचीं उदाहरणें प्रसिद्ध असतां सर जदुनाथांसारख्या इतिहासकारानें महाराजांसारख्या थोर व पुण्य पुरुषाचे चारित्र्यावर संशयाचे शितोडे उडवून तें कलंकित करण्याचा प्रयत्न करावा याला काय म्हणावें ?

छत्रपती शिवाजीमहाराजांनीं अनेक लग्नें केलीं हें युरोपियन समाजाच्या दृष्टीनें त्यांस वावगें वाटतें व म्हणून त्यांनीं हिंदुसमाजपद्धतीस दोष दिला. पण हिंदुसमाजाची रचना युरोपियन समाजाच्या रचनेहून अगदीं भिन्न आहे हें यांनीं लक्षांत घेतलें नाहीं. हिंदु लोकांना त्यांच्या समाजव्यवस्थेप्रमाणें एक स्त्री हयात असतां आणखी एक किंवा एकीहूनहि अधिक स्त्रिया करतां येतात व युरोपियन समाजांत काडी मोडण्याची सवड असल्यामुळें काडी मोडून टाकल्यावर दुसरी स्त्री किंवा जरुरीप्रमाणें आणखी अशाच एकीमागून अनेक स्त्रिया करितां येतात.बाकी दोन्ही समाजांतील पुरुष अनेक लग्नें आपापल्या समाजव्यवस्थेप्रमाणें करूं शकतात व करतात. मग युरोपियन समाजानें हिंदुसमाजपद्धतीसच नांवें कां ठेवावी व छत्रपति शिवाजीमहाराजांनीं इतकीं लग्नें केली, याबद्दल आश्चर्य कां मानावें, हें कळत नाहीं. शिवाय छत्रपती शिवाजीमहाराजांचा अशीं अनेक लग्नें करण्यांत कांहीं विशिष्ट राजकीय हेतु होता ही प्रसिद्ध असलेली गोष्ट लक्षांत घेतली, म्हणजे त्यांनीं अनेक विवाह कां केले याबद्दल आश्चर्य वाटण्याचें मुळींच कारण राहणार नाहीं.

छत्रपतींचे पहिले दोन विवाह अगदीं अल्पवयांत म्हणजे त्यांचे वयाच्या १० वे व ११ वे वर्षी झाले व बाकीचे सर्व पुढें तिशीच्या आंतच झाले हें वर दाखविलेंच आहे. तेव्हां महाराजांनीं उतारवयांत अनेक लग्नें केलीं असें दाखविण्याचा कित्येक ग्रंथकारांचा प्रयत्न केवळ कुतर्कावर रचिलेला आहे हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. शिवाय महाराजांचे आरंभींचे विवाह बालवयांत झाले तथापि बालविवाहाचे अनिष्ट परिणाम त्यांच्या संततीवर झाल्याचें दिसत नाहीं महाराज स्वतः चांगले सुदृढ व सशक्त असून त्यांची संतती तशीच होती. त्यांचे उभयतां पुत्र त्यांचे प्रमाणेंच चांगले सुदृढ व पराक्रमी निपजले ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे.

आतां महाराजांच्या अपत्यपरिवारविषयींहि येथें थोडें सांगितलें पाहिजे. महाराजांच्या राण्यांत पुतळाबाई, गुणवंताबाई, लक्ष्मीबाई व काशीबाई या चौघी अपत्यहीन असून दोघी उपस्त्रियांचे संततीविषयीं कोठें उल्लेख आढळला नाहीं. बाकीच्या चार राण्यांपासून महाराजांस दोन पुत्र व सहा कन्या अशीं आठ अपत्यें झालीं.

१–सईबाईला एक पुत्र व तीन कन्या अशीं चार अपत्यें होतीं. त्यांतील

( १ ) पुत्र संभाजीराजे यांचा जन्म शके १५७९ ( इ. स. १६५७ ) मध्यें झाला. पिलाजी शिर्के मळेकर यांची कन्या जिऊबाई ऊर्फ येसूबाई इच्याशीं त्यांचा विवाह झाला ( शके १५९१ ). पुढें शिवाजीमहाराजांनीं संभाजी राजे यांस शके १५९८ मध्यें आपलें स्वराज्य पुणें प्रांतीं तख्त दिलें. छ. संभाजीमहाराजांचे पुत्र शाहूमहाराज हेच पुढें सातारच्या गादीचे संस्थापक झाले.

( २ ) तीन कन्यांपैकीं सकवारबाई ऊर्फ सखूबाई ही फलटणचे महादजी नाईक निंबाळकर यांस दिली होती ( इ.सं. वर्ष २, अंक ९, फलटणचे निंबाळकर पृ. ३०; व.ले.७३२).महादजीचें लग्न पुण्यास झालें.महादजीचे वडील बजाजी नाईक निंबाळकर विजापूरकर बादशहाचे पदरीं होते. त्यांस बादशहाचे हुकमावरून मुसलमानी धर्म स्वीकारावा लागला. परंतु हे छत्रपति शिवाजीमहाराजांचे नातेवाईक असल्यानें त्यांना शुद्ध करून परत हिंदुधर्मांत घ्यावें असें मातुश्री जिजाबाई ह्यांच्या मनांत येऊन त्यांनीं बजाजीस प्रायश्चित्त देऊन शुद्ध करविलें; आणि तो असा शुद्ध होऊन स्वजातींत आल्याबद्दल कोणीं संशय न बाळगावा यासाठीं त्याचे पुत्र महादजी यांस शिवाजीमहाराजांनीं आपली मुलगी देऊन बजाजीशीं व्याह्याचें नातें जोडिलें. इ. स. १६५७ त महाराजांनीं आपल्या या कन्येस दिवाळीचे ओंवाळणींत वाल्हें गांव दिला.

( ३ ) दुसरी कन्या राणूबाई इस जाधवांचे घरीं दिलें.

( ४ ) तिसरी कन्या अंबिकाबाई ही हरजी राजे महाडिक तारळेकर यांस दिली. हरजी राजे यांस जिंजी प्रांतांत जहागिरी देऊन त्या प्रांताची सुभेदारीहि महाराजांनीं त्याजकडे सोंपविली होती.

२–सोयराबाईला एक पुत्र व एक कन्या अशीं दोनच अपत्यें होतीं.

( १ ) पुत्र राजाराम महाराज यांचा जन्म शके १५९१ (इ. स. १६७०) मध्यें झाला. त्यांचें पहिलें लग्न प्रतापराव गुजर यांच्या कन्येशीं झालें होतें. तिचें नांव जानकीबाई. ही लवकरच वारली ( म. रि. पू. पृ. ६१४ ). यांचीं पुढें आणखी दोन लग्नें झालीं. त्यांतील वडील ताराबाई ही हंबीरराव मोहित्यांची कन्या व धाकटी राजसबाई ही कागलकर घाटगे यांची कन्या या दोघींपासून छ. राजाराममहाराजांस दोन पुत्र झाले; ताराबाईपासून शिवाजी व राजसबाईपासून संभाजी. ताराबाईनेंच पुढें कोल्हापुरास निराळें राज्य स्थापिलें.

( २ ) सोयराबाईची कन्या बाळीबाई ऊर्फ दीपाबाई ही विसाजीराव नामक एका सरदाराला दिली होती.

३–सकवारबाईची कन्या कमलाबाई ही जानोजी पालकर यांस दिली असून,

४–सगुणाबाईची कन्या राजकुवरबाई ऊर्फ नानीबाई ही गणोजी राजे शिर्के मळेकर यांस दिली होती.

या एकंदर विवेचनावरून छत्रपती शिवाजीमहाराजांच्या सांसारिक व्यापाची बरीच स्पष्ट कल्पना वांचकांस होईल. महाराजांच्या ह्या व्यापामुळें अनेक घराण्यांशीं त्यांचें नातें व सख्य होऊन परस्परांत प्रेमवृद्धी व ऐक्य होत गेलें व अनेक व्यक्तींचीं मनें आकर्षिलीं जाऊन, उद्दिष्ट कार्यांत येणारे अडथळे नाहींसे होत गेले व महाराजांच्या हेतूंप्रमाणें त्यांनीं आरंभिलेलें हिंदवी स्वराज्यस्थापनेंचें महत्कार्य यशस्वी झालें.

# THE POET SAINTS OF MAHARASHTRA DURING THE LIFE OF KING SHIVAJI

By Justin E. Abbot

## PREFACE

Mahipati (1715–1790), in his Bhaktalilamrita gives an account of the meetings of King Shivaji with Tukaram. His Santavijaya records the frequent meetings between King Shivaji and Ramdas. In the *abhangs* of Tukaram and the writings of Ramdas there are confirmations of this close relationship. Writers, later than Mahipati, like Hanumant, place great emphasis on this relationship. But unfortunately these accounts do not satisfy the historian. Mahipati wrote the Bhaktalilamrita in 1774, a little under a hundred years after the death of Shivaji. He gives no hint even of the documents he used in recording King Shivaji's relations with Tukaram. The account given by Mahipati of the relation between Shivaji and Ramdas is still more unsatisfactory from the historian's point of view. The history of Shivaji, that comes nearest to be written by a contemporary, is that of Sabhasad, written perhaps in 1694, 14 years after Shivaji's death. That history does not so much as mention the name of Ramdas. Whereas Mahipati, in his Santavijaya represents Shivaji as spending a large part of his time with Ramdas, and dominated by his influence. The *abhangs* of Tukaram would furnish good evidence if the authenticity of the *abhangs* were assured. It is admitted by all scholars that not all the *abhangs* in the collections bearing Tukaram's name are of his authorship, and

only guesswork distinguishes between the authentic and the unauthentic. Thus the historic foundations of accounts connecting King Shivaji with any Poet-saint are insecure. Tradition makes the relation close. The historian sees no decisive evidence either for or against the direct influence of either Tukaram or Ramdas on the great Maratha hero.

But whether the influence of the poet-saints on King Shivaji was direct or indirect, he could not have escaped it. Tukaram and Ramdas were not the only saints that sang and preached and wrote on the relationship of man to God and man to man. There were many others, some whose names and writings have come down to our time, others are more or less forgotten now, but who helped to form that religious and moral atmosphere that King Shivaji had to breathe, whether he wished it or not. It is not in the province of my paper to discuss the religious or moral character of Shivaji, nor the actual effect of his direct or indirect contact with the poet-saints of his time. Those subjects belong to other writers. My province is to list those poet-saints that were centres of light in Shivaji's time and whose lives and teachings created influences that must have reached the king, whether in his fastnesses of Pratapgad, Raigad and Torna, or leading his valiant Mavlis against a Muhammadan army. Whether those influences really moulded his character, it is for others to say, or to guess, in the absence of documentary evidence. Like the light of the sun reaching everywhere, and yet one can enclose oneself in the dark chamber, so Shivaji may not have used to the full the light that Tukaram aud Ramdas could have supplied for his inner motives and springs of action. But their lights

were shining, and he could not have wholly escaped from their rays. Perhaps with the flame of patriotism in his soul, and the desire to see his land free from alien rule, he may have preferred the worship of fierce Bhavani, rather than the gentle Vitthal of Pandharpur, nevertheless Tukaram and Ramdas were not lights hidden under a bushel, and their call to higher spiritual devotion and to a higher moral life, must have reached Shivaji's ears, and may have touched his heart. Reliable history is silent on this influence upon his character, but one cannot but assume it, just as one assumes daylight after the sun has arisen.

## TUKARAM

Data are wanting for the exact determination of the years in which Tukaram was born and died, but the very generally accepted dates are A. D. 1608[1] for his birth, and 1649 for his death, or as the poet puts it, his bodily accession into Heaven. *If Shivaji was born in 1630*, he was 19 years of age when Tukaram died. If it was in 1646 that Shivaji began his active career by the capture of the mountain fort of Torna, he still had three years in which direct contact with Tukaram was possible. The two visits of Shivaji, one at Lohagav and the other at Poona, as described by Mahipati in his Bhaktalilamrita (First visit 36, 91–168 and 193–196. Second visit 39, 8–35) would show Tukaram's profound

(1) In reference to the dates of the poet-saints, there is so much uncertainty. I have thought it best to adopt without question those proposed by the late V. L. Bhave in his History of Marathi Literature, the Maharashtra Sarasvat. Those who think otherwise can easily change my figures with their pen.

influence over the young man at the commencement of his career. On the occasion of his first visit he is said to have been so deeply impressed by Tukaram's appeal to all men to seek the supreme-spiritual-riches [ *Paramartha* ], he decided to give up all his worldly ambitions, retire into a forest, and spend his time in the worship of God. The practical-minded mother of the young man, Jijabai, appealed to Tukaram against the literal following of his teachings, and Tukaram had the right moral sense, when he quoted to Shivaji the teaching of the Bhagavadgita, that each caste had its special duties, and that his duty as a *kshatriya* was to fight for his country. At Poona he ran the risk of falling into the hands of the Muhammadans, so anxious was he to listen to Tukaram's *kirtans*. Such, according to Mahipati, was Tukaram's direct influence over Shivaji.

Tukaram was born in the little village of Dehu, sixteen miles to the northwest of Poona. For the details of his life we are dependent on Mahipati in his Bhaktavijaya, written in 1762, and in his Bhaktalilamrita, written in 1774. The Bhaktavijaya account is the shorter, and differs in some respects from the Bhaktalilamrita account ( chapters 25 to 40 ). Aside from the few biographical *abhangs* of Tukaram himself ( and the authenticity of these is altogether uncertain), our only original sources of information are these two accounts by Mahipati, written about a hundred and twenty-five years after Tukaram's death. Mahipati does not even hint at the sources he used in compiling his long account. It is possible, perhaps probable that some of the autobiographical *abhangs* ascribed to Tukaram, may have supplied Mahipati with the frame-work

of some of his stories to which he added the details, from his fertile imagination.

A brief summary of the Bhaktalilamrita account is as follows ( chapters 25-40 ). The description of his ancestry begins with Vishvambhar, a godly man, one of whose special deeds was the building of a temple to Vithoba at Dehu, and confirming as their family deity, Vithoba of Pandharpur. There were tragic events in the history of the family, and the faith of some in Vithoba was shaken, but on the whole the family line was loyal to Vithoba, and in Bolhoba, the father of Tukaram, there was an enthusiast worshipper of Vithoba of Pandharpur. Bolhoba was a petty grocer in Dehu, who carried on his business in the strictest honesty, never telling an untruth, and time and money were spent in benevolent deeds. Tukaram's mother was like her husband, pious and faithful. Into this family Tukaram, or as he calls himself Tuka, was born. He very early began to help his father in his business and Tuka became his comfort and his pride. The first wife that the parents chose for Tuka turned out to be a sickly girl, and so another marriage was arranged to the daughter of a Poona merchant, Jijai by name, but to whom Tuka gave the name of Avali. All went well until Bolhoba's death and the burden of the family fell upon Tuka, the eldest son having become an ascetic. At first Tuka prospered in his business, through efficiency and honesty, but his heart was not in it, and as time went on, he cared less and less for earthly gain, and centered his desires on the supreme-spiritual-riches [*paramartha*] by spending all his time in the worship of God. Through lack of interest in his business affairs, they ceased to prosper. He soon became

bankrupt, and with poverty staring him in the face, calamities followed rapidly. A terrible famine swept over the land, and in it Tuka's first wife died of starvation, to his distress and shame. Former friends turned into enemies, and his second wife's sharp tongue found its occupation in nagging Tuka over his failure in business, and his waste of time and strength in doing nothing but repeating the names and epithets of God. But Tuka was not fickle-minded, and nothing could turn him away from his indifference to worldly things, and his concentration on the worship of God. It took Tuka some time to get adjusted to his new life, in the face of obstacles of every kind, but he never faltered. One of the first effects of the change was his acts of benevolence. He cared for the sick and weary. He fed the hungry and provided water for the thirsty. He carried the heavy loads of the weak. He went on errands for the lame. He was ready to do any thing asked of him in the way of help. His kindness went to animals also. He fed hungry animals and gave them water to drink. All the while he had to bear the bitter words of Avali, that he was giving his care to others and neglecting his own home. But Tuka never wavered. His next development was an inspiration to put his thoughts into poetic form, and give *kirtans*, in which God's deeds were praised, and his names and epithets were repeated amid the clang of the cymbals, the beating of the drums and the loud acclaim of the enthusiastic listeners. As his fame grew his bitter enemies were Brahmans, envious that a Shudra should become a religious teacher, and even Brahmans be found among his followers, ready to fall at his feet. But Tuka never returned evil for evil, but always returned evil with

good, and his soft answers turned away wrath. Legends have always grown about men whose piety and goodness have impressed their age, and Tukaram is no exception. In the one hundred and twenty-five years from the death of Tukaram to Mahipati, his first historian, legends easily developed, but all illustrative of Tuka's piety and goodness, his meekness and patience, his kindness and benevolence, his undaunted courage, his returning of good for evil, and his unwavering trust in God. It is no wonder that poets have drawn the beautiful picture of a chariot of dazzling light coming from Heaven and taking him bodily to his eternal home.

An analysis of Tukaram's *abhangs* is not easy. Apparently they were his extemporary expressions in his *kirtans*, and written down by such close friends as Santaji Teli Jaganade and Gangadhar Maval and cover a wide range of subjects, devotional, ethical, and the practical relations of man to man. He was a very pronounced Vaishnavite. God Vishnu, Krishna and Vithoba of Pandharpur, were the forms on which his worship concentrated. His theology in theory was that Vishnu and Shiva were really the same, both manifestations of God, though for different purposes, but he had very little sympathy with the Shaivites, worshippers of Shiva, and especially little sympathy with those ash-covered *yogis* in whom he saw little but hypocrisy. Tuka was not a formalist. He believed as did others in the holiness of the Ganges and the Chandrabhaga, as able to wash away sins, but all such outer forms were valueless without sincere repentance for sins. The worship of God by a hypocritical heart was an impossibility. Sincerity, purity, love of God, truth and justice,

kindness and unselfishness were to him essentials, without which worship of God was mere mockery. Uncertainties regarding the text of his *abhangs*, whether particular ones were from his lips, or whether interpolations by later poets, should render one cautious about attributing to Tuka beliefs or practices at variance with the general impression of his life and the general trend of his verses. Such was the light shining from the little village of Dehu, but it was bright enough to reach far. For example, at Kolhapur, many miles to the South, a little girl by name of Bahinabai, only twelve years of age, read his verses and was so moved by them that she had no rest until, in company with her family, she came to Dehu to see the holy man, to fall at his feet and listen to the gracious words that fell from his lips. This we learn from her own autobiography, written later in life, but bearing the impression of her loyalty to Tuka as her *guru*, who in a dream had put his hands on her head in blessing, and whispered the *mantra* that had come down to him from the ages past. If the light could reach as far as Kolhapur, we can hardly suppose it failed to reach the mountain regions where Shivaji held his court, and from whence he planned his raids to free his land from an alien rule.

## MUKTESHVAR

If Mukteshvar died 1649, Shivaji was then nineteen years of age. Mukteshvar may, therefore, be included in the list of poet-saints who lived during the life-time of Shivaji.

Mukteshvar was the grandson of the great poet-saint Eknath. He lived for a time at Paithan on the

Godavari, the home of his distinguished grandfather, but ended his days at Teravad in the Kolhapur District, where his tomb (*vrindavan*) is shown and honored.

Of the details of his life nothing is known. His right to be called a saint rests chiefly on his Marathi version of the Mahabharata, Ramayana and other religious Sanskrit poems. It is naturally assumed that the learning his works show, and the effort required for so great a task, would be undertaken only by one who had the spirit of a saint.

As a poet Mukteshvar is classed very high. In true poetic genius some consider him the best poet the Maratha nation has produced.

[See the late Mr. V. L. Bhave's 'Maharashtra Sarasvat,' pages 146–162.]

## RAMAVALLABHADAS

Ramavallabhadas was born at Devagiri, modern Daulatabad, in the year 1610. His father, Ambaji, was an officer in the Government service. He was for a long time childless, but finally a son was born, whom they named Tukopant. As the young man came to manhood he helped to carry on his father's profession, and as an army officer, was victorious in battle. Eknath's commentary on the eleventh chapter of the Bhagavat, led him to desire a more spiritual life. About this time he met a *sadhu*, by name Lakshmidhar, who gave him the *mantra* that made him his disciple, and changed his name to Ramavallabhadas. Several of his works are extant, such as Dashak-nirdhar, Vakyavritti, Chamatkari, Vaishnavagati. Among his disciples was a woman named Avadabai. Her *math*, and the religious order

she founded still continues at Chandavar in the District of Karvar. The late Sir Narayan Ganesh Chandavarkar was a descendant of this Avadabai.

Ramavallabhadas is a good illustration of the poet-saints who lived during the seventeenth century. Many of them were wholly unknown or slightly known, but they have left religious works that have survived the ravages of white ants, book-worms, rats and other enemies of manuscripts, and these bear witness to their religious life, and influence, though very little is known of the actual lives they lived. Although little is known of them as compared with Tukaram and Ramdas, they played their part in forming the religious life and thinking of the Maratha people.

[ Taken from Mr. V. L. Bhave's 'Maharashtra Sarasvat' page 163.]

## SHIVAKALYAN

In his Nityanandadipika, Shivakalyan gives the date of its composition as Shaka 1557, or A. D. 1635. He stands, therefore, in the honored list of poet-saints during the Shivaji period.

The very little that is known of Shivakalyan is told by himself in his Nityanandadipika. He gives his home as Ambapur, the modern Jogaiche Ambe, or Mominabad in the Haidrabad State. His father Trimal was also his religious Guru.

Shivakalyan was evidently a student of Dnyaneshvar, as his language is full of expressions used by Dnyaneshvar. His Nityanandadipika is a commentary on the Amritanubhava of Dnyaneshvar. His great work is his commentary on the tenth *Skandha* of the Bhagavat,

through which he endeavours to point the way to the obtaining of the Supreme Spiritual Riches.

It is interesting to notice the geographical location of the poet-saints of this period. They extend from Daulatabad to Kolhapur and from Amba Jogai to Junnar, thus covering the whole of the Maratha country.

[Taken from the Maharashtra Sarasvat of the late Mr. V. L. Bhave, pages 164-166.]

## LOLIMBARAJ

Whether Lolimbaraj should have a place among the poet-saints of Maharashtra is a question. According to the late Mr. Bhave one of this poet's works exceeds all limits in its obscenity. Why should he have composed such a book ? But tradition and the saints who followed him, such as Uddhava-chidghan, Rangnath, and Shivaram, make their bow to him as a distinguished saint.

Lolimbaraj was the son of one Divakarbhat, whose home was in Junnar, where his descendants still live. His surname was Joshi. From his Lolimbaraj Akhyana, the following events in his life are gathered. He married a beautiful Muhammadan girl, but he changed her name to Ratnakala. Their mutual love was great, but death brought the sad separation. Referring evidently to this death of his young and beautiful wife he says,

Never for a moment have you ever left me,
you sweet One
Why then have you now gone to the other world
without my leave, my dear child.

Lolimbaraj had lived a rather wild life in his youth, but the death of his wife changed him, for in his confession he says,

My life has been spent in sensual living
Not a moment have I given to be free from sinning.

It is a charitable supposition that his objectionable book was written when in his wild youth, and before the change that brought him into the ranks of the poet-saints.

Lolimbaraj was a *sheeghra kavi.* Words flowed from his lips in the form of poetic verse, and yet his words had a sweetness that was compared with nectar. He wrote a medical book called Vaidya Jivan, but his large work was a commentary on the tenth *Skandha* of the Bhagavata.

[Taken from the Maharashtra Sarasvat, by the late Mr. V. L. Bhave, pages 167-170].

## SHAMARADHYA

Shamaradhya, Shamasundara as he in one place calls himself, seems to have no standing among the poet-saints, and yet his very extensive works in commentaries on the Upanishads, Mahabharata, Bhagavata, Ramayana, and Bhagavadgita would indicate a man religiously inclined, and a contributor to the religious thought of his time. Were it a possibility to determine the extent of the circulation of such books as Shamasundara composed, his influence could be somewhat measured. The copying of such extensive works was laborious and costly, and the circulation could never have been large, and yet this did not hinder these poet-saints from putting into a Marathi version their interpretation of that Sanskrit literature which was the

foundation of their religious thinking. His date is uncertain but it is believed to be in the earlier half of the seventeenth century. Nothing is known of his life.
[Taken from V. L. Bhave's 'Maharashtra Sarasvat', page 170.]

## SHEKH MUHAMMAD

Among those listed as poet-saints are found several with Muhammadan names, but whose poetic works show them to be avowed worshippers of Vitthal. They are supposed to have been converts to Hinduism, or more likely Hindus, whose parents or themselves had come sometime under Muhammadan influence, and taken Muhammadan names. In the case of Shekh Muhammad the Muhammadan influence upon him is seen in his objection to idolatry, or at least regarding it as a mere stepping stone to a higher form of worship.

Shekh Muhammad lived at Shrigonde (Chamhar-gonde) in the Ahmednagar District. His occupation was that of a Mulana, a religious teacher, one of the twelve village servants, according to the old village system. Muhammadan influence had brought about the custom even among Hindus of employing a Mulana to pronounce God's name over the chicken or goat as it was being slaughtered. The dying throes of the animals made Shekh Muhammad reflect, and abandon that occupation. He went on pilgrimages to Pandharpur, and became a worshipper of Vithoba, though apparently opposed to the idolatrous worship of God.

Four books are of his authorship, Pavan Vijaya, Nishkalanka Prabodh, Yogasangrama, and Dnyanasagar. The last book was completed in 1696, so that Shekh Muhammad's life extended somewhat beyond that

of King Shivaji. The tide that so strongly set in of Vishnu-worship, and that carried with it Muhammadans and Shaivites, did not remove Shivaji from his worship of Bhavani, but the high moral ideals that went with Vishnu-worship spread over the whole land, and in some way must have affected Shivaji's religious and moral thinking.

[Taken from the late V. L. Bhave's 'Maharashtra Sarasvat', pages 198–200.]

## BODHALE BUVA

His true name is said to be Manakoji Jagatap, a frequent pilgrim to Pandharpur, and a composer of *abhangs.* Mahipati in the 53rd chapter of his Bhakta-vijaya gives the following account of this pious saint and his wife Mamatai. They were of the *Shudra* caste, and with their fields and other property were persons of considerable wealth. Bodhala believed that true religion consisted in acts of benevolence and his wife agreed with him, so they helped the sick and the poor generously. Then a great famine brought distress, but Bodhala and his good wife gave as before, until all they had was gone. Now they were themselves in dire poverty, clothed in rags and nothing to eat. To keep from starving Mamatai took an axe, cut some wood and sold it in the city for three pice, with which they bought a handful of flour. God saw their distress, but tested their love for humanity. He assumed the form of a very poor Brahman, and asked for food. Bodhala and his wife gave him all they had, and in their presence he cooked and ate it, giving them as they desired, what was left on his plate. Then they understood it was

God who had tested them, and their joy was complete. Such stories indicate the impression left on his times by this saint, aside from the question of their authenticity.

A short account of his life was also written in verse by his disciple Jotiram.

Mahipati in his Bhaktalilamrita, chapter 51, 11–82, relates the story of the Muhammadan king commanding him to eat cooked flesh. It was covered with a cloth, which being removed revealed a mass of flowers. Another story is that of God testing Bodhala's willingness to give to a guest whatever he asked for, took the form of a fakir and asked for his daughter-in-law. Bodhala gave her, true to his principle of giving, then later underestood that the fakir was God testing him.

The dates of Bodhala are unknown but he is assumed to have been a contemporary with Shivaji.

## NIMBARAJ

Nimbaraj lived at Dahithan, of which he was the *Inamdar*. He is said to have gained his name from the fact that his father Murarpant was for a long time childless. In order to have a son he resorted to austerities, such as living on the leaves of the Nimb tree. A son was born and the name Nimbraj was given to him. He is said to have died at Dahithan in the year 1678. He was the author of several small works.

## SAINTS LITTLE KNOWN

Of many of the saints and poet-saints of this period little or nothing is known except their

